राजेसाहेब संस्थान जव्हार

यांचे सेवेशीं

भाषांतरकर्त्यानें

हें पुस्तक

कृतज्ञतापूर्वक बहुमानपुरःसर

अर्पण केलें आहे.



# अनुक्रमणिका.

## उपोद्घात.



## खंड १.

## धनाची उत्पत्ति.



### भाग १ जमीन.



### भाग २ श्रम.



### भाग ३ भांडवल.

---

## खंड २.

## धनाची अदलाबदल.



---

### भाग १ मोल आणि किंमत.



---

### भाग २ पैसा.



---

### भाग ३ जिनसांचें मोल.

## भाग ४ पैशाचें मोल.



## खंड ३.

## धनाची वांटणी.



## भाग १ जमिनीचा सारा.

---

## भाग २ श्रमाचें वेतन.



---

## भाग ३ भांडवलाचा नफा.

## भाग ४ व्यापारांच्या श्रेणी, संप, आणि जुटीनें व्यापार करणाऱ्या मंडळ्या.



## खंड ४.

## परदेशी व्यापार, पत आणि सरकारचे कर.

## भाग १ परदेशी व्यापार.

**ज्या शास्त्रांत धनाच्या स्वरूपाचें विवेचन केलें असतें,** व ज्यांत धनाची उत्पत्ति, अदलाबदल आणि वांटणी यांचे नियम सांगितले असतात त्यास **अर्थशास्त्र** ह्मणतात.

अर्थशास्त्राचा धन हा विषय असल्यामुळें धन ह्मणजे काय हें बरोबर समजणें अवश्य आहे.

**ज्या कोणत्याही वस्तूस अदलाबदलीनें मोल प्राप्त होतें त्याचें नांव धन.** ही व्याख्या बरोबर समजण्यास विद्यार्थ्यांनें अशा वस्तु मनांत आणाव्या कीं, ज्या अत्यंत उपयोगी व अवश्य असून ज्यांस धन ह्मणतां येणार नाहीं. जसें—आह्मी श्वासोच्छ्वास करतों त्या हवेस अदलाबदलीचें मोल नाहीं; अमुक हवा अमुक वस्तु देऊन कोणी घेत नाहीं, कारण प्रत्येकास कांहीं श्रम न करितां पाहिजे तितकी हवा मिळते. तसेंच सूर्यप्रकाशास अदलाबदलीचें मोल येत नाहीं. पुष्कळ ठिकाणीं पाण्यासही मोल येत नाहीं, तथापि जेथें लोकांस पाण्याचा पुरवठा कमी असतो तेथें पाण्यास अदलाबदलीनें मोल प्राप्त होतें. मोठमोठ्या शहरांत कालवे किंवा नळ बांधून पाणी आणावें लागतें; तेव्हां त्यास अदलाबदलीनें मोल येतें, अशा वेळीं त्या पाण्यास धन मानतां येईल.

धनाचें वास्तविक स्वरूप ज्यांस समजलें नाहीं, त्यांच्या हातून मोठ्या चुका झाल्या आहेत. पूर्वी सर्वसाधारण अशी समजूत असे कीं, 'धन' आणि 'पैका' हीं एकाच वस्तूचीं दोन नांवें





आहेत. ही समजूत प्रबळ असल्यामुळें देशाच्या संपत्तीचा अंदाज त्यांतील सोन्यारुप्यावरून करण्यांत येत असे व हे मूल्यवान् धातु देशाबाहेर जाऊं नयेत, ह्मणून व्यापारावर विलक्षण तऱ्हेचे प्रतिबंध ठेवण्यांत येत. पैका व धन यांचा घोंटाळा करण्यांत ज्यांच्याकडून चुका झाल्या आहेत, त्या त्यांजकडून होण्यासही तशीं कारणें आहेत. कित्येक लोक ज्याप्रमाणें एखाद्या वस्तूच्या चिन्हास ती वस्तूच समजतात तसें त्यांजकडून झालें. धनाची गणति नेहमीं पैक्यानेंच करितात. जसें अमुक एक श्रीमान् गृहस्थाची मिळकत अमुक हजार रुपये आहे; किंवा फलाण्या राष्ट्राचा वसूल व खर्च अमुक अमुक कोटि रुपये आहे असें ह्मणतात.

ह्या व अशा प्रकारच्या शेंकडों गोष्टींमुळें पैक्याच्या वास्तविक स्वरूपाविषयीं यथार्थ ज्ञान झालेलें नाहीं. ह्याविषयीं भरवशालायक निर्णय करण्याचा उत्तम मार्ग ह्मटला ह्मणजे, जुन्या इतिहासावरून ज्या राष्ट्रांत सोन्यारुप्यांचीं नाणीं वापरीत नसत असें दिसून येतें त्यांचे व्यवहार कसे चालत असत तें पहाणें हा होय. पूर्वीं चिनी लोक पैक्याऐवजीं दाबून बनविलेल्या चहाच्या वड्यांचा उपयोग करीत; कांहीं इंदियन लोकांत पैक्याचे ऐवजीं एका प्रकारच्या शिंपा चालतात. इतिहासकालाच्या पूर्वींचे ग्रीक लोक अदलाबदलीकरितां गुरांचा उपयोग करीत; परंतु जेव्हां त्यांचा व्यापार वाढला तेव्हां मात्र ते बैलाचा छाप उठविलेलीं धातूचीं नाणीं चालवूं लागले. कांहीं अरब लोकांतही पैशाऐवजीं गुरांचा उपयोग होत असे, असें अडाम स्मिथ यांचें ह्मणणें आहे. पैका व धन हीं एकच आहेत असें मानणाऱ्या लोकांप्रमाणेंच या अरब लोकांचा समज चुकीचा होता; कारण ते असें समजत कीं, ज्या देशांत गुरेंढोरें पुष्कळ नाहींत तो देश धनाढ्य नव्हे. फ्रान्स देशाचें नांव जेव्हां त्यांनीं प्रथम ऐ-

कलें, तेव्हां त्याच्या संपत्तीविषयीं अटकळ करण्याकरितां ते फ्रान्सांत गुरें किती आहेत ह्मणून विचारपूस करूं लागले. प्रत्येक देशाच्या इतिहासांत जेव्हां असा काल होता कीं, अगदीं ओबडधोबड प्रकारचा देखील पैका कसा असतो तो तेथील लोकांस माहित नव्हता; त्या वेळेस सर्व प्रकारची देवघेव मोबदल्यानें ह्मणजे मालास माल देऊन करावी लागत असेल.

ह्मणजे जर एका इसमाजवळ दोन होड्या असून त्याला भाल्याची गरज लागली, तर जो त्याला भाला देई. त्यास तो होडी देई. जेथें देवघेवीचा प्रकार असा असेल, तेथें व्यापार वाढणार नाहीं हें जरी खरें आहे, तथापि ह्या रानटी लोकांजवळ धन नव्हतें असें ह्मणणें अप्रयोजक होय; कारण मागें सांगितलेंच आहे कीं, ज्यास अदलाबदलीनें मोल येतें त्याचें नांव धन.

**पैक्याचें खरें स्वरूप.** पैका ह्मणजे मोलाचें परिमाण व अदलाबदलीचें साधन होय. पैका हें मोलाचें परिमाण आहे असें ह्मटलें ह्मणजे कोणताही पदार्थ पैका होऊं शकेल हें सांगणें नकोच; मात्र इतकेंच कीं, इतर वस्तूंचें मोल ठरविण्याकरितां सर्वांच्या संमतीनें तो प्रमाण धरला गेला ह्मणजे पुरे झालें. हा पदार्थ सोनें किंवा रुपेंच धरला पाहिजे असें नाहीं, हें वर सांगितलेंच आहे. वस्तुतः मोलाचें परिमाण ठरविण्यास कोणताही पदार्थ पसंत केला तरी चालेल.

पैका हें अदलाबदलीचें साधन आहे असें ह्मणण्याचा अर्थ इतकाच कीं, मालाची देवघेव बहुधा पैक्याच्याच योगानें करितात. कोणा शेतकऱ्यास गहूं विकून मीठ खरेदी करणें असेल तर तो बहुतकरून गहूं देऊन त्याच्या मोबदला मीठ घेणार नाहीं; तो गहूं विकून त्याचा पैका करील, आणि त्या पैक्याचें मीठ घेईल

**व्यापारीपद्धत.** धन आणि पैका एक मानण्याची चुकीची समजूत झाल्यामुळेंच सोनें व रुपें यांचा संचय करण्याची लोकांत प्रवृत्ति पडली. व याच हेतूनें मुत्सद्दी लोक आपल्या देशांतील माल बाहेर पाठविण्याकरितां लोकांस देववेलतितकें उत्तेजन देत जाऊन त्याकरितां देणग्याही देऊं लागले, आयात माल आपल्या देशांत कमी यावा ह्मणून त्यावर भारी जकात बसवूं लागले. असा प्रकार चालू होता तेव्हां फ्रान्स देशांतून येणाऱ्या मद्य, ब्रांडी, रेशीम, कलाबतू वगैरे जिनसांचा खप इंग्लंडांत फार होऊं नये ह्मणून त्यावर जबर कर बसविण्यांत आले होते; कारण इंग्लंडांत ह्या जिनसांचा फार खप झाल्यास तेथील पैका फ्रान्स देशांत जाऊन स्वदेशांतील संपत्ति कमी होईल असा समज होता. परंतु देशांत सोनें रुपें रक्षण करण्याची मुत्सद्दी लोकांच्या मनांत भरलेली अशा तऱ्हेची कल्पना जी व्यापारीपद्धत (Merchantile system) या नांवानें प्रसिद्ध आहे, ती भ्रांतिमूलक आहे असें अडाम स्मिथ याणें आपल्या 'राष्ट्रांची संपत्ति' नामक सर्वमान्य ग्रंथांत प्रथमतः इसवी सन १७८६ त सिद्ध करून दाखविलें. सदरील कल्पनेस अनुसरणारे मुत्सद्दी ज्या एका ग्रंथाच्या आधारानें आपलें मत प्रतिपादन करीत असत, त्या ग्रंथाचें खंडन स्मिथ साहेबानें आपल्या ग्रंथांत केलें आहे. त्या ग्रंथाचा मुख्य उद्देश असें प्रतिपादन करण्याचा होता कीं, देशांतल्यादेशांतील व्यापारास फारसें महत्व देऊं नये; कारण त्यानें देशांतल्या सोन्यारुप्याजी वृद्धि होत नाहीं.

पैक्याचें वास्तविक स्वरूप ह्मणजे काय व व्यापाराला प्रतिबंध करणाऱ्या सर्व जकाती बंद करण्यांत आल्यास कोणत्याही देशाच्या निर्यात व आयात मालाची किंमतीच्या मानानें सरासरी बरोबरीच व्हावयास लागेल हें तत्व अडाम स्मिथच्या ग्रंथावरून इंग्लंडांत प्रथमतः कळून आलें.

**खुलाव्यापार.** या विषयाचें पूर्ण विवेचन पुढें एका प्रकरणांत व्हावयाचें आहे. तूर्त इतकेंच सांगणें अवश्य आहे कीं, आयात मालावरील प्रतिबंधक जकाती उठवून व्यापाराचा ओघ आपोआप चालेल तसा चालूं देणें या मतास खुला व्यापार असें ह्मणतात.

हे उपोद्घातादाखल चार शब्द सांगितले. आतां आपल्या विषयाचे जे मुख्य तीन भाग आहेत त्यांतील पहिला भाग ह्मणजे 'धनाची उत्पत्ति' त्याचा विचार करूं.

## उपोद्घात भागावर प्रश्न.

१. अर्थशास्त्र ह्मणजे काय ?

२. धन कशास ह्मणावें ?

३. पैका कशास ह्मणतात ?

४. पैक्याचे ठिकाणीं ज्या कित्येक वस्तूंचा उपयोग पूर्वी करीत तशा कांहीं वस्तूंचीं नांवें सांगा.

५. मोबदला ह्मणजे काय ?

६. व्यापारीपद्धतीचें वर्णन करा.

७. या मताच्या योगानें कशा कशा चुका झाल्या ?

८. व्यापारीपद्धतीपासून होणाऱ्या चुकांचें पहिल्यानें कोणीं व कसें खंडन केलें ?

९. व्यापारीपद्धतीस कोणत्या पद्धतीनें मागें सारलें आहे ?

---

१. कोणा मनुष्यापाशीं चार आणे देखील नाहींत; अशा मनुष्यास श्रीमंत ह्मणतां येईल काय ?

२. स्पार्टन लोकांत सोनें वापरण्याची बंदी होती; ह्मणून ते लोक गरीब होते असें ह्मणावें काय ?

३. हिंदुस्थानांत मोबदल्याचा व्यापार अगदीं बंद आहे काय ?

---

# खंड १

## धनाची उत्पत्ति.

मागें उपोद्घातांत सांगितलेंच आहे कीं, अर्थशास्त्रांत धनाची उत्पत्ति, त्याची अदलाबदल आणि त्याची वांटणी यांच्या नियमांचें विवेचन केलें असतें.

**धनोत्पत्तीस अवश्य लागणाऱ्या तीन गोष्टी.** या खंडांत धनाच्या उत्पत्तीविषयींच केवळ विचार करावयाचा आहे. धनोत्पत्तीस अवश्य गोष्टी तीन लागतात, व त्यांच्या परस्पर साह्यानें धन उत्पन्न होतें. ह्या तीन गोष्टी जमीन, श्रम, आणि भांडवल ह्या होत. ह्या तीन गोष्टींचीं कार्यें स्पष्ट लक्षांत यावीं, व धनोत्पादनाच्या कामीं त्या प्रत्येकीपासून कोणकोणतें विशेष कार्य होतें, तें बरोबर निश्चित करितां यावें ह्मणून या खंडाचे जमीन, श्रम, व भांडवल असे तीन विभाग केले आहेत.

---

## भाग १ जमीन.

**जमीन धनोत्पत्तीस कारण.** धनाच्या उत्पत्तीस जमिनीची अवश्यकता किती आहे हें थोडासा विचार केल्यानें ध्यानांत येईल. अशी व्यापाराची एकही वस्तू नाहीं कीं, जिची उत्पत्ति प्रत्यक्ष किंवा परोक्ष रीतीनें जमिनीशीं दाखवितां येणार नाहीं. तुह्मी बसलां आहां त्या खोलीभोंवतीं नजर टाका, किंवा तुमच्या आंगावरच्या वस्त्राकडे पहा, ह्मणजे तुह्मास समजेल कीं, जमिनीपासून झालेलें नाहीं असें आपणास कांहींच दिसत नाहीं. उदाहरणार्थ लोंकरीच्या कापडाचा तुकडा घ्या. हा जमिनीपासून झाला आहे. ज्या लोंकरीचें तें कापड तयार केलें आहे, ती प्रथम मेंढरापासून प्राप्त झाली, तें मेंढरूं जमिनीवर उगवलेलें गवत खाऊन होतें. चिटाचा संबंध तर जमि

नीशीं फार निकट आहे. ज्या कापसाच्या तंतूपासून चीट तयार केलें आहे, तें कापशीचें झाड जमिनींत होतें. कलाकौशल्याचे सर्व जिन्नस प्राणिज उद्भिज्ज आणि खनिज अशा पदर्थांपासून तयार करतात, आणि हे सर्व पदार्थ जमिनीपासून होतात.

वास्तविक ह्मटलें तर धनाच्या उत्पत्तीस जमिनीची इतकी अवश्यकता आहे कीं, धनाच्या उत्पत्तीस केवळ जमीनच कारण आहे असा फ्रेंच अर्थशास्त्रवेत्त्यांचा दृढ समज झालेला होता. परंतु श्रम आणि भांडवल सुद्धां धनाच्या उत्पत्तीस अवश्य आहेत हें पुढें दाखविण्यांत येईल.

**जमिनीचें उत्पादक सामर्थ्य वाढविणाऱ्या गोष्टी.** जमिनीचें उत्पन्न वाढविणाऱ्या पुष्कळ गोष्टी आहेत. रसायनशास्त्राच्या योगानें माहित झालेल्या कृत्रिम खतांचा उपयोग शेतकऱ्यास किती होऊं लागला आहे हें सांगावयास नकोच. शेताची कापणी करण्याचें यंत्र, मळणी करावयाचें यंत्र, अशीं जीं असंख्य यंत्रें अलीकडे निघालीं आहेत, त्यामुळें जमीन, श्रम, आणि भांडवल यांची धन उत्पन्न करण्याची शक्ति किती बरें वाढली आहे! केंब्रिज शायरमधील दलदलीसारखे मोठें प्रदेश जे पूर्वीं निरुपयोगी ह्मणून सोडून दिलेले होते, त्यांतील पाणी हल्लीं काढून टाकल्यामुळें ते फार सुपीक होऊन त्यांत विपुल धान्य उत्पन्न व्हावयास लागलें आहे. आतां हें उघड आहे कीं, असल्या जमिनीचा सुपीकपणा, ती सुधारण्याकरितां जे श्रम व भांडवल घालावें लागतें त्यांवर मुख्यत्वें करून अवलंबून असतो.

**मोठी व लहान शेती.** मोठ्या शेतकींत फायदा आहे किंवा लहान शेतकींत फायदा आहे, याविषयीं बराच वादविवाद सुरू आहे. मोठ्या प्रमाणावर शेतकी करण्यांत मुख्य फा-

यदा हा कीं, त्यांत यंत्रांचा उपयोग ज्यास्त चांगला होतो. जो शेतकरी ५०० बिघ्यांचें शेत करील त्यास वाफेचा नांगर, व वाफेचें मळणी करण्याचें यंत्र यांचा उपयोग करण्यांत फायदा होईल, आणि शेतकीचीं नवीन नवीन सुधारलेलीं हत्यारें निघालीं असतील त्यांचा उपयोग त्यास करून घेतां येईल. १००० मेंढ्यांचा कळप राखण्यास ५०० मेंढ्यांच्या कळपास पाहिजेत त्याहून दुप्पट धनगर नकोत. पुष्कळ गुरांढोरांच्या बेताचा गोठा बांधण्यास जो खर्च येतो, त्या मानानें थोड्या गुरांकरितां बांधण्यास अधिक खर्च येतो.

लहान शेती करण्यांत मुख्य फायदा हा आहे कीं, शेतकरी स्वतः खपणारा असल्यामुळें, व गड्यांबरोबर स्वतः काम करीत असल्यामुळें, कामाची हयगय होण्याचा संभव नसतो; कारण आपला फायदा होण्याकरितां होईल तितकी मेहनत शेतकरी जातीनिशीं करीत असतो.

## शेतकरी मालक व शेतकरी कूळ यांच्या मधील भेद.

शेतकऱ्याच्या उद्योगास उत्तेजन येण्यास लहान शेती कशी कारण होते, याचें विवेचन करतांना हेंही सांगितलें पाहिजे कीं, वर लहान शेतीपासून होणाऱ्या फायद्याविषयीं जें जें म्हटलें तें शेतकरी कुळापेक्षांही शेतकरी मालकासच अधिक लागू पडतें. आपण जितका अधिक उद्योग करूं तितका आपला सारा खचीत वाढणार एवढ्याच कारणानें शेतकरी कूळ मनापासून कष्ट करण्यास धजावत नाहीं. शेतकरी मालकास आपल्या कष्टाचें सर्व फळ मिळतें; परंतु आपल्या अधिक श्रमाचें फळ आपल्यास न मिळतां जमिनीच्या मालकांस जाईल अशी शेतकरी कुळाची खात्रीच असते. इताली देशाच्या उत्तरेकडील भागांतील शेतकरी कुळांस पुरतें अन्न सुद्धां मिळत नसल्या-

मुळें त्यांस पराकाष्ठेचे हाल सोसावे लागतात. जीव बचावण्यापुरता जितका कांहीं मका त्यांस रहातो तितका खेरीज करून त्यांच्या जमिनींतील बाकीचें सर्व उत्पन्न साऱ्याच्या रूपानें मालकाकडे जातें. सन १८७० व सन १८८१ चे जमीनी संबंधीं कायदे होण्यापूर्वी ऐर्लंड देशांत जमीनीची वहिवाट करणारीं शेतकरी कुळें असल्यामुळें त्या देशाचीही स्थिति फार वाईट होती. हे कायदे होण्यापूर्वी कुळें बहुधा एक साली करारानेंच जमिनी करीत, त्यांनीं जमिनी सुधारल्या तर मालक त्यांचा धारा वाढवीत, व कुळास जमीन सुधारल्याबद्दल कांहींच मोबदला न देतां पाहिजे तेव्हां त्यांना शेतांतून बाहेर काढीत. सन १८७० च्या कायद्यानें जमिनीच्या सुधारणेबद्दल व कुळास एकदम काढून लावल्यास त्याबद्दल मालकापाशीं योग्य मोबदला मागण्याचा कुळास हक्क प्राप्त झाला; व अलस्टर प्रांतांत कुळाची आपला हक्क विकण्याची ज्याप्रमाणें वहिवाट होती, तशा प्रकारची वहिवाट कायदेशीर मानली. सन १८८१ च्या आक्टावरून कुळास मालकीचे बरेच हक्क मिळाले; कारण ह्या कायद्याअन्वयें योग्य धारा ठरविण्याकरितां कुळास जमिनीच्या कोर्टीकडे दाद मागतां येऊं लागली; यामुळें कोर्टानें ठरविलेला धारा पंधरा वर्षें पर्यंत बदलतां येत नाहींसा झाला, व अशा तऱ्हेनें प्राप्त झालेला हक्क विकण्याची कुळास मोकळीक मिळाली. मात्र हा हक्क विकावयास काढल्यास व मालकाची इच्छा तो घेण्याची असल्यास त्याजला तो प्रथम मिळावा असें ठरविण्यांत आलें.

मालकीच्या लहान शेतांपासून युरोप खंडांत काय परिणाम झाले आहेत याविषयीं निरनिराळ्या ग्रंथकारांनीं एकमेकांस विरोध येण्यासारखे लेख प्रसिद्ध केले आहेत; परंतु इतकें खरें कीं, ज्या देशांत लहान शेती ठाऊक नाहीं तेथें विशेष प्रकारचें शे-

तीचें उत्पन्न चांगलें होत नाहीं. जेथें लहान प्रमाणावर शेती करण्याची चाल आहे, तेथेंच फळफळावळीच्या लागवडीचा उदीम व कोंबड्या पाळण्याचा उदीम फायदेशीर होतो. दुभत्याविषयींही हीच गोष्ट लागू आहे. फ्रान्स आणि इंग्लंड या देशांतील शेती करण्यामध्यें कसा फरक आहे हें फ्रान्स देशांतून परदेशीं दरसाल सुमारें एक कोट वीस लक्ष किंमतीचीं अंडीं रवाना होतात, व त्यांतून बरींच इंग्लंडास येतात या गोष्टीवरून दिसून येणार आहे. फ्रान्स देशाची हवा व जमीन कोंबड्या वगैरे पाळण्यास ज्यास्त सोईची आहे, हें कांहीं अंशीं सदरील गोष्टीचें कारण असूं शकेल, परंतु मुख्य कारण हेंच कीं, फ्रान्स देशांतील शेतकरी लोकांस अमुक एक उदीम फायदेशीर आहे एवढें दिसून आल्याबरोबर ते त्याकामीं फार झटून श्रम करतात. इंग्लंडांत जमिनीच्या मक्तेदारांची संख्या थोडी असून ते लोक श्रीमान्वर्गांतील असल्यामुळें, कोंबड्या पाळण्यास जे जातीनें श्रम करावे लागतात ते त्यांच्या हातून होत नाहींत. खेड्यापाड्यांतून चांगलें दूध व लोणी मिळण्याची किती पंचाईत पडते ? बरें ! आलीकडील लोक असें ह्मणतात कीं, शेतकऱ्यांच्या बायकांची मिजास हल्लीं इतकी वाढली आहे कीं, पूर्वीं यांच्या आज्या व पणज्या जें काम करीत होत्या तें करण्यास यांस लाज वाटते; ह्मणजे सकाळीं पहाटे उठून दुभत्याचें काम त्या स्वत: करीत नाहींत. वरील उक्तीमध्यें लहान व मोठ्या शेतींतील फरक दिसून येतो; तो हा होय कीं शेतकरी लोक पूर्वींपेक्षां हल्लीं मोठ्या प्रमाणावर शेती करूं लागले आहेत. याच कारणानें शेतकरी व त्याची बायको यांची पूर्वीं जी स्थिति होती ती आतां सहजींच बदलली आहे, ह्मणून ते कुळंब्याप्रमाणें आतां काम करीत नाहींत. मोठ्या व लहान शेतीच्या फायद्यासंबंधानें जें वर सांगण्यांत

आलें आहे तेवढ्यावरून सुद्धां या दोन प्रकारच्या शेतींपैकीं अमुकच खास फायदेशीर असा निश्चय होत नाहीं. पुढील एका भागांत असें दाखवावयाचें आहे कीं दोन्ही प्रकारांपासून होणारे फायदे एकत्र करण्याचा एक तिसरा मार्ग आहे, तो असा कीं, शेतकरी लोक जी जमीन कसतात तिच्या उत्पन्नांतूनच त्यांचा कांहीं स्वार्थ होईल असें कांहीं करावें ह्मणजे झालें.

## १ ल्या भागावर प्रश्न.—जमीन.

१. धनाच्या उत्पत्तीस कोणत्या तीन गोष्टी अवश्य आहते ?

२. धनोत्पादनास जमीन कशी अवश्य आहे तें दाखवा.

३. जमिनीचें उत्पन्न वाढविण्याचीं जीं मुख्य साधनें आहेत त्यांतील कांहीं सांगा.

४. मोठी व लहान शेती यांच्यापासून होणारे कांहीं नफेतोटे सांगा.

५. शेतकरी मालक व शेतकरी कुळें यांमध्यें भेद कां करावा ?

---

१. ऐर्लंदांतील जमिनीच्या कायद्याचा परिणाम जर असा होणार असेल कीं, लहान लहान पुष्कळ शेतें मोडून मोठ्या प्रमाणाचीं थोडीं शेतें व्हावींत, असा जहाला तर त्यामुळें त्या देशांतील लोण्याचे उत्पन्नांत कांहीं फरक पडेल किंवा काय ?

२. मिल्टन कवीनें आपल्या पारेडाईसलास्ट नांवाच्या काव्याची मालकी १५ पौंडांस दिली. काव्यास अदलाबदलीचें मोल असल्यामुळें तें धन होय. तर हें धन उत्पन्न होण्यास जमीन आणि भांडवल यांचा काय संबंध होता ?

# भाग २ श्रम.

**धनोत्पत्तीस श्रमाची अवश्यकता.** उपोद्घातांत धनाच्या स्वरूपाचें वर्णन करितांना ज्यास केव्हां केव्हां धन मानतां

येणार नाहीं, परंतु त्यास विशेष प्रसंगीं धनच ह्मटलें पाहिजे, असा एक पदार्थ उदाहरणार्थ घेतला होता.

स्वाभाविक रीतीनें पाणी पाहिजे तितकें मिळत आहे, तोंपर्यंत त्यास अदलाबदलीचें मोल नाहीं, कारण जी वस्तु श्रम केल्याशिवाय फुकट मिळते ती कोणी विकत घेत नाहीं; परंतु पाणी हें ज्या ठिकाणीं दुर्मिळ आहे त्या ठिकाणीं तें नेण्यास श्रम पडतात ह्मणून पाण्यास लगेच धनाचें स्वरूप येतें. याचप्रमाणें ज्यांना अदलाबदलीचें मोल प्राप्त होतें अशा सर्व जिनसा उपयोगालायक होण्यास निरनिराळ्या प्रकारचे श्रम लागतात. नुसती भाकर कां घ्यानां, ती तयार होईपर्यंत त्या कामीं इतक्या निरनिराळ्या प्रकारचे श्रम लागतात कीं, त्या सर्वांचीं नांवें सांगणें फार कठीण पडेल. भाकर ही सैंपाक्याच्या श्रमाचें साक्षात फल आहे हें खरेंच, परंतु भाकर उत्पन्न होण्यास एकंदर जे श्रम लागले आहेत त्यांत सैंपाक्याचे श्रमाचा अंश फार थोडा आहे. गहूं दळून त्यांचें पीठ करणारा, पीठ दळण्याकरितां जातें करणारा पाथरवट, गव्हांचें शेत कापणारा व पेरणारा, जमीन नांगरणारा, नांगर तयार करणारे लोहार व सुतार, व ज्या लोखंडाचा तो नांगर केला तें खाणींतून काढणारा; यांखेरीज गाडीवाले, जहाजवाले, खलाशी वगैरे जे लोक माल पाहिजे त्या ठिकाणीं पोंचवितात ते; तसेंच जहाजें तयार करणारे अशा लोकांच्या अनंत श्रमांची परंपरा एकटी भाकर तयार होण्यास कारण झाली आहे.

**उत्पादनाचे कामीं श्रमापासून जें वास्तविक साह्य होतें त्याचें लक्षण.** धनाच्या उत्पत्तीस श्रमापासून जें वास्तविक साह्य होतें त्याचें व्यापक लक्षण मिल्ल साहेबानें असें दिलें आहे कीं "वस्तु योग्य ठिकाणीं नेऊन ठेवणें" किंवा "एक

वस्तु दुसऱ्या वस्तूकडे नेणें, किंवा तिच्याकडे दुसरी वस्तु आणणें." हें लक्षण अगदीं स्पष्ट असून इतकें व्यापक आहे कीं, त्यांत उद्योगाच्या वेगवेगळ्या सर्व कार्यांचा समावेश होतो. "यावरून या जड सृष्टींत श्रमाचा उपयोग पदार्थांस केवळ गति देण्याकडेसच होतो. बाकीचीं सर्व कार्यें पदार्थांच्या स्वाभाविक गुणांनीं व सृष्टीच्या नियमांनीं होतात."

उदाहरणार्थ घर बांधण्यास जे श्रम लागतात ते घ्या. आपण विटा कशा तयार होतात तें पाहूं. चिकण माती ज्या ठिकाणीं सांपडते त्या ठिकाणापासून ती आणून, पाण्याशीं तिचा समागम घडवितात. नंतर ती विटाळ्यांत दाबतात, व पुढें ती विस्तवांत घालतात. अशा रीतीनें विटा तयार होतात. तसेंच तक्त्याविषयीं होय. कुऱ्हाड झाडावर हाणतात, व खालीं पडलेला सोंट करवतीनें चिरून त्याचे तक्ते करतात. "पदार्थमात्रावर क्रिया करण्यास त्या पदार्थांना गति देण्याखेरीज मनुष्यास दुसरें साधन नाहीं. या तत्वाचीं आणखी उदाहरणें देण्याची गरज नाहीं." (मिल्लचीं अर्थशास्त्राचीं मूलतत्वें पृ० ३२,३३. पहा.)

**कौशल्यानें श्रम केल्यास मालाचें मोल किती वाढतें याचीं पुष्कळ उदाहरणें** घड्याळाच्या कारखान्यांतील निरनिराळ्या भागांत सांपडतात. पहा कीं, लहान घड्याळांत लागणारे अतिसूक्ष्म पोलादी स्क्रू अच्छेर घेण्यास तीनशेर सोन्या इतकी ह्मणजे २८०० रुपयांहून अधिक किंमत पडते. खिशांतील घड्याळाच्या कृतिसंबंधानें मिस केथफूल नांवाच्या बाईनें एक लेख लिहिला आहे. त्यांत हेअरस्प्रिंग जी प्रत्येक घड्याळास असतेच त्याविषयीं ती ह्मणते:—एक हेअरस्प्रिंगचें वजन फक्त ट्राय वजनाच्या $\frac{1}{15000}$ पौंड इतकें असतें. ती सरळ केल्यास एक फूट लांब भरते. तिची गुंडाळी आपण चिमट्यानें

सहा इंचपर्यंत ताणावी परंतु सोडल्याबरोबर ती मूळच्या आकारास इतकी येते कीं, एक अणुमात्र त्यांत फरक रहात नाहीं. तिचें पोलाद फारच चोख बनवावें लागतें, कारण तिला दर तासास १८००० वेळां मागें पुढें असें कित्येक पिढ्यांपर्यंत देखील हालवयाचें असतें. अच्छेर वजनाच्या पोलादाच्या तुकड्यास दोन रुपये पडतील; हेअरस्प्रिंगच्या रूपांत तेवढ्याच पोलादास ८००० रुपये पडतात. श्रमाशिवाय जरी धन उत्पन्न होत नाहीं, तरी श्रमाचे असे कांहीं प्रकार आहेत कीं, ते पुष्कळ उपयोगी असून धनाच्या उत्पत्तीस सहाय होत नाहींत. ह्या श्रमास **अनुत्पादक श्रम** ह्मणतात. अनुत्पादक श्रमाची व्याख्या करण्यांत अर्थशास्त्रवेत्त्यांमध्यें बराच मतभेद आढळतो. कांहीं ग्रंथकारांनीं 'अनुत्पादक' हा शब्द निंदापर मानल्यामुळें हा भेद अंशतः झाला असावा. परंतु ह्या शब्दांत निंदा नाहीं. या जगांत राहण्याचा हेतु केवळ धनप्राप्तीच असेल तर तो निंदापर ह्मणतां येईल. मिल्ल साहेबाची उत्पादक श्रमाची व्याख्या अशी आहे कीं, ज्याच्या योगेंकरून सृष्टपदार्थांत उपयुक्तपणा स्थापित केला जातो, त्यास **उत्पादक श्रम** ह्मणावें.

**अप्रत्यक्षोत्पादक श्रम.** आतां प्रश्न हा निघतो कीं, शिक्षकाचा श्रम अनुत्पादक आहे काय? शाळामास्तरास आपल्या हातानें सृष्टपदार्थांत उपयुक्तपणा स्थापित करतां न येवो, परंतु त्याच्या साह्यानें उत्पादक श्रम करणारांची संख्या पुष्कळ वाढेल. उदाहरणार्थ असें धरूं कीं, एक शाळामास्तर, लंडन शहरच्या रस्त्यांतून आळसांत व दुर्व्यसनांत काळ घालविणाऱ्या ५० मुलांना शिकवून त्यांस हुशारीनें उद्योग करण्याची संवय लावील तर त्यांतील बरींच मुलें उत्पादक श्रम करणारीं निघण्याचा संभव

आहे. जर नवीन यंत्राच्या युक्तीपासून इतर लोकांचे श्रम शें-कडोंपट उत्पादक झाले, तर युक्ति काढणाराचा श्रम अनुत्पादक ह्मणतां येईल काय ? नाहीं असेंच ह्मणणें भाग आहे. ह्मणून प्रत्यक्षोत्पादक व अप्रत्यक्षोत्पादक असा श्रमांचा भेद केला पाहिजे. पहिल्या वर्गांत गलबतें तयार करणारे, जोडे करणारे, तसेंच जे जे कारागीर सृष्टपदार्थांवर हातानें उपयुक्तपणा स्थापित करतात ते सर्व येतात, व दुसऱ्या वर्गांत शिक्षक, कल्पक व पोलीसशिपाई वगैरे येतात.

**अनुत्पादक श्रम.** अनुत्पादक श्रम ह्मणजे ज्यापासून समाजाची संपत्ति वाढण्यास प्रत्यक्ष किंवा परोक्षरीतीनें साह्य होत नाहीं तो. कलावंतीण, नट, सार्वजनिक वाचक किंवा धर्मोपदेशक यांचा श्रम अनुत्पादक होय. मुत्सद्याचा श्रम बहुधा अनुत्पादक असतो. परंतु केव्हां केव्हां अप्रत्यक्षरीतीनें उत्पादक असतो. उदाहरणार्थ धान्यासंबंधीं कायदे रद्द करून खुला व्यापार सुरू केल्यामुळें इंग्लंडदेशाची संपत्ति अतोनात वाढली आहे. परंतु हें ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं, संरक्षणमत खोडून टाकण्यांत मुत्सद्दी लोकांचें हेंच काम होतें कीं पूर्वीच्या चुकीच्या मतास अनुसरून त्या वेळच्या मुत्सद्यांनीं व्यापारावर जे प्रतिबंध ठेविले होते ते दूर करावयाचे. याकरितां जीव आणि मालमत्ता यांचें रक्षण करण्यांत मुत्सद्यांचा श्रम उत्पादक आहे, तेवढा खेरीज करून एकंदरींत मुत्सद्यांचा श्रम परोक्षरीतीनें तरी उत्पादक आहे किंवा नाहीं, हें सांगणें कठीण आहे.

केव्हां केव्हां उत्पादक श्रमकारांचा श्रम अनुत्पादक होतो; उदाहरणार्थ कित्येक अपुर्ते कालवे खणण्यांत केलेला श्रम होय. कारण पाण्यांतून माल नेण्यापेक्षां आगगाडीनें तो नेणें सोपें दिसलें, तेव्हां तीं कामें तशींच पडलीं. बरें कधीं कधीं याच्या

उलट असें होतें कीं, अनुत्पादक श्रमकारांचा श्रम अकस्मात् उत्पादक होतो. रसायनशास्त्रवेत्त्यांच्या श्रमानें उद्योगाच्या कित्येक रीति फार सोप्या झाल्या आहेत. ह्मणून श्रमकारांचा श्रम सर्वदा उत्पादक किंवा अनुत्पादक असें खात्रीनें सांगतां येणार नाहीं. तसें सांगतां येण्यास त्यांच्या कामाचें फल समजलें पाहिजे. काम जसजसें कठीण असेल तसतसें त्याजविषयीं अंतीं तें उत्पादक होईल किंवा अनुत्पादक होईल हें अगोदर निश्चयानें सांगणें फार कठीण पडेल.

---

**अडाम स्मिथनें सांगितलेले श्रमविभागापासून होणारे तीन फायदे.** श्रमाचा उत्पादकपणा वाढविणाऱ्या गोष्टी पुष्कळ आहेत. या सर्वांत श्रमविभाग ही मुख्य होय. उदाहरणार्थ काचेच्या कारखान्यांत एक भांडें तयार करण्यास पुष्कळ लोक खपत असतात, त्यांतील प्रत्येकजण एकएकच काम करतो. एक मनुष्य काचेचा रस करतो, दुसरा फुकून त्याला आकार आणतो, तिसरा झिलई करतो, चवथा त्यावर खोल पैलू पाडतो, नंतर पांचवा पुन्हां त्यावर झिलई करतो; नंतर त्यावर अधिक उणीं नाजूक कामें झाल्यावर एक मोठा कसबी कारागीर त्यावर कांहीं सुंदर आकृति कोरतो. श्रमविभागापासून जे निरनिराळे तीन प्रकारचे फायदे होतात ते अडाम स्मिथनें असे दाखविले आहेत. १ ला, काम करणाराचें कसब वाढतें. २ रा, एक काम सोडून दुसऱ्या कामाला लागण्यास काम करणाराचा जो वेळ जावयाचा तो वांचतो. ३ रा, काम करणाराचें मन विशिष्ट भागावर एकाग्र झाल्यानें सोयीचीं यंत्रें निघण्याचा पुष्कळ संभव असतो.

**पहिल्या फायद्याचें उदाहरण.** श्रमकाराचें हस्तकौशल्य वाढतें हा श्रमविभागापासून फार महत्त्वाचा फायदा होय. बर-

मिंघम सारख्या शहरांतील कारखान्यांत श्रमविभागामुळें कारागिरांचें हस्तकौशल्य इतकें वाढलें कीं तें पाहून आश्चर्यच वाटेल! टांकाच्या कारखान्यांत कांहीं लोकांचें काम फक्त टांक, यंत्रांतून काढून घेण्याचें असतें; हें काम ते इतकें जलद करतात कीं त्यांचा हात हालतो त्यावर पाहणारांची नजर ठरत नाहीं. अशा प्रकारचें हस्तकौशल्य हें एका मनुष्यानें एकच काम करून येणारें आहे.

**दुसऱ्या फायद्याचें उदाहरण.** काम करणाराचा एक काम सोडून दुसऱ्यास लागण्यांत जो वेळ जाणार, तो वांचल्यापासून कोणता फायदा होतो, त्याचें उदाहरण आगगाडीच्या स्टेशनावर सर्वांनीं पाहिलें असेल. गाडीच्या डब्यांतील कंदील काढावयाचे असतात तेव्हां एक हमाल गाडीच्या डब्यावर चढून कंदील काढून दुसऱ्या मनुष्याकडे देतो, व तो मनुष्य ते कंदील ठेवण्याच्या घडवंचीवर नेऊन ठेवितो. अशारीतीनें फार थोड्या वेळांत चाळीस किंवा पन्नास कंदील काढून ठेवण्यांत येतात. आतां हें काम एकटाच करील तर त्यास प्रत्येक वेळीं दोन किंवा तीन कंदील आणून ठेवण्यास चढ उतर करावी लागेल, दुसऱ्याच्या मदतीनें पांच मिनिटांत होणाऱ्या कामास अर्धा तास लागेल.

**तिसऱ्या फायद्याचें उदाहरण.** अडाम स्मिथ ह्मणतो कीं, श्रमविभागापासून तिसरा फायदा हाच कीं, काम करण्यास साधारण व थोडे श्रम पुरत अशीं यंत्रें निघतात व त्यांमुळें एकास पुष्कळ मनुष्यांचें काम करण्याचें सामर्थ्य येतें. या फायद्याच्या महत्त्वाविषयीं अडाम स्मिथनें एक चांगलें उदाहरण दिलें आहे. तें असें कीं, आगीचीं यंत्रें जेव्हां पहिल्यानें निघालीं, तेव्हां त्यांतील एक झांकण उघडावयास व बसवावयास

एक मुलगा ठेवला होता. त्याजकडे तेवढेंच काम होतें. त्या मुलाच्या मनांत असें आलें कीं पाहिजे त्या वेळेस झांकण उघडावें व बसावें, अशी आपण कांहीं युक्ति केली तर आपणास सगळा वेळ खेळावयास सांपडेल. नंतर त्यानें झांकणाच्या मुठीस एक दोरी बांधून ती यंत्राच्या दुसऱ्या एका भागास बांधून टाकिली व असें केल्यामुळें त्याला लक्ष ठेवण्याची गरज न पडतां योग्य वेळीं झांकण उघडूं लागलें व बसूं लागलें.

**श्रमविभागापासून चवथा फायदा.** श्रमविभागापासून आणखी एक मोठा फायदा होतो, तो अडाम स्मिथनें सांगितला नाहीं. ही चूक प्रथम बाबेजसाहेबानें दाखविली. तो फायदा हाच कीं, जें काम ज्या कारागिरास उत्तम येतें तेंच त्याजकडून करविणें. एक मनुष्य दररोज पांच रुपये दराचें काम करणारा असून जर बिनकसबाचें रोज रुपया दराचें काम त्यास सांगितलें तर त्यांत नुकसान होतें. शर्यतीच्या घोड्यास नांगरास धरूं नये अशी एक जुनी ह्मण आहे. ही ह्मण या ठिकाणीं चांगली लागू पडते. आपण काचेच्या भांड्याचें उदाहरण घेऊं. काचेवर नाजुक काम करण्यास बिनकसबी मनुष्य लावणें कामाचें नाहीं हें उघड आहे, व जें काम पंधरा रुपये दरमाहाच्या मनुष्याकडून होईल तें दरमाहा सवाशें रुपये देऊन ठेवलेल्या कारागिराकडून घेण्यांत नुकसान आहे.

श्रमविभागापासून होणारे फायदे वर सांगितले. तसेच त्यांपासून होणारे कांहीं तोटे येथें दाखविणें अप्रासंगिक होणार नाहीं. खुर्चीचे पुढले पाय कांतून तयार करणारा सुतार सर्व खुर्चीसंबंधानें बेफिकीर असतो; कारण त्याजकडे एवढेंच काम असतें कीं दर महिन्यास अमुक पाय तयार करून द्यावे यामुळें कारागिराची बुद्धि व कसब हीं वाढत नाहींत. कारखान्यांतून

खुर्च्या निघतात त्या मजबूत, सुखावह किंवा सुंदर अशा मुळींच नसतात, याचें मुख्य कारण असें असेल कीं, श्रमविभागामुळें सर्व खुर्चीची जबाबदारी कोणावरच नसते; आणखी असें कीं, अति श्रमविभागानें कारागीर केवळ एक यंत्रच बनून जातो; त्यास एकच काम करण्याची हतोटी चांगली साधली असते; पण त्याचें काम बदललें तर त्याचें कसब व त्याची उपयुक्तता हीं नाहींशीं होतात. त्याची बुद्धि जात्या चांगली असेल, व ती इतर गोष्टींमुळें वाढलेलीही असेल, परंतु श्रमविभाग जेथें फार वाढला असतो तेथें रोजच्या कामानें तिला शिक्षण क्वचितच मिळणार आहे.

**खुलाव्यापार हा श्रमविभाग होय.** श्रमविभाग हा मोठा विषय आहे. त्याची मर्यादा कारखान्यांतच कुंठित करून ठेवणें नीट नाहीं. श्रमविभागाचें तत्व होईल तितकें व्यापक करणें हेंच खुल्याव्यापाराचें बीज आहे. राष्ट्राराष्ट्रांत जे कृत्रिमप्रतिबंध ठेवलेले दिसतात ते दूर केल्यानें प्रत्येक देश सर्व वस्तूंकरितां स्वतःवरच अवलंबून न राहतां, स्वाभाविक सोयीस व लोकांच्या सवयीस अनुसरून व्यापार किंवा शेती त्यास जें साधेल तेंच करील तर त्यास विशेष फायदा होईल.

**श्रमसंयोग.** श्रमविभागापासून श्रमाचा उत्पादक गुण वाढतो हें खचित आहे, परंतु श्रमसंयोगानें श्रम विशेष फलद्रूप होतो असें ह्मटलें पाहिजे. श्रमसंयोग ह्मणजे अनेक मनुष्यांनीं मिळून काम करणें. या शब्दाचा अर्थ उदाहरणानें चांगला लक्षांत येईल. पहा, मोठ्या गलबताचा नांगर पुष्कळ लोकांनीं एकत्र होऊन वर ओढल्यास तेव्हांच वर येईल; पण एकच मनुष्य जर तो नांगर वर ओढूं लागेल तर त्याचा प्रयत्न व्यर्थ जाईल.

**साधा व मिश्रश्रमसंयोग.** श्रमसंयोगाचे दोन प्रकार आहेत;

१ ला. साधाश्रमसंयोग ह्मणजे जेथें अनेक मनुष्यें एकच काम करण्यास मदत करतात, जसें वर सांगितल्याप्रमाणें एखादा जड पदार्थ उचलणें.

२ रा. मिश्रश्रमसंयोग; ह्मणजे कांहीं लोक निरनिराळीं कामें करून एकमेकांस साह्य करितात त्या मिश्रश्रमसंयोगाचें उदाहरण ह्मटलें ह्मणजे कापसाचें कापड होय. तें तयार करण्यास निरनिराळ्या प्रकारचे श्रम, निरनिराळ्या तऱ्हेनें निरनिराळ्या ठिकाणीं होत जाऊन एकत्र होतात. पहा कापसाच्या सरक्या पेरणारे, व तो पिकला ह्मणजे गठ्ठे बांधून बाहेर पाठविणारे; हिंदुस्थानांतून तो विलायतेस नेणारे खलाशी; आणि कापड बनण्यापूर्वी कच्च्या कापसावर जे संस्कार करावे लागतात ते करणारे हे सर्व लोक कापडाचा एक तुकडा तयार करण्यास मदत करतात. मिश्रश्रमसंयोगाचें ह्मणजे अनेकांनीं निरनिराळीं कामें करून परस्परांस मदत करणें त्याचीं दुसरीं उदाहरणें, शेतकी व शिल्प हीं होत. ह्यांत परस्परांस कसें साह्य होतें तें पहा. कांहीं लोक आपणांस पाहिजे त्याहून अधिक धान्य उत्पन्न करतात, व कांहीं लोक अधिक कापड तयार करितात; त्यांत त्यांचा उद्देश असा असतो कीं आपल्या अधिक धान्या ऐवजीं पाहिजे तितकें कापड व अधिक कापडा ऐवजीं पाहिजे तितकें धान्य आपणांस मिळावें.

**वेकफील्ड साहेबाचें वसाहती करण्याचें तत्व.** शहरांत श्रम करणारे लोक व शेतांत श्रम करणारे लोक आपआपल्या उद्योगाचीं फळें परस्परांस देऊन एकमेकांच्या उपयोगीं पडतात, ही गोष्ट वेकफील्ड साहेबाच्या वसाहतीविषयींच्या क-

ल्पनेचें तत्व आहे. वेकफील्ड साहेबानें असें प्रतिपादन केलें आहे कीं, नवीन वसाहत करतांना प्रत्येक कुटुंबास जमिनीचा पुरे इतका भाग वांटून देण्याची चाल वाईट आहे; कारण त्यापासून व्यापारास उत्तेजन येत नाहीं, व सुधारणाही होत नाहीं. कांहीं पदार्थांची विपुलता असते खरी परंतु प्रत्येक कुटुंब अंतरावर व स्वतंत्र असल्यामुळें विशेष श्रम करण्याची इच्छा व संधि या दोहोंचाही अभाव असतो, व शेतकऱ्यास आपणास पाहिजे त्याहून अधिक उत्पन्न करावेंसें वाटत नाहीं. या गोष्टीस वेकफील्ड साहेबानें असा उपाय योजिला कीं, प्रत्येक वसाहतींत होईल तितकें करून शेतकरी व शहरांतील लोक असावे. यानें श्रमविभागास उत्तेजन येईल, शेतकरी लोक उत्पन्न अधिक करूं लागतील, कारण त्यांचा माल शहरांतील लोक घेतील व शहरचे लोक त्यांस कारखान्यांत तयार केलेले जिन्नस देतील.

**हत्यारें व यंत्रें यांचा उपयोग.** श्रमाचा उत्पादकपणा श्रमविभाग आणि श्रमसंयोग या दोन कारणांनीं वाढतो हें वर सांगितलें. श्रमाचा उत्पादकपणा वाढविणारें आणखी तिसरें कारण आहे. हत्यारें व यंत्रें यांचा उपयोग धनाच्या उत्पत्तीस किती होतो हें सर्वांस माहित आहेच. हत्यारांचें कारण अगदींच लागत नाहीं असा धंदाच नाहीं; अडाणी तऱ्हेची शेतकी म्हटली तरी कुदळी शिवाय होत नाहीं. किंवा साधें शिवणकाम सुई शिवाय करतां येत नाहीं; अलीकडे सर्वप्रकारच्या उद्योगांत मोठ्या श्रमानें तयार केलेल्या यंत्रांचा उपयोग करण्यांत येत आहे. यंत्रें श्रमाचा उत्पादकपणा दोन प्रकारांनीं वाढवितात. एक तीं मनुष्याचे श्रम वांचवितात, हें कापण्याच्या किंवा शिवण्याच्या यंत्रावरून चांगलें लक्षांत येईल. दुसरें जें काम मनुष्यास होणारच नाहीं तें तीं करतात. पहा दरतासास साठ मैलप्रमाणें आग-

गाडी चालवितां येते. पहिल्या गोष्टीवरून हें सिद्ध झालें कीं, यंत्राच्या योगानें पुष्कळ मनुष्यांचें काम थोड्या माणसांनीं होतें. यामुळें बरेच लोक मोकळे होऊन दुसरें काम पाहूं लागतात; दुसऱ्या गोष्टींवरून हें उघड होतें कीं यंत्राच्या योगानें नवीन उद्योग निघतात, व दुसरीकडे यंत्रें सुरू झाल्यामुळें जीं मनुष्यें मोकळीं पडतात त्यांना त्या उद्योगांत काम मिळतें.

**श्रमाचा उत्पादकपणा, श्रम करणाराचें कसब, बुद्धि, नीति आणि प्रामाणिकपणा यांच्या योगानें वाढतो.** श्रमाचें उत्पादक सामर्थ्य वाढविणारीं तीन स्थूल कारणें वर सांगितलीं, परंतु ह्या स्थूल कारणांशिवाय आणखीही कारणें आहेत तीं विसरतां कामा नये. तीं हीं कीं कसब, बुद्धि, नीति आणि प्रामाणिकपणा हीं होत. कित्येक कांहीं धंदे असे आहेत कीं त्यांत बरेच दिवस काढल्याखेरीज त्यांतील खरें कसब कळत नाहीं. त्याचप्रमाणें धंद्याच्या मालकास काम शिकणाराच्या श्रमापासून नफा होण्यास बरींच वर्षें लागतात, कारण तो नवशिका अडाणीपणामुळें सामानसुमानाचा फार नाश करतो.

**कारागिराची बुद्धि.** श्रमाचा उत्पादकपणा वाढवायास कारागिराची बुद्धि वाढविणें फार महत्त्वाचें आहे. अप्रबुद्ध कारागीर आपलें काम यंत्रासारखें ह्मणजे शिकविलें असेल तेवढेंच करतो, अधिक करीत नाहीं; त्यास सुधारणा करणें सुचत नाहीं. धंद्यास मंदी आल्यामुळें त्याजकडील काम निघाल्यास त्याला दुसऱ्या कोणत्याही कामांत शिरतां येत नाहीं, शेवटीं त्यास कुटुंबासह भीक मागण्याची पाळी येते.

**कारागिराची नीति.** श्रमकाराची नीति त्याच्या श्रमाचा उत्पादकपणा वाढविण्यास पुष्कळांशीं कारण होते. फार दारू पिण्यानें शरीराची खराबी होते. शुद्धीवर असतां देखील व्यसनी

लोकांस.चें काम होत नाहीं, व व्यसनानें मनुष्याची शक्ति क्षीणऊन मृत्यु लवकर येतो. कामकऱ्याची नीति आणि बुद्धि यांचा निकट संबंध असतो. अप्रबुद्ध मनुष्यास मानसिक सुख काय तें समजत नाहीं. अर्थशास्त्रदृष्ट्या व इतर गोष्टींवरूनही विद्यावृद्धि फार महत्त्वाची आहे. शिक्षणानें बुद्धि तीव्र होऊन काम अधिक फलद्रूप होतें; व मनुष्य नियमितपणानें रहातो, कारण त्यास विद्येच्या योगानें शरीरास अपाय न होणारीं सुखें मिळतात. सन १८७० चा प्राथमिक शिक्षणाचा कायदा झाल्यापासून इंग्लंडांत व स्काटलंडांत गुन्हे, भिकार व मद्यसेवन यांचें मान कमी झालें आहे; आणि ही सुधारणा पुष्कळांशीं विद्याप्रसारामुळें झाली यांत संशय नाहीं. सन १८७० व १८८३ याच्या दरम्यान अपराध व भिकार यांची संख्या सुमारें शेंकडा २५ या मानानें उतरली आहे, व मद्यसेवन इतकें कमी झालें आहे कीं सन १८८३ सालीं वसुलाच्या अधिकाऱ्यांनीं अदमास केला त्यांत त्यांना असें आढळून आलें कीं, देशास दरसालचा ५०००००० पौंडांचा तोटा झाला.

**श्रम करणाराच्या प्रामाणिकपणाचें मोल.** मजुरांच्या अविश्वासूपणामुळें त्यांच्यावर देखरेख करण्यास लोक नेमावे लागतात. अशा लोकांवर जर विश्वास ठेवतां आला, तर त्यांच्यावर देखरेख करण्याचा श्रम वांचून त्याचा दुसरीकडे उपयोग होईल. व ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, कामकऱ्यांवर पाहारा करणें अवश्य असलें तर, देखरेख करणारा कसाही डोळ्यांत तेल घालून बसला तरी काम चुकविण्यास त्यांना संधि सांपडेल. शेतकीच्या कामांत असें फार होतें; कारण शेतांतील मजूरांचें काम निरनिराळ्या ठिकाणीं असल्यामुळें त्यांच्यावर नजर ठेवणें फार कठीण पडतें.

उत्पादक व अनुत्पादक श्रमाचा विषय संपविण्यापूर्वी श्रमाचा उत्पादकपणा वाढविणाऱ्या कारणांची एकवार यादी दिल्यास ती लक्षांत ठेवण्यास सुलभ पडेल, ह्मणून ती देतों. या कारणांचे दोन वर्ग केले आहेत.

| स्थूल | आणि | मानसिक. |
|---|---|---|
| श्रमविभाग.<br>श्रमसंयोग.<br>यंत्रें व हत्यारें<br>यांचा उपयोग. | श्रमकाराचें | कसब.<br>बुद्धि.<br>नीति.<br>प्रामाणिकपणा. |

येथपर्यंत उत्पादक व अनुत्पादक श्रम यांच्या अर्थाचें विवेचन झालें. आतां भांडवलाचें काम काय, याचा विचार करण्यापूर्वी, विद्यार्थ्यानें उत्पादक व अनुत्पादक व्यय ह्मणजे काय हें समजून घेतलें पाहिजे.

**उत्पादक व अनुत्पादक व्यय.** उत्पादक व अनुत्पादक श्रम यांतील भेद समजला पाहिजे ह्मणजे उत्पादक श्रम करणारा हा उत्पादक व्यय करणाराही होतो व तसेंच उलटही समजावें. उत्पादक श्रमकाराचा सर्व व्यय कांहीं उत्पादक नसतो; श्रमकार धन निर्माण करीत असतां त्याची शक्ति राखण्यास धनाचा जेवढा अंश अवश्य असतो तेवढ्याचाच व्यय उत्पादक होय; ऐषआरामाच्या सर्व पदार्थांचा व्यय अनुत्पादक रीतीनें होतो, कारण त्या व्ययापासून नवीन धन उत्पन्न होण्यास साह्य होत नाहीं पदार्थ वायां घालविणें हा त्याचा अनुत्पादक व्यय होय; कांहीं लोकांस वाटतें कीं यापासून समाजाचा फायदा होतो परंतु तसें नसून खरोखर त्यापासून हानि होते. केवळ पदार्थांच्या व्ययानेंच जर धनोत्पादन होईल–मग तो व्यय उपयोगी गोष्टीकडे होवो किंवा न होवो—तर मग राष्ट्रानें त्वरित धनाढ्य होण्याचा मार्ग ह्मटला ह्मणजे, घरें, कारखाने, सार्वजनिक इमारती जाळून

टाकाव्या, रेलवे व गोद्या यांचा नाश करावा, व तारायंत्रें मोडून टाकावीं! असें केल्यास गंवडी व इंजिनियर लोकांस काम पुष्कळ मिळेल यांत संशय नाहीं; परंतु हा त्यांचा फायदा सर्वांचें नुकसान होऊन होणारा आहे. चिकागो शहरांत मोठा अग्निप्रलय होऊन गेल्यावर, एका अमेरिकन पत्रांत लिहिलें होतें कीं, या आगीपासून इमारती बांधणारांच्या धंद्यास फार हित झालें. घरें बांधणारांचा जो फायदा झाला त्याहून घरांच्या मालकांचें नुकसान अधिक झालें, हें लिहिणारा विसरला असें दिसतें. या गोष्टीसंबंधानें बास्तियात साहेबाच्या ग्रंथांतून एक उत्तम उदाहरण देऊन हा भाग पुरा करूं. दुकानाच्या खिडकीचें भिंग मुलानें फोडल्यामुळें सखाराम शेटजी इतका रागावून गेला होता कीं, तो विलक्षण प्रकार पाहून तेथें जमलेल्या मंडळींनीं त्या शेटजीस असाच उपदेश केला असता कीं "ज्या वायूच्या वाहण्यानें कोणाचेंच हित होत नाहीं तो वाईटच. बाबा, सर्वांना पोट आहे, तावदानें जर कधींच फुटलीं नाहींत तर काचवाल्याचें कसें चालावें?" याप्रकारचा उपदेश ते करीत आहेत असें दिसून येईल. या उपदेशांत साधारण लोकांच्या विचाराचें बीज आहे, तें येथें व्यक्त करून दाखविलें पाहिजे. कल्पना करा कीं, खिडकीस नवें भिंग बसविण्यास आठ आणे पडतात, तुह्मी ह्मणतां भिंग फुटल्यामुळें काचवाल्याच्या धंद्यास आठ आणे मिळाले. त्या धंद्यास आठ आण्यांचें उत्तेजन आलें हें मी कबूल करतों. त्याच्या विरुद्ध मला एक शब्दही बोलावयाचा नाहीं, तुमचें ह्मणणें वाजवी आहे. कारण काचवाला येऊन काम करतो, आणि आठ आणे घेऊन आपल्या मनांत भिंग फोडणाऱ्या मुलास दुवा देतो. हें सर्व जेवढें दिसलें त्याविषयीं झालें. परंतु ह्यावरूनच तुह्मी जर असें अनुमान कराल कीं, खिडक्या फोडणें हें

चांगलें; त्यामुळें पैसा हातोहातीं खेळतो, व उद्योगास उत्तेजन येतें, तर मला असें ह्मणावें लागेल कीं " पुरे करा! जेवढें दिसतें त्यावर तुमची कल्पना आहे, जें दिसत नाहीं तें तुह्मीं मुळींच मनांत आणलें नाहीं."

दुकानदारास एका वस्तूकरितां आठ आणे खर्चावे लागल्यानें त्यास ते दुसऱ्या योग्य कामाकडे खर्चितां येत नाहींत. तसेंच त्यास खिडकी दुरुस्त करावी लागतीना तर त्यानें नंवा जोडा खरेदी केला असता किंवा एक पुस्तक घेतलें असतें, ह्या गोष्टी डोळ्यांपुढील नसल्यामुळें दिसत नाहींत. तात्पर्य हेंच कीं, खिडकी फुटल्यानें दुसऱ्या कोणत्या तरी कामांत आठ आणे घालण्याची त्याला बंदी झाली.

एकंदरींत या गोष्टीचा परिणाम उद्योगासंबंधानें असा झाला कीं, खिडकी मोडल्यानें काचेच्या धंद्यास आठ आण्यांइतकें उत्तेजन आलें, एवढें उघड दिसतें. पण खिडकी मोडली नसती तर चांभाराच्या किंवा दुसऱ्या कांहीं धंद्यांस आठ आण्यांइतकें उत्तेजन आलें असतें; हें मात्र दिसत नाहीं.

आतां दृश्य व अदृश्य दोन्ही गोष्टी ताडून पाहिल्यास असें वाटतें कीं, खिडक्या फुटण्याचा किंवा न फुटण्याचा परिणाम एकंदर धंद्यांवर किंवा राष्ट्राच्या श्रमांवर कांहींच होत नाहीं. पहिल्या कल्पनेंत खिडकी मोडल्यामुळें सखाराम शेटजीस आठ आणे खर्चावे लागतात, व खिडकी शाबूत असती तर त्याच्या पूर्वींच्या समाधानांत कांहींच कमजास्तपणा झाला नसता.

दुसऱ्या कल्पनेंत, खिडकी मोडली नसती तर त्यास जोडा खरेदी करण्यांत आठ आणे घालायास सांपडून, खिडकीचें व जोड्याचें अशीं दोन्ही सुखें त्यास मिळतीं.

ज्या अर्थीं सखाराम शेट हा समाजाचा भाग आहे, त्या अर्थीं

त्याचें सुख आणि श्रम इकडे लक्ष पोंचवून असें अनुमान केलें पाहिजे कीं, खिडकी फुटल्यानें समाजाचें नुकसानच झालें.

या दृष्टांतावरून चांगलें समजेल कीं पैशाचा व्यर्थ व्यय करण्यानें, व चैनीनें उधळपट्टी करण्यानें व्यापारास उत्तेजन येतें असें ह्मणणें, हा केवळ वेडेपणा होय.

उधळ्या मनुष्याच्या अविचाराच्या खर्चापासून समाजाचें हित होत नाहीं, हें समजण्यास अर्थशास्त्राच्या एका मूलतत्वाचें ज्ञान पुरे आहे. तथापि भांडवलाचें काम काय हें समजल्याखेरीज ह्या विषयाचें विवेचन अधिक करितां येणार नाहीं. यासाठीं अर्थशास्त्राच्या दुसऱ्या शाखेकडे आपणांस वळलें पाहिजे. त्याचें विवेचन पुढील भागांत येईल.

## २ ऱ्या भागावर प्रश्न–श्रम.

१. धनाच्या उत्पत्तीस श्रम अवश्य आहे असें दाखवा.

२. भाकर उत्पन्न करण्यास जे निरनिराळ्या प्रकारचे श्रम लागतात त्यांतून कांहीं सांगा.

३. उत्पादनास श्रमाचा बरोबर उपयोग कोणता होतो, तें स्पष्ट करून दाखवा.

४. उत्पादकश्रम ह्मणजे काय ?

५. कित्येक प्रसंगीं अनुत्पादकश्रम परोक्षरीतीनें उत्पादक असतो तें कसें ?

६. श्रमाच्या विभागापासून त्याचा उत्पादकपणा कसा वाढतो ? अडाम स्मिथनें सांगितलेले श्रमविभागाचे तीन फायदे कोणते ?

७. बाबेज साहेबानें चवथा फायदा कोणता दाखविला आहे ?

८. श्रमविभागाच्या उपयोगांत कांहीं नुकसानीचा प्रकार आहे काय ?

९. खुला व्यापार हा केवळ श्रमविभाग आहे असें दाखवा.

१०. श्रमसंयोग ह्मणजे काय?

११. साधा श्रमसंयोग व मिश्र श्रमसंयोग ह्मणजे काय?

१२. वसाहती करण्यासंबंधानें वेकफील्ड साहेबाचें मत काय आहे?

१३. श्रमाचा उत्पादकपणा यंत्रांनीं कोणत्या प्रकारें वाढतो?

१४. नीतीचे कोणते प्रकार श्रमाचा उत्पादकपणा वाढवितात?

१५. उत्पादक व अनुत्पादक व्यय कोणता?

१६. बास्तियात साहेबाचें उदाहरण घेऊन असें दाखवा कीं, अनुत्पादक व्यय राष्ट्राच्या भरभराटीस कारण होत नाहीं.

---

१. बुडी मारण्याच्या घांटेंतील हवा धन आहे काय? असेल तर कां?

२. शिक्षेच्या निमित्तानें लिहावयास सांगितलेलीं पृष्ठें मुलानें उतरणें, हा त्या मुलाचा श्रम उत्पादक किंवा अनुत्पादक?

३. क्रिकेटच्या खेळांत श्रमसंयोग कोणत्या तऱ्हेचा असतो? व मनुष्याच्या शरीराच्या निरनिराळ्या भागांत कोणच्या प्रकारचा श्रमविभाग असतो?

४. खेळ खेळतांना श्रमविभाग व श्रमसंयोग यांचे कोणते फायदे होतात?

५. हल्लीं जो श्रमविभाग चोहोंकडे दिसण्यांत येतो त्याचा परिणाम मनास रंजविण्याऱ्या कोणत्याही कलेंत प्रवीणता संपादन करण्याचे कामांत कोणता होतो? उदाहरणार्थ पानशे यांच्या मृदंगवादनावर?

६. क्रिकेटच्या खेळांत श्रमसंयोग साधा किंवा मिश्र असतो?

७. क्रिकेटच्या खेळांत खेळगड्याखेरीज दुसऱ्या कोणाची गरज असते काय?

८. तंबाखू ओढणें हा धनाचा व्यय उत्पादक किंवा अनुत्पादक?

९. भूमिकंपानें मुंबईतील सर्व घरें कोसळून पडलीं तर व्यापारास चांगलें काय?

१० बाराच्या दारूनें पार्लमेंटगृहें उडवून दिल्यास व्यापारास चांगलें काय?

११. तुमच्या वडलाच्या माळ्यानें एक शेर दारूची बाटली फोडली तर अर्थशास्त्रदृष्ट्या याचा काय परिणाम होईल?

१२. लोकांनीं मरावयाचें टाकलें तर प्रेताची सामग्री पुरविणाऱ्यांची काय वाट होईल?

---

## भाग ३ भांडवल.

**भांडवल आणि पैका एक मानणें ही चूक आहे.—** लोकांच्या बोलण्यांत केव्हां केव्हां भांडवल ह्मणजे पैसा असा अर्थ दिसतो; हेंच जर खरें असेल तर भांडवल हें धनोत्पादनाच्या अवश्य गोष्टींपैकीं एक आहे असें होईल, परंतु हें खरें नव्हे; कारण पैसा धनाच्या उत्पत्तीस कारण नाहीं. मागें पैशाचा उपयोग व त्याचें कार्य यांचें स्पष्टीकरण केलें आहे, त्यावरून पैसा हा धन किंवा भांडवल नव्हे हें सहज दिसून येईल. पैसा हा मोलाचें परिमाण व अदलाबदलीचें साधन आहे, हें विसरतां कामा नये; ह्मणजे हेंच कीं, पैसा हा एक पदार्थ सर्वांच्या संमतीनें पसंत केलेला असतो, तो एवढ्याचकरितां कीं, त्यास प्रमाण धरून इतर सर्व पदार्थांचें मोल करतां यावें, आणि तो देऊन त्याबद्दल कोणतीही वस्तु घेतां यावी.

**भांडवलाची व्याख्या.** धनाचा जो भाग नवीन धनोत्पत्तीस साह्य करण्याकरितां राखून ठेविला असतो त्यास

भांडवल ह्मणावें. कोणी असा आक्षेप घेतात कीं, भांडवल धनाच्या उत्पत्तीस अवश्य नाहीं, कारण रानटी मनुष्याच्या निर्वाहास लागणारीं फळें, मुळें, जमविण्यास त्यास धनाची मदत लागत नाहीं, किंवा एखादा सुधारलेला मनुष्य ओसाड बेटावर पडल्यास जमिनीवर श्रम करून हळू हळू धन उत्पन्न करून सांठवील. हा आक्षेप खरा नसून केवळ काल्पनिक आहे. रानटी मनुष्य गारगोटीस आकार देऊन तिचा हत्याराप्रमाणें उपयोग करूं लागला तर तो भांडवलाशिवाय आहे असें ह्मणतां येणार नाहीं; तसेंच मंगळवारीं होडी तयार करण्यासाठीं सर्व काळ खपावें ह्मणून, राबिन्सन् क्रूसोनें सोमवारीं पुष्कळ फळें जमा करून ठेविलीं तर तो भांडवलाशिवाय काम करतो असें होत नाहीं. स्थूलमानानें असें ह्मणतां येईल कीं; अर्वाचीन काळांत व अर्वाचीन उद्योगपद्धतींत भांडवल हें धनाच्या उत्पत्तीस अवश्य गोष्टींपैकीं एक आहे.

**धनाच्या उत्पत्तीस भांडवल कसें उपयोगीं पडतें याचें उदाहरण.** पूर्वीं संचय केलेल्या धनानें मजुरांचें पोषण केल्याखेरीज शेतकीचीं कामें चालणार नाहींत. बीं पेरल्यापासून त्याचें उत्पन्न येऊन त्याची भाकर बनेपर्यंत मध्यें बरेच महिने लोटतात. ह्मणून हें उघडच आहे कीं, मजुरलोक जें उत्पन्न करण्यास खपत आहेत, त्यावर त्यांचा निर्वाह होत नाहीं; परंतु पूर्वीं त्यांनीं किंवा दुसऱ्यांनीं उत्पन्न केलेल्या धनावर त्यांचें पोषण झालें पाहिजे. या धनास भांडवल ह्मणतात. नवीन उत्पन्न करण्यासाठीं पूर्वीं उत्पन्न केलेल्या धनाचा उपयोग कसा होतो, हें प्राचीनकालीं स्पष्ट दिसून येई. कारण त्या काळीं शेतकरी मजूर लोकांस मजुरीचा पैसा न देतां धान्य, बटाटे वगैरे जिन्नस देत. अशा प्रकारच्या मजुरीस ऐनजिन्नस मजुरी ह्मणत. अशाच प्रका-

र्‍ची इंग्लंडांत एक पद्धत होती, तिच्याविषयीं पार्लमेंटानें कांहीं नियम केले आहेत. हल्लीं शेताचा मालक आपल्या धनाचा पैसा करतो, व मजुरलोकांस वेतनाचा पैसा देतो. हल्लीं वेतन पैशानें देण्याची चाल सर्वत्र पडली आहे, हा पैसा पूर्वीं संचित केलेल्या धनाचा दर्शक आहे, व सांप्रत हा पैसा, पूर्वीं नवीन धन उत्पन्न करण्याकरितां मजुरांस जें अन्न देत, त्याचेंच काम करतो. ह्मणून हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं उत्पादक श्रमकारास वेतन ह्मणून जें धन मिळतें तें भांडवल होय, व श्रमकार नवीन धन उत्पन्न करीत असतां त्याचें पोषण तें करतें, ह्मणून तें भांडवल धनाच्या उत्पत्तीस अवश्य आहे. आणखी हें नेहमीं लक्षांत वागविलें पाहिजे कीं, वेतन ज्या पैशानें दिलें जातें तो पैसा भांडवल नव्हे, पण तो पैसा देऊन अन्नवस्त्र वगैरे जे जिन्नस मिळतात ते भांडवल होत. सोन्यानें व रुप्यानें श्रमाचें पोषण होत नाहीं; तीं देऊन अवश्य पदार्थ मिळत असल्याखेरीज त्यांचा कांहीं उपयोग नाहीं. मास्को शहराकडून परत येत असतां फ्रेंच सैन्याचे फार हाल झाले. बरोबर नेण्यास अवघड ह्मणून वाटेंत तिजोरीची पेटी फेंकून द्यावी लागली. कांहीं शिपायांनीं त्यांतील सोन्याच्या नाण्यांनीं आपले खिसे व पिशव्या भरल्या. परंतु तें सुवर्ण त्यांनीं आपल्यापाशीं फार वेळ ठेवलें नाहीं; त्यांच्या दुःखाचें निवारण होण्यास त्याचा कांहींच उपयोग नव्हता; त्याचा भारच त्यांना सोसेनासा होऊन तत्क्षणीं त्यांनीं तें बर्फावर फेंकून दिलें ! पैसा देऊन पोषणाचे अवश्य पदार्थ किंवा सुखाचे पदार्थ मिळत असल्याखेरीज त्याचा कांहींच उपयोग नाहीं, हें ह्या गोष्टीवरून समजून येईल.

हेनरी जार्ज नामक एक ग्रंथकार आहे. त्यानें आपल्या प्रोग्रेस अँड पाव्हर्टी ( उन्नति आणि दारिद्य ) नांवाच्या ग्रंथांत

असा आक्षेप घेतला आहे कीं, भांडवलांतून वेतन मिळतें असें ह्मणणें चुकीचें आहे. तो ह्मणतो श्रमाच्या योगानें जें उत्पन्न होतें त्याच्या मोलांतूनच वेतन मिळतें, व याप्रमाणें श्रमाचें वेतन श्रमच उत्पन्न करतो. व मजुरास आठ दिवस शेत नांगरण्याकरितां आठ रुपये दिले, ते अशाकरितां कीं त्यानें तें शेत नांगरून त्याचें मोल अधिक केलें. मजुरानें धन उत्पन्न केलें, आणि उत्पन्न केलेलें धन किंवा त्याचा अंश हें त्याचें वेतन झालें. श्रम आणि भांडवल यांच्या योगानें उत्पन्न होणाऱ्या धनाचें मोल हेंच वेतन व नफा यास मूळ कारण आहे, यांत संशय नाहीं; परंतु भांडवलवाल्यानें जोंवर सर्व जोखीम आपल्या शिरावर घेऊन उत्पन्नास बाजार दिसेपर्यंत मजुरास दरमाहाप्रमाणें कांहीं महिने किंवा वर्षें तो मजुरी देत आहे, तसेंच पुढें माल नासला तरी त्यास तें वेतन द्यावें लागत आहे, तावत्कालपर्यंत भांडवलांतून, ह्मणजे नवीन धनाच्या उत्पत्तीस मदत करण्यासाठीं संचित केलेल्या धनांतून तो तें वेतन देतो हें उघड आहे. उदाहरणार्थ एका शेताचा मालक तें पेरण्याकरितां व त्याची राखण करण्याकरितां वेतन देतो. हें तो अशासाठीं करतो कीं, उत्पन्न आल्यावर, आपणास वेतनास खर्च आला तो उगवून त्यावर आणखी फायदा येईल; परंतु ह्या त्याच्या आशेचा भंग होणार नाहीं कशावरून ? अवर्षण पडल्यास पीक कांहींच येणार नाहीं. श्रमाचें वेतन उत्पन्नांतून मिळावें असें असतें तर ज्या मजुरांनीं शेत पेरून त्याची राखण केली त्यांस कांहींच मिळणार नाहीं असें होईल. परंतु हल्लींच्या स्थितींत अशा प्रकारचें जोखीम आपणावर घेण्यास मजूर लोक समर्थ नाहींत, कारण त्यांचा श्रम फुकट गेल्यास त्यांना पोट भरण्यास दुसरें साधन नाहीं. ह्मणून त्यास आपला श्रम कांहीं

किंमत ठरवून भांडवलवाल्यास विकावा लागतो. ही किंमत सरासरीनें पाहतां त्यांच्यावर व्यापाराच्या उलाढालीचें जोखीम असून जी त्यांस येती त्याहून कमी येते, परंतु त्यांचा एक फायदा असतो तो हा कीं कांहीं नियमित द्रव्य त्यांस दरमाहा मिळतें.

**वेतनफंड.** वेतनांत जें धन खर्च होतें त्यास कांहीं अर्थशास्त्रकार वेतनफंड ह्मणतात. ह्मणून वेतनफंडाचा अर्थ असा समजूं नये कीं, प्रत्येक भांडवलवाल्यापाशीं वेतन देण्याकरितां ह्मणून एक रकम ठेवलेली असते, व तिचा उपयोग दुसरीकडे करावयाचा नाहीं; तर वेतनफंड ह्मणण्याचा अर्थ असा कीं धंद्यांत मोठ्याशा उलाढाली होत नसल्यास प्रत्येक कारखान्यांत जें एकंदर भांडवल असतें त्याचे दोन भाग कल्पितां येतील, ह्मणजे मजुरास वेतन देण्याकरितां लागणारें भांडवल व इतर भांडवल या दोन प्रकारच्या भांडवलांत कांहीं प्रमाण असतें; आणि ह्मणूनच, बाकीच्या गोष्टी सारख्या असल्यास धंद्यांत वेतनेतर भांडवल वाढल्यास वेतनफंड त्या मानानें वाढविला पाहिजे.

हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, वेतनांत खर्चिलेलें सर्वच धन उत्पादक श्रमकारांचे पोषणास लागत नाहीं. त्यांतील बराच भाग अनुत्पादक श्रम करणाऱ्या लोकांकडे जातो. वेतनफंडाचा जो भाग उत्पादकश्रमास पोंचतो तेंच भांडवल. यामुळेंच वेतनफंडाचे मुख्य दोन भाग होतातः—१ ला. उत्पादकश्रमाच्या पोषणास लागून देशाच्या साधारण भांडवलाचा जो अंश होतो तो; आणि २ रा, जो अनुत्पादकश्रमाचें पोषण करून अनुत्पादक खर्चास जातो तो.

**धनोत्पत्तीस भांडवलापासून दुसरा एक उपयोग होतो त्याचें उदाहरण.** श्रमकारांचें पोषण करणें हाच केवळ भांडवलापासून धनोत्पादनास उपयोग होतो असें नाहीं.

नवीन धन उत्पन्न करण्याकरितां जें धन राखून ठेविलें असतें तें सर्व भांडवल होय. इमारती, यंत्रें आणि हत्यारें जीं पुढील धनोत्पादनाचे कामीं उपयोगीं पडतात तींही भांडवल होत. बहुतेक कारखाने चांगले चालण्यास मोठमोठ्या इमारती व भारी किंमतीचीं यंत्रें यांची आवश्यकता असते. उदाहरणार्थ लोंकरीचीं वस्त्रें विणण्याचा कारखाना घ्या. ह्या कारखान्याच्या मालकापाशीं वेतनाला पुरेसें भांडवल असून, इमारती, यंत्रें व हत्यारें यांकरितां आणखीही पुष्कळ भांडवल असलें पाहिजे. कारखानदाराचें सर्वच धन भांडवल असतें असें समजूं नये; कारण त्याच्या संपत्तीचा कांहीं अंश ऐषआरामांत जातो. नवीन धन उत्पन्न करण्याकरितां संपत्तीचा जेवढा भाग तिकडे लावणें असेल तेवढ्यासच भांडवल ह्मणावें. भांडवलासंबंधानें मिल्ल साहेब ह्मणतो "धनोत्पादनास भांडवलाचा हाच उपयोग होतो कीं, त्याच्या योगानें जें काम करावयाचें असेल त्यास अवश्य लागणारा आश्रय, हत्यारें, सामान यांचा पुरवठा होतो आणि काम करित असतां श्रमकरणारांचें पोषण व पालन होतें. पूर्वश्रम व पूर्वश्रमाचें फळ यांची चालू श्रमास हींच कामें करून घेण्यासाठीं आवश्यकता आहे. ज्या ज्या वस्तु ह्या उपयोगाकरितां ह्मणजे उत्पादकश्रमास वर सांगितलेल्या अवश्य पुरवितां याव्या ह्मणून राखून ठेविल्या असतात त्या भांडवल होत."

**जिनसाची अपेक्षा ही श्रमाची अपेक्षा नव्हे.** वर सांगितलें आहे कीं कारखानदाराच्या संपत्तीचा जो भाग ऐषआरामांत जातो तो भांडवल नव्हे, परंतु नवीन धन उत्पन्न करण्याकडे जो भाग लागतो तोच संपत्तीचा भाग भांडवल होय. परंतु कोणी असें ह्मणेल कीं, कारखानदार जें धन चैनींत खर्चितो त्यानें श्रमाचें पोषण होतें. उदाहरणार्थ ५०० रुपयांचा

कलाबतु त्यानें खरेदी केल्यास, तो कलाबतु तयार करणाऱ्या लोकांचें पोषण ५०० रुपयांनीं झालें. ते रुपये त्यानें आपल्या कारखान्यांत घातले असते तर त्यांस जसें भांडवल ह्मटलें असतें तसें यास ह्मणतां येणार नाहीं काय ?

याकरितां आपणांस भांडवलाविषयींच्या फार महत्त्वाच्या सिद्धांताकडे वळलें पाहिजे. हा सिद्धांत विद्यार्थ्यानें पक्का समजून घेणें अवश्य आहे.

तो सिद्धांत हा कीं जिनसांची अपेक्षा ही श्रमाची अपेक्षा नव्हे.

श्रमाचें वेतन देण्याकरितां भांडवलाची जी रक्कम प्रत्यक्ष लाविली असते, तिजवर श्रमाची अपेक्षा अवलंबून असते. श्रमाची दिशा कोणीकडे वळवावी हें जिनसांच्या अपेक्षेवरून ठरतें.

**एक उदाहरण.** या सिद्धांताचा खरेपणा उदाहरणें घेऊन चांगला दाखवितां येईल. कल्पना करूं कीं, कोणी एक लोंकरीचा कारखानदार जरीचे कपडे घेण्यांत सालीना ५०० रुपये खर्चितो. आतां कोणी असें ह्मणेल कीं, त्यानें ५०० रुपये जरीच्या कपड्यांत खर्च केले काय, किंवा आपल्या कारखान्यांत अधिक मजूर ठेवण्यांत खर्च केले काय, अर्थ एकच. कारण कारखानदारानें आपला कारखाना वाढविला असता, तर जशी ती रकम लोंकरीचें कापड करणाऱ्या मजुरांच्या मजुरीकडे खपती तशी ती जर (कलाबतु) तयार करणाऱ्याकडे खपली. कापड काढणारे अधिक लोक कामावर ठेवण्यासाठीं त्यानें जराची खरेदी बंद केली तर फक्त जर तयार करणारांचे ५०० रुपये कापड करणारांकडे गेले एव्हढेंच नव्हे काय ? या प्रश्नाचें उत्तर बरोबर समजण्यास आपण अशी कल्पना करूं कीं, कारखानदारानें जर विकत न घेतां ते ५०० रुपये कापड काढणारे अधिक लोक

कामावर ठेवण्याकडे लावले तर काय होईल? जराचा खप कमी झाल्यामुळें, जर करणारा माल कमी तयार करील व कमी खपाच्या मानानें आपल्या धंद्यांतून भांडवल काढील. आतां आपल्या मालाचा खप कमी झाला, ह्मणून जर करणारा अधिक उधळ्या होईल, असें किंवा धंद्यांतून काढलेल्या भांडवलापासून कांहींच फायदा करून घेणार नाहीं असें मानण्यास ज्या अर्थी कांहीं कारण नाहीं, त्या अर्थी तें भांडवल तो दुसऱ्या एखाद्या व्यापारांत घालील असेंच मानणें योग्य होणार आहे. त्याचा पहिला ग्राहक लोंकरीच्या कापडाचा कारखानदार हा आपल्या मजुरास जें वेतन देत आहे तें जरवाल्याचे भांडवलापैकीं नव्हे; तें भांडवल निराळें आहे, आणि मजुरास देण्यास५००रुपयांच्या जागीं आतां १००० रुपये झाले. जर करणारांचें वेतन काढून तें कापड करणारांस दिलें नाहीं. कापड करणारांचें काम वाढून कांहीं जर करणारांचें काम दुसऱ्या धंद्यांत गेलें. (मिल्हचीं अर्थशास्त्राचीं मूलतत्त्वें, भाग १ पृ. १०२)

ह्या उदाहरणावरून दिसून येईल कीं, ऐषआरामांत खर्च करणें हें व्यापारास चांगलें, असा जो कांहीं लोकांचा समज आहे तो चुकीचा आहे. चैनीच्या पदार्थांचा उपभोग केल्यानें वेतन मिळविणाऱ्या लोकांचें कांहींच कल्याण होत नाहीं; आणि ऐषआरामांत खर्च केलेला पैसा जर शेतकीसारख्या धंद्यांतून काढलेला असेल, तर मजुरलोकांचें नुकसान दोन प्रकारांनीं होतें. वरील उदाहरणांत सांगितल्याप्रमाणें ऐषआरामांत केलेल्या खर्चाच्या मानानें वेतनफंड कमी होतो हें एक. व दुसरें असें कीं, धनाची उत्पत्ति व त्या पासून होणारी भांडवलाची वृद्धि यांस धक्का बसतो.

**दुसरें उदाहरण.** शेवटच्या मुद्याची बरोबर समजूत

पडण्यास दुसरें उदाहरण घेऊं. या उदाहरणावरून जिनसांची अपेक्षा ही श्रमाची अपेक्षा नव्हे, या सिद्धांताचें सत्यत्व चांगलें ध्यानांत येईल. एका शेतकऱ्यानें आपल्या जवळचे गहूं विकून कांहीं जिन्नस खरेदी केले. त्या जिनसांचा व्यय त्यानें जर अनुत्पादक रीतीनें केला तर त्यांच्या मोलाइतकी रकम देशाच्या भांडवलांतून कमी झाली, असें समजलें पाहिजे. आतां त्या जिन्नसांचा त्यानें उत्पादक रीतीनें खर्च केला तर देशाचें भांडवल वाढलें. ह्मणजे तो शेतकरी गहूं विकून जर मखमाल खरेदी करील तर ह्या खरेदीनें धनोत्पादनास कांहीं साह्य होत नाहीं. मखमाल खरेदी केल्यानें हौस पूर्ण होऊन त्यास सुख होईल, परंतु ती फाटून गेली ह्मणजे तितकें धन नाहींसें होऊन त्यापासून पुढें कांहींच उत्पन्न होणार नाहीं असें झालें. आतां शेतकरी मजुरांस वेतन देण्याकरितां गहूं विकील, तर असें होईल कीं ते मजुर लोक त्या वेतनानें आपल्या पोषणास अवश्य असे पदार्थ घेतील. ह्या पदार्थांचा व्यय मात्र उत्पादक रीतीनें झाला, असें ह्मटलें पाहिजे; कारण, ते पदार्थ नवीन धन उत्पन्न करीत असतां श्रम करणारांचें पोषण करतात. पहिल्या गोष्टींत मखमालीच्या खरेदीपासून खरेदी करणाराच्या हौसेपलीकडे कांहीं परिणाम झाला नाहीं; दुसऱ्या गोष्टींत मजुर लोकांनीं–भाकर वगैरे अवश्य पोषणाचे पदार्थ खरेदी करून नवीन धन उत्पन्न केलें.

धनाचा जो भाग ऐषआरामाच्या पदार्थांचा असतो त्याचा व्यय उत्पादक रीतीनें होत नाहीं, ह्मणून चैनींत व्यय केल्यानें देशाचें भांडवल कमी होतें; कारण नवीन धन उत्पन्न करण्यास सहाय व्हावें ह्मणून जें धन राखून ठेविलें असतें त्यास भांडवल ह्मणावयाचें. परंतु कोणी अशी शंका घेतील कीं, जे लोक ऐषआरामाचे पदार्थ उत्पन्न करितात ते देशाचें भांडवल कमी

करितात, पदार्थ विकत घेणारे लोक करीत नाहींत. ऐषआरामाच्या पदार्थास खप नसेल तर कारखानदार ते तयार करणार नाहींत; हें लक्षांत ठेवल्यास वरील शंका निघणार नाहीं. जिनसांच्या अपेक्षेनें भांडवल व श्रम हीं वाढत नाहींत पण त्यांचा कोणीकडे उपयोग करावा ही दिशा ठरते.

**आणखी एक उदाहरण.** वर सांगितलेल्या तत्त्वाच्या स्पष्टीकरणार्थ असें उदाहरण घेऊं कीं, एका मौल्यवान् चित्राचा मालक तें विकून जवाहीर खरेदी करणार आहे. आतां कांहीं कारणामुळें चित्राचा नाश होऊन त्यास जवाहीर खरेदी करतां आलें नाहीं, तर, वेतनफंड व श्रमकारांची स्थिति यावर जो परिणाम झाला असता तोच त्याची खरेदी साधली असतां होईल. चित्राचा नाश झाल्यास त्याच्या किमती इतक्या रकमेनें जवाहिराची अपेक्षा कमी होईल; जवाहिराचा मालक त्या मानानें आपलें भांडवल व्यापारांतून काढील, परंतु तो तें दुसऱ्या व्यापारांत घालील. ह्मणून देशाच्या भांडवलांत कमज्यास्त होणार नाहीं.

**या विषयाचें दुसरें स्वरूप.** वर सांगितलें कीं, चैनीचे पदार्थ खरेदी करण्यापासून वेतनफंड किंवा श्रमकारांची स्थिति यांचें कांहींच चांगलें होत नाहीं, परंतु आणखी एका गोष्टीचा विचार होणें आहे. एका शेतकऱ्यापाशीं २००० रुपये आहेत. तो हे २००० रुपये मजुरांस वेतन देऊन आपल्या शेताची सुधारणा करण्यांत खर्चित नाहीं, पण मजुरांस वेतन देऊन त्यांजकडून आपलें घर रंगवून सुशोभित करण्याकडे खर्चितो. दोन्ही गोष्टींत २००० रुपये थेट श्रमकारांच्या खिशांत जातात. ह्मणून कोणास वाटेल कीं दोन्ही गोष्टींत श्रमकारांचें सारखेंच हित होतें. तर तात्कालिक परिणाम मात्र सारखाच होतो, परंतु शेवटीं एकंदरींत त्याचा परिणाम फार निराळा होतो. प-

हिल्या गोष्टींत मजूर लोक वेतन घेतात व नवीन धन उत्पन्न करितात, त्यामुळें भांडवल सांठून वेतनफंड वाढतो. दुसऱ्या गोष्टींत मजुरांच्या हातांत वेतन पडतें त्या वेळेपुढें त्याचें कांहींच हित होत नाहीं, कारण त्यांच्या श्रमापासून नवीन धन उत्पन्न होत नाहीं, आणि यामुळेंच देशाचें भांडवल वाढत नाहीं.

**भांडवल संचयानें होतें.** संचय केल्यानें भांडवल होतें, खर्च केल्यानें होत नाहीं, हें वर दाखविण्यांत आलें आहे. जो उधळ्या मनुष्य आपला ऐवज चैनबाजींत उडवितो, तो देशाचें भांडवल कमी करतो; याकरितांच पाहिजे तसा खर्च केल्यानें व्यापारास चांगलें, अशी जी कांहीं लोकांची समजूत असते ती भांडवलासंबंधानें चुकीच्या कल्पना केल्यामुळें होय. मार्च महिन्यांत एक अननस उत्पन्न करण्यासाठीं जर दोन टन दगडी कोळसे लागले, तर इतकें धन व्यर्थ गेलें, किंवा निदान थोडा वेळ मनुष्यांचीं तोंडें गोड करण्याहून त्यांचा उपयोग अधिक कांहींच झाला नाहीं. हेच कोळसे लोखंड वितळविण्यास किंवा धूर करायास लाविले असते तर त्यांचा उत्पादकपणा फार वाढता.

सर्व प्रकारच्या अनुत्पादक व्ययापासून राष्ट्राचें भांडवल कमी होतें, किंवा त्याची वृद्धि बंद होते. उत्पादक रीतीनें धनाचा खर्च झाल्यास श्रमकारांचें जसें हित होतें तसें त्यांस धर्म करण्यानें होत नाहीं. उत्पादक व्यय केल्यानें राष्ट्राचें भांडवल वाढून वेतनफंडांत भर पडते.

**भांडवलापासून कार्य होण्यास त्याचा व्यय केला पाहिजे.** भांडवल हें जरी संचयाचें फळ आहे, तरी संपत्ति जमिनींत पुरून ठेवल्यानें देशाचें भांडवल वाढतें असें समजूं नये. भांडवलापासून कार्य होण्यास त्याचा व्ययच झाला पाहिजे.

हें लक्षांत वागविलें पाहिजे कीं, नवीन धन उत्पन्न करण्याकरितां जें धन राखून ठेविलें असतें तें भांडवल, उत्पादनास त्यापासून साह्य होतें तें हेंच कीं, श्रमकारांची उपजीविका होते, व कामास अवश्य लागणाऱ्या गोष्टी ह्मणजे आश्रय, हत्यारें व कच्चामाल यांचा पुरवठा होतो. ही व्याख्या लक्षांत ठेवल्यास स्पष्ट दिसेल कीं, भांडवलापासून कार्य होण्यास त्याचा सर्वस्वी किंवा अंशत: व्यय झाला पाहिजे. ज्या अन्नापासून मजुरांचें पोषण होतें त्याचा फडशा एकदम होतो; कामास अवश्य लागणाऱ्या इमारती, यंत्रें, व हत्यारें हीं निरुपयोगी होण्यास किंवा यांचा नाश होण्यास काळ लागतो. आतां हें त्वरित लक्षांत येईल कीं, ज्यापासून श्रमकारांचें पोषण होतें तें अन्न, इमारती, यंत्रें, व हत्यारें यांच्या प्रमाणेंच कार्य करीत नाहीं. यांत एक महत्त्वाचा भेद दिसतो.

**फिरतें भांडवल.** कोणत्याही धंद्यांत घातलेल्या भांडवलाचा कांहीं भाग असा असतो कीं, त्याचा उपयोग एकवारच व्हावयाचा, जसें मजुरांस पोसणारें अन्न किंवा भट्टींत घातलेले कोळसे, ह्या भांडवलास फिरतें भांडवल ह्मणतात. फिरत्या भांडवलाची व्याख्या मिल्लसाहेबानें दिली आहे ती अशी:—धनोत्पादनांत जें भांडवल आपलें सर्व कार्य एका उपयोगानेंच करतें त्यास फिरतें भांडवल ह्मणावें.

**स्थिरभांडवल.** जें भांडवल श्रमकारांचें पोषण करण्यास, किंवा धंद्यास लागणारे पदार्थ आणि सर्पण वगैरे पुरविण्याकडे योजिलेलें असतें, त्याखेरीज प्रत्येक धंद्यांत बरेंच भांडवल कायमच्या स्वरूपाचें असतें. जसें, इमारती, यंत्रें वगैरे. पेरणी करण्यास योग्य अशी जमीन तयार करण्याचें काम नांगराचें आहे, हें काम नांगराकडून तो झिजून जाईपर्यंत बहुतवेळां होतें. कामकरी लोकांनीं

8680

काम करण्याकरितां व सामानसुमान ठेवण्याकरितां बांधिलेल्या इमारती बहुत काल टिकतात. ह्या प्रकारच्या भांडवलाचें स्वरूप कायमचें असतें. तें एकवार उपयोग केल्यानें नाश पावत नाहीं. ह्मणून त्यास स्थिर भांडवल ह्मणतात.

**फिरत्या भांडवलाचें सर्व फळ एकदम मिळतें; स्थिर भांडवलाचें फळ येण्यास तें जितका काळ उपयोगांत येतें तितका काळ लागतो.** फिरत्या भांडवलाचें सर्व मोल व त्यावरचा नफा नवीन उत्पन्नाच्या मोलांतून लागलाच भरून येतो; परंतु स्थिर भांडवलाचें असें नसतें; लागलेंच आलेल्या उत्पन्नाचें मोल फक्त झिजलेलें भांडवल व नफा यांच्या इतकेंच असतें. शेतकऱ्यानें मजुरांचें वेतन देण्यांत, व बीं पैदाकरण्यांत जें भांडवल खर्चिलें असेल त्या सर्वांची फेड शेतांतील उभ्या पिकापासून व्हावी असें त्याचें धोरण असतें. परंतु त्यानें जर वाफेचा नांगर खरेदी केला तर त्याचा उपयोग तो पुष्कळ वेळां व पुष्कळ वर्षें करील. ह्मणून मूळच्या भांडवलाची फेड होण्यास त्या नांगराचा उपयोग जितके दिवस करतां येईल तितका काळ लागेल.

फिरत्या भांडवलाचें स्थिर भांडवल केल्यानें मजुरांस वारंवार अल्पकाळ नुकसान कां सोसावें लागतें, हें या गोष्टीवरून चांगलें समजेल. मजुरांचें वेतन ज्याला वेतनफंड ह्मणतात तें फिरतें भांडवल असतें, असें वर सांगितलेंच आहे; ह्मणून ज्या गोष्टीनें फिरतें भांडवल कमी होतें त्या गोष्टीमुळेंच वेतनही कमी होतें. यास उदाहरण, जर एक कारखानदार यंत्रें खरेदी करण्याकरितां आपल्या भांडवलांतून १००० रुपये काढील तर त्याच्या हाताखालच्या कांहीं लोकांचें काम बंद होईल, व मजुर लोकांत चढाओढ होऊन वेतनाचा दर उतरेल.

फिरतें भांडवल स्थिर केल्यानें मजुरांचें नुकसान स्वल्पकाळ होतें. यंत्रें सुरू केल्यानें श्रमाची उत्पादक शक्ति फार वाढते, व त्यामुळें भांडवलाची वृद्धि होते; ह्मणूनच शेवटीं वेतनफंडही वाढतो. उदाहरणार्थ असें घेऊं कीं, विलायतेंत रेलवे बांधण्यास लागलेलें भांडवल देशांतील फिरत्या भांडवलांतून काढलें असावें. वेतनफंड कमी झाल्यामुळें मजुरांचें अल्पकाळ नुकसान झालें. परंतु रेलवे बांधल्यानें इग्लंड देशाची संपत्ति इतकी वाढली कीं, शेवटीं श्रमाची अपेक्षा वाढून वेतन वाढलें. यामुळें मजुरांचें झालेलें अल्प नुकसान भरून येऊन त्यांचा अधिक फायदा झाला.

**संचय करण्याची इच्छा होण्यास दोन कारणें आहेत.** वर सांगितलें कीं भांडवल हें संचयाचें फळ होय. ह्मणून भांडवलाची वृद्धि ह्मणजे अधिक संचय होय हें उघड आहे. भिन्न काळीं आणि भिन्न देशीं संचय करण्याची इच्छा कमज्यास्त प्रबळ असते. ही इच्छा होण्यास बहुधा दोन कारणें असतात:—पहिलें, पुढें येणाऱ्या काळाकरितां शहाणपणाची कांहीं तरतूद; दुसरें, व्यापारांत भांडवल घालून संपत्ति मिळविणें. इंग्लंडांत हीं दोन्हीं कारणें प्रबळ असतात; यास कांहीं अंशीं राष्ट्राचा स्वभाव व लोकांच्या सवयी हीं कारणें, व कांहीं अंशीं तेथें जिवास व मालमत्तेस असणारा निर्भयपणा हेंही कारण होय. रानटी समाजांत संचय करण्याची इच्छा नसते. याचें कारण त्या लोकांस पुढली काळजी वागवितां येत नाहीं, त्यांना कायती चालू वेळेची काळजी; पुढें येणाऱ्या काळाविषयीं त्यांच्या मनांत अंधार असतो, व ते त्यासंबधानें विचार करण्याची तसदी घेत नाहींत. कांहीं ठिकाणीं मालमत्ता सुरक्षित राहात नसल्यामुळें संचयाची इच्छा कमी असते. ज्या देशांत कायमचें

सरकार नाहीं, तेथें संपत्तीच्या मालकास ती आपल्यापाशींच राहील अशी खात्री नसते. तिच्यावर शेजाऱ्यांचा डोळा असतो, व बहुधा ते सर्वच त्याच्या घरावर दरवडा घालण्यास तयार असतात.

**जुटीनें व्यापार करणाऱ्या मंडळ्या.** इंग्लंडासारख्या देशांत लहान भांडवलें व्यापारांत घालण्यास पुष्कळ मार्ग असतात ह्मणून संचयास उत्तेजन येतें. कारण लहान भांडवलें स्वतंत्र व्यापारांत घालूं ह्मटल्यास फायदा होणार नाहीं. जर एका वकिलानें किंवा डाक्तरानें १००० रुपये सांठवून ठेविले असले, तर ही रकम व्यापारांत घालण्याची बहुतकरून त्यास संधि किंवा इच्छा नसते, परंतु त्याच्या मनांत जर तिचा भांडवलाप्रमाणें उपयोग करणें असेल, तर जुटीनें व्यापार करणाऱ्या मंडळींत ह्मणजे अनेक लोकांनीं भांडवल जमवून उभारलेल्या व्यापारांत तो आपला पैसा घालतो. ह्मणून जुटीनें व्यापार करणाऱ्या मंडळ्यांपासून देशाचा फायदा होतो हें उघडच आहे; कारण त्यांच्यापासून देशांतील भांडवलाची वृद्धि होण्यास चांगलें सहाय्य होतें.

ह्या गोष्टीवरून वाचकांच्या ध्यानांत येईल कीं, भांडवल वाढण्यास मालमत्तेस निर्भयता असणें हें फार महत्त्वाचें आहे. कांहीं वर्षांमागें कित्येक जुटीनें व्यापार करणाऱ्या मंडळ्यांचें दिवाळें निघालें; यामुळें भागीदारांचें फार नुकसान झालें, व कित्येक तर धुळीस मिळाले. त्या वेळीं लोकांत अविश्वास व अस्थिरपणा दिसूं लागला. अशा वेळीं मोठ्या काटकसरीनें कांहीं पैसा सांठविलेल्या कोणा गृहस्थास तुह्मी तो व्यापारी मंढळींत कां घालीत नाहीं. असें कोणीं विचारिलें तर तो असें उत्तर देई कीं "नको बाबा, मी नाहीं आपला पैसा धोक्यांत घालणार, ते आमचे मित्र अ, ब, क यांना अमक्या अमक्या व्या-

पारांत पैसे घालून कशी ठोकर लागली आहे पहा." परंतु लोकांस अशा प्रकारच्या भीतीचा विसर लवकर पडतो. जाहिरातीच्या भपक्यास भुलून मोठ्या व्याजाच्या लालुचीनें पुष्कळ लोक आपला पैसा लबाड व दिवाळखोर व्यापारी मंडळ्यांच्या घरीं घालतात.

**भांडवलाची रेलचेल.** कांहीं लोकांचा समज असा आहे कीं, भांडवलाचा पुरवठा कमी करण्यापासून कांहींच नुकसान नाहीं, कारण त्यांच्यामतें वर सांगितलेल्या गोष्टी न घडतील व श्रीमान् लोक चैनींत पुष्कळ खर्च न करतील तर भांडवल फाजिल वाढेल. ह्मणजे भांडवलाची "रेलचेल" होईल. भांडवलाचें खरें स्वरूप मनांत आणल्यास, असें दिसून येईल कीं, भांडवलाची वृद्धि झाल्यापासून कोणत्याही प्रकारचे वाईट परिणाम होतील अशी भीति बाळगण्याचें मुळींच कारण नाहीं. भांडवल ह्मणजे नवीन धंन उत्पन्न करण्यास सहाय्य व्हावें ह्मणून ठेवलेलें धन असें वेळोवेळीं सांगण्यांत आलेंच आहे कामास लागणाऱ्या अवश्य गोष्टी ह्मणजे आश्रय, हत्यारें, यंत्रें आणि कच्चा माल यांचा पुरवठा करून व काम चालू असतां मजुरांचें पोषण करून तें राखून ठेवलेलें धन ह्मणजे भांडवल नवीन धन उत्पन्न करण्यास मदत करतें. भांडवलाचा संचय वाढल्यास तें नवीन उद्योगांत घालतां येईल किंवा चालू असलेल्या कारखान्यांत त्याची भर घालतां येईल. या दोन्ही गोष्टींत फिरतें भांडवल वाढून वेतनफंड ज्यास्त होईल; व यामुळें मजुरीचा दर वाढून मजुरांची स्थिति सुधरेल. आतां असें न होण्यास एक मात्र कारण आहे. तें हेंच कीं, वेतनफंड वाढल्याबरोबर त्या फंडाची वांटणी ज्या मजुरांमध्यें व्हावयाची त्यांची संख्या त्याच मानानें वाढल्यास मजुरीचा दर वाढणार नाहीं.

एवढ्यावरून हें उघड होतें कीं ज्या गोष्टीच्या योगानें भांडवल वाढतें त्याच गोष्टीच्या योगानें गरीब लोकांची स्थिति बरी होते या गोष्टीपासून व्यवहारांत फार महत्वाचीं अनुमानें निघतात, कारण त्यावरून अशी खात्री होते कीं, भांडवलवाला स्वतःचें व सर्व समाजाचें हित करतो, उधळ्या व दानधर्म करणारा करीत नाहीं.

धनाच्या उत्पत्तिसंबंधाचे मुख्य सिद्धांत तीन भागांत ह्मणजे जमीन श्रम आणि भांडवल या सदराखालीं सांगितले. नवीन शिकणारास भांडवलाच्या कार्याची समजूत पडण्यास कांहींसें कठिण गेलें असेल. हें काठिण्य दूर होणें अवश्य आहे, कारण तें पक्कें दूर होईपर्यंत, पुढें धनाच्या वांटणीसंबंधानें ज्या प्रश्नांचें विवेचन होणार आहे, तें अधिक भानगडीचें असल्यामुळें त्यांची समजूत पडणें अवश्य आहे.

### ३ ऱ्या भागावर प्रश्न. भांडवल.

१. भांडवल कशास ह्मणतात ?

२. उदाहरणें घेऊन असें दाखवा कीं उत्पादनास भांडवल अवश्य आहे.

३. वेतनफंड कशास ह्मणतात ?

४. ज्या निरनिराळ्या प्रकारांनीं भांडवल उत्पादनास मदत करतें ते प्रकार सांगा.

५. ऐषआरामांत खर्चिलेलें धन भांडवल नव्हे, व ह्मणूनच त्यापासून उत्पादनास सहाय्य होत नाहीं. असें सिद्ध करून दाखवा.

६. उदाहरणें देऊन सिद्ध करा कीं जिनसांची अपेक्षा ही श्रमाची अपेक्षा नव्हे.

७. चैनीचा खर्च व्यापारास चांगला असें मानणें चुकीचें कां ? याचीं उदाहरणें द्या.

८. संचयापासून भांडवल होतें, परंतु सांठवून ठेवलेलें धन देशाचें भांडवल वाढवितें काय ?

९. स्थिर आणि फिरतें भांडवल यांतील भेद कोणता ?

१०. फिरतें भांडवल बहुधा कोणतें असतें ?

११. फिरतें भांडवल स्थिर केल्यानें मजुरदारांचें केव्हां केव्हां अल्पकाल नुकसान होतें, तें कसें ?

१२. संचयाची इच्छा कोणकोणत्या गोष्टींपासून उत्पन्न होते व वाढते ?

१३. भांडवल वाढण्यास व्यापारांत नीति कशी कारण होते?

१४. भांडवलाची रेलचेल ह्मणजे काय ?

१५. भांडवलाच्या रेलचेलीपासून भय मानणें हें काल्पनिक आहे असें दाखवा.

१६. या भागांत सांगितलेल्या सिद्धान्तावरून असें दाखवा कीं, भांडवलवाला हाच वेतन घेणाऱ्या लोकांचा खरा कल्याण करणारा होय, उधळ्या किंवा दानधर्म करणारा हा नव्हे.

---

१. माझ्या जवळची शाई भांडवल आहे काय ? जर मज-जवळ ५००००० ग्यालन शाई असेल तर भांडवलाची रेलचेल झाली काय ?

२. गाडीचा घोडा भांडवल आहे काय ? आणि असेल तर तें भांडवल स्थिर किंवा फिरतें ?

३. बंदुकी वगैरे दारू उडविण्याचीं हत्यारें, भांडवल आहेत काय ?

४. एका मुलानें दररोज जर आठ आण्यांची मिठाई खाल्ली, तर तो श्रमाची अपेक्षा वाढवील काय ?

५. एका गृहस्थानें जर ५०००० रुपये पेटींत बंद करून ठेवले तर त्यांस भांडवल ह्मणावें काय ?

६. तेच त्यानें रेलवेकंपनीमध्यें घातले तर तें भांडवल होईल काय ?

७. एखाद्या राष्ट्रास लढाई करणें असून त्यासाठीं त्यानें तें त्या राष्ट्रास कर्ज दिल्यास भांडवल होईल काय ?

८. जर असा कायदा असला कीं, कांहीं लोकांनीं दुसऱ्यांस खुशाल लुटावें व लुटलेल्या लोकांस कोणत्याही प्रकारची दाद मिळूं नये, तर या कायद्याचा परिणाम द्रव्यसंचयावर काय होईल ?

९. सैंपाक्याचा श्रम उत्पादक कीं अनुत्पादक ?

---

# खंड २.

## धनाची अदलाबदल.

### विषयारंभ.

**अदलाबदलीपासून खासगी मालमत्तेचें अस्तित्व गर्भित होतें.** धनाची अदलाबदल असें ह्मणण्यांत मालकीचें अस्तित्व मानावें लागतें. त्यावरून असें दिसून येतें कीं, स्वामित्व हें सर्व समाजाचेंच नसून व्यक्तीचें किंवा वर्गाचें असूं शकेल. (Acts of the Apostles.) "ईश्वराच्या प्रेषितांचीं कृत्यें" या नांवाच्या ग्रंथांत वर्णन केलें आहे कीं, प्राचीन ख्रिस्ती लोकांत मालमत्ता सर्व समाजाची असे. असें असेल तेथें धनाची अदलाबदल हें नांवच घ्यावयास नको. "त्यांपैकीं कोणीही ह्मणत नसे कीं अमकी वस्तू माझी आहे; परंतु सर्व जिनसांवर सर्वांचें स्वामित्व सारखेंच असे. त्यांच्यांत कोणासही कांहीं कमी नव्हतें; कारण, ज्यांच्या जमिनी किंवा घरें होतीं तीं त्यांनीं विकून त्यांच्या किमती ते प्रेषितांच्या पायांपाशीं आणून ठेवीत: आणि प्रत्येक मनुष्यास त्याच्या गरजेप्रमाणें वांटणी मिळे.

त्याची देवघेव कशी व्हावी ? ह्मणून धनाची अदलाबदल असें ह्मणण्यांतच व्यक्तीची मालकी समजली जाते; यासाठीं धनाची अदलाबदल ह्या विषयाची फोड करण्यापूर्वी, कोणकोणत्या वर्गांत व लोकांत धनाची वांटणी होते, व त्या वांटणींचे नियम काय आहेत याचें विवेचन करणें योग्य होतें. तथापि उलटा क्रम सुरू करण्याचें कारण हें कीं, मोल आणि किंमत या शब्दांचा अर्थ बरोबर समजेपर्यंत व ज्या कारणावरून जिनसांचें मोल ठरतें, तीं कारणें मनांत पक्कीं बिंबतपर्यंत, धनाची वांटणी, सारा, वेतन व नफा अशी ज्या गोष्टींवरून होते त्यांचें वर्णन थोडक्यांत करणें कठिण आहे. ह्मणून या खंडांत मोल, किंमत आणि मूळखर्च ह्मणजे काय हें सांगून जिनसांच्या तीन वर्गांचें मोल ज्या कारणांनीं नियमित होतें, तीं कारणें सांगावीं असा हेतु आहे. हे तीन वर्ग ह्मणजे, ( १ ) ज्या जिनसांची संख्या कधीं वाढावयाची नाहीं; ( २ ) ज्यांची वृद्धि त्या उत्पन्न करण्याची किंमत वाढविल्याखेरीज होणार नाहीं; ( ३ ) आणि ज्यांस अधिक खर्च न पडतां ज्यांची वृद्धि करतां येते. यांत पैशाचें स्वरूप आणि कार्यें यांचाही उलगडा होईल.

ही प्रस्तावना संपविण्यापूर्वी सोश्यालिझम् ह्मणजे काय याचा विचार करणें इष्ट आहे. सोश्यालिझमचें मुख्य तत्त्व हें कीं, व्यक्तींची मालकी असूं नये. सर्वांनीं आपआपल्या शक्तीप्रमाणें श्रम केले पाहिजेत, व त्यांच्या गरजेच्या प्रमाणानें त्यांस धन मिळालें पाहिजे, केलेल्या कामाच्या प्रमाणानें मिळूं नये.

**अर्थशास्त्रदृष्ट्या सोश्यालिझमचे दोषः**—सोश्यालिझमच्या मतास अनुसरून ज्या व्यवस्था केल्या आहेत त्यांच्या विरुद्ध पुष्कळ आक्षेप अर्थशास्त्रदृष्ट्या आणतां येतील. पहिला आक्षेप असा कीं, स्वार्थ हा मनुष्यास उद्योग करावयास लावतो, परंतु त्याचें प्राबल्य सोश्यालिझममध्यें कमी असतें; कारण आपल्या श्रमाचें फळ सर्व समाज वांटून घेणार, असें झाल्यावर मोठ्या जोरानें व उत्सुकतेनें मनुष्य काम करणार नाहीं, परंतु आपल्या श्रमाचें सर्व फळ आपल्यास व आपल्या कुटुंबास मिळेल अशी त्याची खात्री असते, तेव्हांच तो श्रम करण्यांत आपली पराकाष्ठा करील. दुसरें असें कीं, पुष्कळ लोक पुढली काळजी मुळींच न बाळगतां दिवाळखोरी करितात, त्यांच्यावरचा हल्लीं असलेला प्रतिबंध नाहींसा होईल. सोश्यालिस्ट समाजांतील सर्व लोक आपल्या बंधुवर्गाशीं आपलें कर्तव्यकर्म अत्युत्कृष्टरीतीनें जाणतात असें समजलें पाहिजे. चालू स्थितींत गरीब मनुष्यास फार कष्ट करून आपलें व आपल्या कुटुंबाचें पोषण करावें लागतें. तो पक्कें समजून असतो कीं, आपल्यास नवीन मूल झालें कीं त्याच्या संबंधानें कांहीं वर्षें सतत खर्च सोसला पाहिजे; ह्मणून तो उद्योगी व दूरदर्शी होण्यास चांगलीं कारणें सहज उत्पन्न होतात. परंतु सोश्यालिस्ट समाजांतील मनुष्यास असें वाटल्यावांचून राहावयाचें नाहीं कीं, आपण झटून एकसारखें काम केलें किंवा सावकाश खेळत खेळत केलें, तरी आपणास व आपल्या कुटुंबास खाण्यापिण्याला कांहीं कमी नाहीं; व त्याची आणखी अशी खात्री असते कीं, आपणास मरण आल्यास मागची काळजी मुळींच करावयास नको; कारण, कुटुंबास अन्नावांचून राहाण्याची पाळी येणार नाहीं. एबनेझर एलियट नांवाच्या गृहस्थानें धान्यावरच्या कायद्यावर कविता केल्या आहेत; त्या कवितांत त्यानें

कम्यूनिझम मताच्या दोषावर उपहासास्पद लेख लिहिला आहे. त्यांतील मतलब असा आहे कीं, ज्यास लोकांच्या अधिक उण्या प्राप्तींची वांटणी सारखी व्हावी असें वाटतें; व स्वतां आळशी असो किंवा अडाणी असो किंवा दोन्ही तऱ्हेचा असो; जो आपला तांब्याचा पैसा देऊन लोकांचा रुपया उपटण्यास तयार असतो त्यास कम्युनिस्ट ह्मणावें.

सोश्यालिझमचा रोंख, लोकवृद्धीस, मनुष्याच्या विवेकापासून होणारे प्रतिबंध ढिले करण्याकडे असतो, हें जाणून अमेरिकेंतील सर्व कम्युनिस्ट समाजांनीं लग्नें आणि जन्मसंख्या यांजवर करडी नजर ठेविली आहे. त्यांपैकीं भरभराटीस आलेल्या दोन समाजांतील लोक अगदीं अविवाहित आहेत; कांहीं समाजांत ब्रह्मचर्यव्रतास मोठा मान व उत्तेजन मिळतें; आणि ज्या समाजांत लग्नें करण्याची चाल आहे, त्यांत सुद्धां अधिकारीमंडळ, समाजाची चांगली वाईट स्थिति पाहून प्रजेची स्वाभाविक वृद्धि इतक्या सुलभ रीतीनें वाढवूं किंवा कमी करूं शकतें कीं, इंग्लंडांतील जमाबंदीचा अधिकारी सुद्धां प्राप्तीवरील करांत इतक्या त्वरेनें फेरफार करीत नसेल. ह्मणून असें होतें कीं, प्रजावृद्धीस दूरदर्शीपणानें होणारे प्रतिबंध शिथिल होतात. हा दोष काढतांना कम्युनिस्ट समाजाकडून दुसरी मोठी चुकी होते. ती अशी कीं, व्यक्तिस्वातंत्र्याचा नाश होऊन, स्वतंत्र लोकांस सहन होणार नाहीं अशा प्रकारचा सरकारचा अम्मल सुरू होतो. स्पार्टा संस्थानांत सोश्यालिस्ट तऱ्हेची राज्यव्यवस्था असल्यामुळें, तेथील सरकार प्रजेवर अगदीं क्षुल्लक गोष्टींत देखील नजर ठेवून त्यांचें नियमन करीत असे.

हे दोष सोश्यालिझममध्यें जरी मूळांतले आहेत, तरी हल्लींच्या वस्तुस्थितीचा कैवार घेणाऱ्यांनीं तें मत राक्षसी व दुष्ट असें

मानून त्याचा धिक्कार करूं नये. चालू व्यवस्थेंत सुधारणा करण्याचें कारण नाहीं, इतकी ती चांगली नाहीं; व हल्लींची सांपत्तिकव्यवस्था बदलून तिची दिशा सोश्यालिझमकडे वळविणें हें जरी इष्ट दिसलें नाहीं, तरी ज्या समाजांत पुष्कळ लोक भिकार आहेत, किंवा आज उद्यां भिकार होतील असे आहेत, त्यांत कांहीं तरी सुधारणा होणें अवश्य आहे; हें आपण कबूल केलें पाहिजे. दुसरी गोष्ट लक्षांत पाहिजे ती अशी कीं, कम्युनिझमचे कांहीं ठळक ठळक दोष समाजाच्या चालू स्थितींत आढळतात. इंग्लंडांतील गरीबांचा कायदा हा सोश्यालिस्टच ह्मटला पाहिजे. काम करणाऱ्या लोकांस दरआठवड्यास ठरींव वेतन देण्याच्या चालीमुळें, ते लोक अधिक ह्मटून उद्योग करीत नाहींत. उद्योगास इतकें कमी उत्तेजन कम्युनिस्ट मंडळींत नसेल. वारंवार असें नजरेस येतें कीं, याप्रमाणें ज्या लोकांस वेतन मिळतें, ते आपणास कामावरून दूर करतां येऊं नयेत, इतकी तजवीज ठेवून काम होईल तितकें कमी करण्यास पहात असतात. ज्यांचा पगार त्यांच्या कामावर अवलंबून नसतो, असे सरकारी नोकर पुष्कळ असतात. धर्मोपदेशक व दरबारचे मंत्री काम चांगलें करोत, किंवा वाईट करोत व केव्हां केव्हां अगदींच न करोत परंतु त्यांना पगार मिळतो तो मिळतो. येथें सोश्यालिझमचा पक्ष घेऊन भांडण्याचा आमचा उद्देश नाहीं, परंतु इतकेंच दाखवायाचें आहे कीं, सोश्यालिस्ट लोकांच्या मतांचा उपहास किंवा तिरस्कार करूं नये; परंतु कोणत्याही विषयाची वाटाघाट करण्यास व बरें दिसेल तसें वागण्यास लोकांस मोकळीक असावी, असें ज्यांस वाटत असेल, त्यांनीं पूज्यबुद्धीनें त्याचा विचार करावा. चालू व्यवस्थेचे दोष जर लक्षांत आणले, व जे कित्येक धर्मविषयकसमाज सोश्यालिझ-

मच्या मताप्रमाणें वागत असत त्यांत पूर्वीचे ख्रिस्ती लोक होते, हेंही मनांत आणलें तर सोश्यालिझममतावर आग पाखडण्यांत इतका आवेश व पांडित्य खर्च होणार नाहीं असें वाटतें.

फ्रान्सदेशांत **फुरिअर** आणि **सेंट सायमन** व इंग्लंडांत **राबर्त ओवेन** यांनीं जीं निरनिराळ्या प्रकारचीं सोश्यालिस्टमतें प्रतिपादन केलीं आहेत त्यांचें वर्णन स्थलसंकोचास्तव येथें देतां येत नाहीं. तीं बरोबर समजण्यास त्यांच्या ग्रंथांचें स्वतंत्र अध्ययन केलें पाहिजे. मिल्लसाहेबाच्या अर्थशास्त्राचीं मूलतत्वें, या ग्रंथांत हल्लींच्या शतकांतील मुख्य मुख्य सोश्यालिस्टव्यवस्थांचें थोडक्यांत व मनोरंजक असें वर्णन आहे. **सोश्यालिझम** किंवा ज्यास **कम्युनिझम** असेंही नांव दिलें आहे, याचा संबंध पारिसचें **कम्यून** यांच्या मताशीं मुळींच नाहीं, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. सन १८७१ सालीं पारिस शहरांतील ज्या लोकांनीं वरसालिस येथील फ्रेंच सरकारास अडथळा करून पारिस शहराच्या स्वातंत्र्याकरितां भांडण आरंभिलें त्यांत पारिसचें **कम्यून** असें नांव आहे. या पक्षांतील पुढाऱ्यांपैकीं कोणाचींच मतें सोश्यालिस्ट नव्हतीं.

## दुसऱ्या खंडांतील विषयारंभक सूचनेवर प्रश्न.

## धनाची अदलाबदल.

१. सोश्यालिझम ह्मणजे काय ?

२. अर्थशास्त्रदृष्ट्या सोश्यालिझममध्यें काय तोटे आहेत ?

३. सोश्यालिस्टमतांचा प्रसार करणाऱ्या कांहीं प्रमुख गृहस्थांचीं नांवें सांगा.

---

१. हल्लींच्या श्रमविभागास सोश्यालिझमच्या योगानें कांहीं अडथळा येईल असें तुह्मास वाटतें काय ? प्रत्येकाची मिळकत सारखीच झाल्यास घाणेरडें काम कोण करील ?

२. सोश्यालिझमच्या योगानें उत्पन्न कमी होऊन, धनाचा खप करणाऱ्यांची संख्या वाढली तर अतिदरिद्री लोकांचें तरी शेवटीं हित होईल काय ?

---

## भाग १ ला.

## मोल आणि किंमत.

अर्थशास्त्राचीं बहुतेक सर्व तत्वें चांगलीं समजण्यास मोल आणि किंमत या शब्दांचा अर्थ, त्यांच्यांतील भेद, आणि त्यांचा परस्पर संबंध हीं मनांत पक्कीं ठसलीं पाहिजेत.

**मोलाची व्याख्या.** कोणत्याही जिनसांचें मोल त्याची दुसऱ्या जिनसांशीं तुलना करून ठरवितात, किंवा त्यांच्या कमजास्तपणावरून, किंवा तो देऊन त्याबद्दल दुसऱ्या कोणत्या वस्तु मिळतील त्यांवरून ठरवितात. जर एक शेर चहा देऊन चार शेर मांस मिळेल, तर एक शेर चहाचें मोल चार शेर मांस असें ह्मणतां येईल. ह्मणून मोल या शब्दावरून तुलना दिसून येते; कारण एक शेर चहाचें मोल चार शेर मांस असें ह्मटलें, ह्मणजे चहा आणि मांस याची तुलना झाली.

आतां ज्या अर्थी मोलावरून तुलना दिसून येते, त्या अर्थी जिनसाचें मोल दोहोंपैकीं एका कारणावरून फिरतें. हें-ही उघडच आहे. ह्मणजे विवक्षित जिनसांत कांहींतरी फरक होऊन, किंवा तो देऊन जे दुसरे जिन्नस घ्यावयाचे, त्यांत कांहींतरी फरक होऊन मोल फिरतें. यांविषयीं दुसरीकडे असें ह्मटलें आहे कीं, जिनसांचें मोल अंतस्थ किंवा बाह्यकारणावरून बदलतें. उदाहरणार्थ चहाचा पुरवठा कमी होऊन त्याचें मोल चढलें तर हा फरक अंतस्थ कारणानें झाला. किंवा तो देऊन जी दुसरी वस्तु घ्यावयाची, तिचें मोल कमी झाल्यानें

याचा भाव चढला तर, हा फरक बाह्य कारणानें पडला. मोलाची ही कल्पना, ह्मणजे सर्व साधारण पदार्थांमध्यें असणारा संबंध, हें लक्षांत घेतल्यास मोलांत सर्वत्र सारखा चढउतार कधीं व्हावयाचा नाहीं. असें खचित होतें. कारण जिनसाच्या मोलांत सर्व साधारण चढ असें ह्मणणें, ह्मणजे कोणताही जिन्नस देऊन दुसरा कोणताही जिन्नस अधिक मिळूं शकेल, असें ह्मटल्याप्रमाणें आहे; आणि हें ह्मणणें इतकें अयुक्तिक आहे कीं, जसें बागेंतील प्रत्येक झाड दुसऱ्या कोणत्याही झाडापेक्षां उंच आहे असें ह्मणण्याप्रमाणें होय. जेव्हां एका जिनसाचें मोल वाढतें तेव्हां दुसरीकडे कोणत्यातरी दुसऱ्या जिनसाचें मोल उतरतें. जर मांसाचें मोल वीस वर्षांमागें जें होतें त्यापेक्षां हल्लीं वाढलें आहे, असें ह्मटलें, तर असेंच ह्मणण्याप्रमाणें आहे कीं, वीस वर्षांमागें अमुक मांस देऊन दुसरा एखादा जिन्नस—उदाहरणार्थ धान्य—जितका मिळत होता त्याहून आज जास्त मिळतो. या ठिकाणीं धान्याचें मोल मांसाशीं ताडून पाहतां उतरलें. मोलावरून अदलाबदलीचा बोध होतो, कारण कोणत्याही जिनसाचें मोल ठरवितांना तो देऊन दुसरे कोणते जिन्नस मिळतील याचा विचार करावा लागतो.

**मोबदल्यानें अदलाबदल करण्याविषयीं.** कांहीं रानटी लोकांत पैशाचा उपयोग न करितां, प्रत्यक्ष जिन्नस देऊन घेऊन सर्व क्रयविक्रय करितात. ह्मणजे जर एका मनुष्याजवळ त्यास पाहिजे त्याहून अधिक धान्य असलें, आणि समजा कीं, त्यास आंगरख्याची किंवा तिरकमठ्याची गरज असली, तर हा जिन्नस ज्यापाशीं असेल त्या मनुष्यास शोधून त्यास धान्य देऊन तो जिन्नस घेईल. अदलाबदलीच्या ह्या प्रकारास मोबदला ह्मणतात. कांहीं जिनसांचा क्रयविक्रय आपल्यांत हल्लीं मोबदल्यानें

होतो, त्याचीं उदाहरणें कोणाही विद्यार्थ्यास सुचतील. हा प्रकार अडाणीपणाचा असला पाहिजे; आणि जोंपर्यंत देशांत देवघेव केवळ मोबदल्यानेंच होते, तोंपर्यंत व्यापार सर्वदा फार मर्यादित असतो. मोबदल्यापासून होणारी गैरसोय दूर करण्याकरितां पैसा उपयोगांत आला. सर्वानुमतें असा एक पदार्थ निवडण्यांत आला कीं, त्याच्या योगानें दुसऱ्या सर्व जिनसांचें मोल करतां यावें, व तो अदलाबदलीचें साधनही व्हावा. ह्या पदार्थाच्या उपयोगानें मोबदल्याची आवश्यकता राहिली नाहीं. त्यामुळें ज्या मनुष्यापाशीं त्याला पाहिजेत त्यापेक्षां अधिक बैल आहेत, व ते देऊन त्यास कापड किंवा चिलखत घेणें असेल, तर त्याच्याशीं जो असल्या जिनसांची अदलाबदली करण्यास तयार असेल त्याचा शोध करण्याची गरज नाहीं; पैसा घेऊन बैल गिऱ्हाइकास विकले ह्मणजे झालें; कारण त्या पैशानें पाहिजेत ते जिन्नस त्यास खरेदी घेतां येतील.

**किमतीची व्याख्या.** जिनसाचें मोल पैशानें केलें ह्मणजे त्यास किंमत ह्मणतात. किंमत हा मोलाचा एक विशेष प्रकार आहे; कारण कोणत्याही जिनसाचें मोल, तो देऊन जे दुसरे जिन्नस मिळतील त्यावरून करावयाचें; ह्मणून जर एक जिन्नस, उदाहरणार्थ एकवार कापड, दोन रुपये देऊन मिळतें, तर एकवार कापडाचें मोल दोन रुपये असें खचित ह्मणतां येईल; परंतु ज्या अर्थी मोलाचें सर्व साधारण परिमाण करण्याकरितां, आणि अदलाबदलीचें साधन ह्मणून, पैशाची योजना केली आहे त्या अर्थी त्यास दुसरें नांव असणें अधिक सोयीचें आहे. याकरितां जिनसास जितका पैसा द्यावा लागतो तितकी त्याची किंमत होय.

कोणत्याही वस्तूची किंमत असें ह्मटलें ह्मणजे, त्या वस्तूची व

मौल्यवान् धातूंची तुलना होते; परंतु त्या वस्तूचें मोल असें ह्मटलें ह्मणजे त्या वस्तूची व दुसऱ्या सर्व वस्तूंची तुलना झाली. ह्मणून हें उघड होतें कीं, मोलामध्यें सर्व साधारण चढ किंवा उतार होणें हें जरी अशक्य आहे, तरी किमतीमध्यें सर्व साधारण चढ किंवा उतार होऊं शकेल; कारण कित्येक कारणांवरून सर्व जिनसांस कमी किंवा अधिक पैसा द्यावा लागेल ही गोष्ट संभवनीय आहे. यास उदाहरण, अमुक एका देशांत जितका पैसा खेळत आहे, तो एकदम दुप्पट झाला, आणि प्रजावृद्धि व व्यापार हीं स्थिर राहिलीं तर किमती चढल्याच पाहिजेत.

वर दिलेल्या लक्षणावरून हें सिद्ध होतें कीं, किमती दुप्पट किंवा तिप्पट झाल्या तरी पैशाखेरीज दुसऱ्या सर्व जिनसांचें मोल फिरलें पाहिजे असें नाहीं. अशा कारणानें जिनसांच्या परस्पर संबंधांत कांहींच फरक पडणार नाहीं. पूर्वीं एकवार मखमालीस जर तीनशेर चहा मिळत असे, पुढें एकशेर चहास एक रुपयाचे ठिकाणीं दोन रुपये पडूं लागले व मखमालीच्या एका वारास तीन रुपयांचे जागीं सहा रुपये झाले तर चहा व मखमाल यांच्या परस्पर मोलांत कांहीं फरक पडत नाहीं. ह्मणून सर्व साधारण किमतींत चढउतार झाल्यानें पैशाखेरीज कोणत्याही जिनसाचें मोल बदलत नाहीं; हें उघड होतें. किमती चढल्या तर जिनसास अधिक पैसा द्यावा लागतो, ह्मणजे पैशाचें मोल उतरलें इतकेंच समजावयाचें. आतां जर किमती उतरल्या तर तितकाच पैसा देऊन अधिक जिन्नस मिळतील, तेव्हां पैशाचें मोल वाढलें. या विचारानंतर पैशाचें स्वरूप व कार्यें यांचें अधिक स्पष्टीकरण केलें पाहिजे, तें पुढील भागांत होईल.

**पहिल्या भागावर प्रश्न:—मोल आणि किंमत.**

१. मोल कशास ह्मणतात ?

२. मोलांत सर्व साधारण चढ किंवा उतार होत नाहीं असें सिद्ध करा.

३. जिनसांचा मोबदला ह्मणजे काय ?

४. कोणत्या साधनानें मोबदल्याची गरज नाहींशी झाली आह

५. किंमत कशास ह्मणावें ?

६. किमतींत सर्व साधारण चढ किंवा उतार होईल कीं नाहीं ?

७. किमती जर एकदम दुप्पट झाल्या तर जिनसांच्या मोलावर त्याचा काय परिणाम होईल ?

---

१. वाईट हंगामामुळें भाकरीचें मोल वाढलें, तर तें वाढण्याचें कारण बाह्य किंवा अंतस्थ ?

२. सर्व जिनसांच्या किमती अधिक वाढल्या तर देश अधिक धनाढ्य होईल काय ?

---

## भाग २ रा.

## पैसा.

**पैशाचीं कार्यें.** वरच्या भागांत असें दाखविण्यांत आलें कीं, मोबदल्यानें देवघेव करण्यांत फार गैरसोय असते, व ती गैरसोय दूर करण्याकरितां सर्व सुधारलेल्या देशांत पैशाचा उपयोग झाला आहे. ह्मणजे असा एक पदार्थ पसंत करण्यांत आला कीं, ज्याच्या योगानें इतर सर्व पदार्थांचें मोल करतां यावें; व अदलाबदलीचें साधन, असाही तो उपयोगीं पडावा. मोलाचें मापन करण्याकरितां असा एक पदार्थ जर निवडला नसता, तर कोणा मनुष्याची संपत्ति अमुक आहे, असें सांगण्यास साधन न-

सल्यामुळें त्याच्या मालकीच्या सर्व जिनसांची यादी वाचावयास लागली असती. जॉबच्या पुस्तकाच्या पहिल्या भागांत जॉबच्या संपत्तीचें वर्णन पुढें लिहिल्याप्रमाणें दिलें आहे:—"त्याच्या सात हजार मेंढ्या, तीन हजार उंट, बैलाच्या पांचशें जोड्या, आणि पांचशें गाढविणी, असून त्याच्या घरीं माणसेंही पुष्कळ होतीं." हें असो, परंतु हल्लीं जर कोणी विचारलें कीं इंग्लंडची संपत्ति किती आहे ? तर उत्तर देण्यास राष्ट्रांतील सर्व वस्तूंचीं नांवें घेण्याची जर आवश्यकता असती तर उत्तर देतां आलेंच नसतें, मोलाचें परिमाण नसतें तर कोणा गृहस्थाची संपत्ति किती आहे हें सांगण्याची मारामार पडती. उदाहरणार्थ एका धनाढ्य उमरावाची संपत्ति सांगते वेळीं, त्याच्या जमिनीवरच्या झाडाची संख्या व उंची सांगितली पाहिजे, त्याच्या वाड्यांत असलेलें सामान व त्याचें वर्णन सांगितलें पाहिजे, त्याच्या गाड्यांघोड्यांची संख्या सांगितली पाहिजे; त्याच्या मालमत्तेची यादी करण्यास कित्येक दिवस लागतील, आणि इतकेंही करून ती यादी वाचून त्याच्या संपत्तीची बरोबर कल्पना मनांत येणार नाहीं.

ही गैरसोय पैशाचा उपयोग केल्यानें दूर झाली आहे. कारण, हल्लीं व्यक्तींच्या आणि राष्ट्रांच्या संपत्तीची आकारणी मौल्यवान् धातु प्रमाण धरून करितात, आणि ती अमुक हजार किंवा अमुक लक्ष रुपये आहे असें ह्मणतात.

मोबदल्याविषयीं सांगतांना, अदलाबदलीच्या साधनास पैशाचा फार उपयोग होतो, असें दाखविलेंच आहे. त्या वेळीं असें सांगण्यांत आलें आहे कीं, मोबदल्याचा प्रकार बंद होऊन, अदलाबदलीचें दुसरें एखादें सोयीचें साधन उपयोगांत येईपर्यंत कोणत्याही देशाचा व्यापार वाढणार नाहीं. **प्रोफेसर बोनामी प्राईस**साहेब पैशास अदलाबदली करण्याचें हत्यार असें ह्मण-

तात. हें नांव योग्य आहे, कारण खिळे ठोकण्यास हतोड्याचा जसा उपयोग होतो, तसाच अदलाबदलीस पैशाचा उपयोग होतो. मोलाचें परिमाण ह्मणून किंवा अदलाबदलीचें साधन ह्मणून पैशाचा उपयोग न करितां जिनसांची देवघेव करणें शक्य आहे; परंतु तो प्रकार इतका अडाणीपणाचा व दांडगा आहे कीं, सुतारानें हत्याराशिवाय काम करण्याचा यत्न करणें ही उपमा त्यास चांगली शोभेल.

जो पदार्थ पैसा ह्मणून पसंत केला असेल तो सुलभ रीतीनें नेतां यावा हें उघड आहे. ज्या पदार्थाचें आकारमान लहान असून मोल पुष्कळ नाहीं, ह्मणजे लांकूड किंवा स्पार्टा शहरांतल्याप्रमाणें लोखंड हे पदार्थ पैशाचे जागीं निवडले गेल्यास, मोबदल्यापासून व्यापारास जी गैरसोय होते तिच्यापेक्षां यांत अधिक गैरसोय होईल. अशा पदार्थाचा उपयोग पैशाप्रमाणें करणें झाल्यास, थोडी खरेदी करावयाची असली तरी आपला पैसा नेण्याकरितां बरोबर एक गाडी व घोडा नेला पाहिजे. वरील विचारांवरून असें सिद्ध होतें कीं, पैसा ह्मणून पसंत केलेला पदार्थ सोनें किंवा रुपेंच असला पाहिजे असें नाहीं; आतां सुधारलेल्या देशांत हे पदार्थ बहुत करून सर्व ठिकाणीं पसंत केले आहेत, याचें कारण हेंच कीं, मोलाचें परिमाण व अदलाबदलीचें साधन ह्मणून जो पदार्थ पसंत करावयाचा त्यांत जे गुण असावे ते विशेषेंकरून या धातूंत एकत्र झालेले दृष्टीस पडतात.

**निरनिराळ्या देशांत पैशाऐवजीं कित्येक पदार्थांचा उपयोग झाला आहे.** पैशाचे ठिकाणीं सोनें व रुपें यांचा उपयोग जरी बहुतेक ठिकाणीं होत आहे, तरी त्या ऐवजीं कांहीं देशांत दुसरे पदार्थ उपयोगांत आले आहेत. पूर्वी चिनी

लोक चहाच्या दाबून केलेल्या वड्या वापरीत; आफ्रिकेंतील कांहीं लोक विशेष प्रकारच्या शिंपांचा उपयोग करितात; ग्रीक लोक, आरब लोक व आणखी कित्येक प्राचीन राष्ट्रें पैशाऐवजीं गुरें योजीत असत; अबिसिनिया देशांत पैशाऐवजीं मिठाचा उपयोग करण्यांत आला आहे; आणि कांहीं देशांत कातडीं वापरण्यांत आलीं आहेत. परंतु पैशाऐवजीं उपयोग करण्यास सोनें आणि रुपें हे धातु, कोणत्याही इतर पदार्थांहून अधिक योग्य आहेत, असें अनुभवावरून सिद्ध झालें आहे; असें ह्मणणें भाग आहे. कारण हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, जो पदार्थ पैसा ह्मणून पसंत करावयाचा त्याचा उपयोग—

१. ला. मोलाचें सर्व साधारण परिमाण,

२. रा. अदलाबदलीचें सर्व साधारण साधन, असा झाला पाहिजे.

## पैसा ह्मणून पसंत केलेल्या पदार्थांत सात गुण असावे.

प्रोफेसर जीव्हन्स यानें "पैसा" या नांवाचा एक ग्रंथ केला आहे. पैसा ह्मणून पसंत केलेल्या पदार्थांत सात गुण असावे असें त्यानें ह्मटलें आहे. ते हे:—**१. अंतर्गत मोल. २ सुबाह्यता. ३. अविनाश्यता. ४. साधर्म्य. ५. विभाज्यता. ६. मोलाची स्थिरता. ७. ज्ञेयता.**

**१ ला गुण. अंतर्गत मोल.** वरील सर्व गुणांपैकीं यापहिल्याचें महत्त्व सहज लक्षांत येण्यासारखें आहे. पैसा ह्मणून जो पदार्थ पसंत करायाचा त्यास आंगचें मोल असलें पाहिजे; केवळ अदलाबदलीचें व मोलाचें परिमाण ह्मणूनच त्याची पसंती केलेली नसावी. लोकांत नेहमी ज्यास मौल्यवान् गणतात, अशा पदार्थांचा पैसा बनविला नाहीं, तर इतर पदार्थांची देवघेव क-

रण्याकरितां तो सर्वत्र चालणार नाहीं. आतां अशी शंका येईल-कीं ब्यांकनोटा कशा चालतात ? तर त्या ह्या नियमांस अपवादक होत असल्या पाहिजेत; पण हा अपवाद फक्त वर दिसण्यांत आहे. ब्यांकनोट ही सोन्यारुप्याचें दर्शक असून मागतांक्षणीं सोनें रुपें देण्याचें वचन, अशी ती आहे; आणि हें वचन पाळलें जाईल असा लोकांचा जेव्हां पूर्ण विश्वास असतो तेव्हांच मात्र त्यांच्यावर लिहिलेल्या आंकड्या इतक्या रुपयांबद्दल लोक त्या घेतात. कित्येक कारणांमुळें अगदीं रानटी देशांत सुद्धां व फार प्राचीन कालापासून देखील, सोनें व रुपें या धातु फार मौल्यवान् गणल्या आहेत. चकाकी, टिकाऊपणा आणि घनवर्धनीयता यांच्यामुळें, सर्व काळीं व सर्व राष्ट्रांत भूषणांकरितां व शोभेकरितां त्यांची अपेक्षा फार झाली आहे. या कारणाकरितां सोनें आणि रुपें यांमध्यें पहिला गुण (अंतर्गत मोल) विशेषेंकरून आहे. पैशाऐवजीं ज्या पदार्थांचा उपयोग करावयाचा त्यांत हा गुण असलाच पाहिजे.

**२ रा गुण. सुबाह्यता होय.** यास थोड्या आकारमानांत पुष्कळ मोल असेंही केव्हां केव्हां ह्मणतात. सोन्यांत व रुप्यांत जास्त कमी किंमतीच्या मानानें हा गुण कसा आहे, हें सर्वांस माहित आहे. सोनें व रुपें पैदा करावयास लागणारे प्रयास, यामुळें त्यांची दुर्मिळता होऊन सर्वांस त्यांची अपेक्षा असल्यामुळें त्यांचें मोल वाढतें. त्यांचा आकार फार लहान असून त्यांचें मोल मनस्वी असतें. असे दुसरे पदार्थ आहेत. उदाहरणार्थ हिरे, व कांहीं मौल्यवान खडे होत; परंतु पैशाऐवजीं यांचा उपयोग करण्यांत फारच गैरसोय आहे. टांचणीच्या डोक्याएवढ्या आकाराचा हिरा असल्यास त्यास १० पासून १५ रुपये पडतात. असले सूक्ष्म जिन्नस देतां घेतां येण्यास फार

अडचण पडणार, व ते सांडून जाण्याची भीतीही विशेष असणार; ह्मणून पैशाऐवजीं सोनें व रुपें यांची योजना न करितां हिऱ्याची योजना केली तर फारच गैरसोयी आहेत. ह्मणून पैशाकरितां जो पदार्थ पसंत करावयाचा, त्याचा आकार लहान असून मोल पुष्कळ असावें हें जरी खरें, तरी आकार आणि मोल यांतील अंतरास कांहीं मर्यादा असली पाहिजे. हें उघड होतें. लहान देवघेवी करण्यास सोनें अगदीं अयोग्य आहे. दहा रुपयांचे ठिकाणीं हिरकणी जितकी गैरसोयीची, तसेंच पावलीचे ठिकाणीं सोनें गैरसोयीचें होईल. तसेंच तांब्याच्या नाण्याऐवजीं रुप्याचाच उपयोग करितां येणार नाहीं. हिंदुस्थानांत सोन्याचें नाणें नसल्यामुळें, पुष्कळ लोक पैक्याची पिशवी बरोबर न बाळगितां जवळ एक चेकबुक ठेवितात, आणि पैसा द्यावयाचा तो चेक लिहून देतात.

**३ रा गुण. अविनाश्यता हा होय.** सात गुणांपैकीं फार अवश्य असा हा एक गुण आहे. एखादा नासून कुजून जाणारा पदार्थ जर पैशाऐवजीं योजिला, तर गैरसोय किती होईल हें जर विद्यार्थ्यानें मनांत आणिलें, तर हा पदार्थ बराच टिकाऊ असला पाहिजे असें त्यास वाटूं लागेल. उदाहरणार्थ आपण असें घेऊं कीं, एका मनुष्याचा पैसा अंडीं किंवा दुधावरची साय आहे. आतां हीं अंडीं चुकून खालीं पडलीं किंवा चीज होऊन साय बिघडली, तर हा पैका देऊन दुसरे जिन्नस मिळणार नाहींत. ज्याचा मुळींच नाश होत नाहीं असा एकही पदार्थ नाहीं, हें जरी खरें, तथापि सोनें हें विशेष प्रकारें अविनाशी आहे. विस्तव किंवा पाणी लागल्यानें तें नासत नाहीं किंवा गंजत नाहीं. हजारों वर्षें जमिनींत राहिलेलीं भूषणें डाक्टर शिलेमन यानें शोधून काढिलीं आहेत, त्यांचें सोनें इतकें लखलखित आणि चोख आहे कीं, तें नवेंसें वाटतें.

**४ था गुण. साधर्म्य होय.** याचा अर्थ असा कीं, ज्या पदार्थांचा उपयोग पैशाचे ठायीं करावयाचा तो सर्व एक सारखा असावा, नाहीं तर त्याचें मोल एकसारखें होणार नाहीं. सोनें व रुपें या धातु, भट्टींत घालून तावून अमुक कसास उतरतील अशा करितां येतात; ह्मणजे असें कीं एक तोळाभर कसास सोन्याचें मोल दुसऱ्या तोळाभर सोन्याइतकेंच होईल. मौल्यवान् खडे सोन्यारुप्याचे ठायीं पैसा ह्मणून योजूं ह्मटल्यास फारच गैरसोय होईल, कारण त्या खड्यांत साधर्म्य नसतें. हिऱ्याचें मोल कांहीं अंशीं त्याची चकाकी व रंग यांच्यावर असतें आणि चकाकी व रंग सारखीं नसतात; ह्मणून दोन हिरे सारख्या वजनाचे, सारख्या आकाराचे आणि सारखे कापलेले, हे सारख्या मोलाचे असतील असें नाहीं.

**५ वा गुण. विभाज्यता होय.** ही विभाज्यता मोलांत कमी नपडतां झाली पाहिजे. सहा सहा मासे असे सोन्याचे दोन तुकडे तोळाभर सोन्याच्याच मोलाचे असतात, परंतु विभाग केल्यानें कांहीं पदार्थांचें मोल कमी होतें. यास उदाहरण, कच्च्या हिऱ्याचें मोल ठरविण्याची रीती अशी आहे कीं, क्यारेटच्या संख्येचा वर्ग करून एका क्यारेटच्या मोलानें त्यास गुणावें. आतां एका क्यारेटचें मोल २० रुपये धरल्यास सहा वजनाच्या हिऱ्याची किंमत ७२० रुपये होते, आणि बारा क्यारेटच्या हिऱ्याची किंमत २८८० रुपये होते; ६×६×२०=७२०. १२×१२×२००=२८८०. यावरून असें दिसून येईल कीं बारा क्यारेटच्या हिऱ्याचे सहा सहा क्यारेटचे दोन हिरे केल्यास निमे मोल कमी होतें.

**६ वा गुण. मोलाची स्थिरता होय.** पैशाच्या मोलांत सारखेपणा असणें फार महत्त्वाचें आहे, कारण पैशाचें पहिलें

काम ह्मणजे मोलाचें सर्व साधारण परिमाण, असा त्याचा उपयोग झाला पाहिजे. मोलाचें प्रमाण कधीं बदलणार नाहीं असें होणें हें वस्तुस्वभावावरूनच अशक्य दिसतें. राबर्ट ओवेन साहेबाच्या संपत्तिविषयक व्यवस्थेंत असें घातलें आहे कीं, श्रमास मोलाचें परिमाण करावें, आणि असा कायदा करावा कीं एका तासाच्या श्रमाचें मोल एकसारखें ठरींव असावें. कोणत्याही वस्तूहून श्रमाचें मोल अधिक फिरणारें असणार हें उघड आहे; आणि न्यायानें किंवा साधारण समजुतीनें ह्मटलें तरी, सर जोशुआ रेनाल्डसारख्याचा आणि त्याच्या जोडे पुसणाराचा एक तासाचा श्रम एकाच मोलाचा मानावा यास कांहीं कारण नाहीं. ओवेन साहेबाच्या श्रमाच्या अदलाबदलीस सन १८३२ सालीं थोडासा लौकिक मिळाला होता. परंतु, पुढें तीस कोणी विचारीनासा झाला. कारण, त्या व्यवस्थेंत एक मोठी चूक होती ती अशी कीं, सर्वप्रकारच्या श्रमाचें मोल एकच धरलें होतें.

आपणास जे जे पदार्थ माहित आहेत त्या सर्वांचें मोल बदलतें. याकरितां पैसा ह्मणून जो पदार्थ पसंत करावयाचा त्याच्या मोलांत थोडा व हळुहळु फरक पडत असला ह्मणजे पुष्कळ झालें असें ह्मणावें. पैसा ह्मणून निवडलेल्या पदार्थाचें मोल वरचेवर बदलल्यास पैशासंबंधीं केलेल्या प्रत्येक कराराचीं कलमें फिरतील. उदाहरणार्थ मोलाचें सर्व साधारण परिमाण गहूं ठरविले; आतां अनें बपासून १० खंडी गहूं कर्जाऊ घेऊन ते सहा महिन्यांनीं परत देण्याचें कबूल केलें; गहूं परत घालण्याचे वेळीं गव्हांचें मोल शेंकडा वीस किंवा तीस टक्यांनीं चढलें किंवा उतरलें असेल. शेंकडा तीसप्रमाणें जर गव्हांचें मोल वाढलें असलें तर अनें कर्जाऊ घेतलेल्या गव्हांपेक्षां शेंकडा तीसप्रमाणें अधिक घातले पाहिजेत; कारण सहा महिन्यांपूर्वीं अमुक

गऱ्हांस जितके जिन्नस आले असते त्याहून शेंकडा तीस अधिक जिन्नस आज मिळत आहेत. ह्मणून पैशाचे ठिकाणीं जो पदार्थ योजावयाचा त्याचें मोल जर वरचेवर बदललें, तर प्रत्येक व्यापार जुगाराच्या खेळाप्रमाणें होईल; कारण, पुढें कांहीं महिन्यांनीं पैशाचें मोल काय राहील हें सागतां येणार नाहीं. पैशाऐवजीं उपयोगी पडण्यासारखे जे दुसरे पदार्थ आहेत त्यांहून सोनें आणि रुपें यांच्या मोलांत फरक कमी पडतो.

**७ वा गुण. ज्ञेयता होय.** पैसा खरा आहे किंवा खोटा आहे हें समजण्यास सुलभ पडावें. नखावर किंवा दगडावर रुपया वाजवून पाहण्याची चाल आहे. नाण्यास वास किंवा रुचि नसणें ही, त्याचा खरेपणा ओळखण्याची एक परीक्षा आहे. पैसा खरा किंवा खोटा हें ओळखण्यास अडचण पडूं नये ह्मणून ज्या पदार्थाचा तो करावयाचा त्याचें नाणें पाडतां यावें; आणि नाणें पाडण्याचें काम सरकारानें स्वतः करावें, ह्मणजे देशांतील चालू पैसा अमुक वजनाचा व अमुक शुद्धतेचा आहे असें मानण्यास सरकारची सर्व पत खर्ची पडते. विचाराअंतीं असें दिसून येईल कीं, वर सांगितलेल्या गुणांतून कित्येक गुण एकमेकांवर अवलंबून असतात. सोन्याची सुबाह्यता व अविनाश्यता हेच गुण, बहुधा त्याच्या सहाव्या गुणास ह्मणजे मोलाच्या स्थिरतेस कारण आहेत. ज्या जिनसाचा आकार त्याच्या मोलाच्या मानानें फार मोठा असतो, त्यास निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळी किंमत पडते. उदाहरणार्थ दगडी कोळसा खाणीच्या तोंडाजवळ तीन रुपये टन मिळतो, व लंडन शहरांत त्याचा दर, टनास बारा रुपये आहे. पण जिन्नस स्वस्त मिळतो त्या ठिकाणाहून जेथें तो महाग मिळतो तेथें थोड्या खर्चानें नेण्याची सोय झाल्यास, व्यापाराचा रोंख असा होऊं लागतो कीं, दोन्ही

ठिकाणीं त्याचें मोल जवळ जवळ सारखेंच राहील. याचप्रमाणें अविनाश्यता या गुणाविषयीं समजावें. जे पदार्थ नासून जातात, किंवा ज्यांचा उपयोग पुढल्या सुगीच्या अगोदर करावा लागतो, त्यांचें मोल नेहमी फिरतें. ताज्या माशांसारखा, नासणारा जिन्नस अमुक वेळांत खपलाच पाहिजे; कसें तरी करून गिऱ्हाईक मिळालेंच पाहिजे; बिलिंगसगेट मार्केटांत त्यांची किंमत एकाच दिवशीं शेंकडा पन्नास किंवा शंभर अशी फिरते. धान्य चांगलें राखून ठेविल्यास तें एकाएकीं नासत नाहीं, परंतु त्याचें मोल नेहमी फिरतें. याचें कारण असें कीं, पहिल्या हंगामाचा व्यय दुसरा हंगाम येईपर्यंत करण्याची चाल आहे; नेहमीपेक्षां एका वर्षीं सर्वपृथ्वीवर धान्याचें पीक शेंकडा तीस, या मानानें कमी आलें, तर त्या वर्षीं सर्वपृथ्वीवर धान्याचा पुरवठा शेंकडा तीस, या मानानें कमी होऊन धान्याचा भाव फार चाढेल. परंतु सोन्याच्या वार्षिक उत्पन्नांत शेंकडा तीसप्रमाणें एका वर्षीं तूट आल्यास, सोन्याचे मोलावर या तुटीचा परिणाम फारसा दिसून येणार नाहीं; कारण एका वर्षीं सोन्याचें उत्पन्न कांहींसें कमी झाल्यानें, सर्व जगांत सांठवून ठेविलेल्या सोन्यांत विशेष तफावत पडणार नाहीं.

**मोलाच्या दुहेरी परिमाणाचा अर्थ.** कोणाचें केव्हां केव्हां असें ह्मणणें असतें कीं, ज्याला मोलाचें दुहेरी परिमाण ह्मणतात तें प्रचारांत आणावें. दुहेरी परिमाण या पदांचा अर्थ असा कीं, कोणी मनुष्यानें कर्जाची फेड करतांना, रकम कितीही देणें असली तरी त्यानें आपल्या मर्जीप्रमाणें ती सोनें किंवा रुपें देऊन फेडावी, हें कायदेशीर असावें. ह्या व्यवस्थेपासून ढळढळीत तोटे आहेत. कल्पना करा कीं, कांहीं कारणामुळें कर्ज घेतल्या वेळेपासून फेडण्याच्या दरम्यान रुप्याचा भाव

व्यापारावर फार भयंकर परिणाम घडतो. उदाहरणार्थ अ, बस २५ पौंड कर्जाऊ देतो, व ब ते वर्षाअंतीं फेडण्यायाचा करार करितो; कर्ज फेडण्यापूर्वीं सोनें आणि रुपें यांच्या परस्पर मोलांत फरक पडण्याचा संभव आहे. बस जर सोनें किंवा रुपें यांतून कोणतेंही देऊन आपलें कर्ज फेडण्याची मोकळीक असेल, तर सोनें आणि रुपें यांच्या मोलांत झालेल्या फरकापासून तो आपला फायदा करून घेईल. सोन्याचें मोल उतरलें असल्यास तो आपलें कर्ज, सोनें देऊन फेडील; रुपें स्वस्त झालें असेल तर तो तें रुपें देऊन फेडील; याकरितां पैशाचें दुहेरी परिमाण असल्यानें पैशांसंबंधीं कराराच्या कलमांत चाळवाचाळव होते व ती दोन पदार्थांच्या मोलांत फरक पडल्यानें होते. एकच परिमाण असल्यास तेवढ्यांतच काय होईल तें होईल.

**इंग्लंडांत दुहेरी परिमाण नाहीं.** कोणी अशी शंका घेतील कीं ज्या अर्थी इंग्लंडांत सोनें, रुपें व तांबें या तिन्ही धातूंचीं नाणीं चालू आहेत त्या अर्थी त्या देशांत दुहेरीच नव्हे पण तिहेरी परिमाण आहे असें कां ह्मणूं नये? ही गोष्ट खरी नाहीं. रुप्याचीं व तांब्याचीं नाणीं मुख्य नसून साह्यकारी होत. त्यांच्या आंगमोलाहून त्यांचें व्यवहारांत मोल अधिक असतें. वीस शिलिंग आटवून त्यांचें रुपें केल्यास त्याचें मोल एका पौंडाहून कमी होईल. दोन नवीन अर्ध्या क्रौनांचें वजन एक औंस असतें, परंतु रुप्याची किंमत दररोज वर्तमान पत्रांत छापलेली असते त्यावरून असें दिसतें कीं, कित्येक वर्षें





ती एका औंसास ६० पेन्सांहून कमी आहे. सन १८८४ सालीं जानेवारी महिन्यांत ती दर औंसास ५१ पेन्स होती. इंग्लंडांत सोन्याचीं व रुप्याचीं नाणीं पाडून तीं उपयोगांत आणतात तीं एवढ्याच करितां कीं, त्यांच्या योगानें लहान देवघेवी सुलभ पडतात; परंतु अमुक रकमेच्या वर तीं नाणीं देणें, कायदेशीर नाहीं. पैसा घेणारा कबूल असल्याशिवाय ४० शिलिंगांवरची रकम रुपें देऊन फेडावयाची नाहीं; आणि त्याच प्रमाणें एक शिलिंगावरचें देणें तांब्याचीं नाणीं देऊन फेडावयाचें नाहीं. तांब्याच्या आणि कथलाच्या मिश्र धातूचे पेन्स आणि अर्धे पेन्स करतात. या धातूची किंमत एक पौंड वजनास जवळ जवळ १० पेन्स असते, आणि इतक्या वजनांत सुमारें ४० पेनी होतात. ह्मणून रुप्याच्या व तांब्याच्या मिश्र धातूच्या सर्व नाण्यावर सरकार नफा काढतें. हीं साह्यकारी किंवा खुणा ह्मणून केलेलीं नाणीं, वास्तविक ह्मटलें तर ब्यांक नोटीप्रमाणें आहेत, कारण त्यांचें आंगमोल त्यांच्यावर मांडलेल्या किंमतीहून कमी असतें. हीं, खुणा दाखविणारीं नाणीं पाहिजे तितकीं रकम देण्यास कायदेशीर केलीं तर फार अन्याय होईल, परंतु हल्लीं त्यापासून कोणाचेंच नुकसान होत नाहीं. सरकार नफा काढतें, त्यामुळें सोन्याचीं नाणीं पाडण्याचा खर्च प्रजेवर निराळा न बसून टंकशाळेचा खर्च भागतो, व प्रत्येक पेनीमध्यें एका पौंडाच्या $\frac{१}{२४०}$ अंशाच्या मोलाचें तांबें असतें तर लोकांची जी सोय झाली त्याहून हल्लीं अधिक होते, कारण हीं नाणीं हलकीं असतात. एक पेनींत एका पौंडाच्या $\frac{१}{२४०}$ अंशाच्या मोलाचें तांबें असावें असें ह्मटलें तर दुसरी अडचण अशी येते कीं, तांब्याचें मोल फिरेल तसतसें एका पेनीचें वजन वारंवार कमज्यास्त करावें लागेल.

**बायमेत्यालिझम.** द्विधातुक दुहेरी परिमाणाच्या पक्षाचे कांहीं लोक असें ह्मणतात कीं, जर कित्येक देश, सोनें आणि रुपें यांचें परस्पर मोल कायद्यानें कायम करण्याचें मनांत आणतील ( उदाहरणार्थ सोन्याच्या एका भागास रुप्याचे १५$\frac{१}{२}$ भाग ठरविले ) तर दोहों धातूंचें खरें मोल त्यांच्या कायदेशीर मोलाशीं जुळणार नाहीं, अशा वेळीं देणेकऱ्यांस आपलीं कर्जें, ज्या धातूचा भाव दुसऱ्या धातूच्या मानानें उतरला असेल त्यांत देणें फायदेशीर होईल. आतां त्या लोकांचें ह्मणणें असें कीं, अपेक्षेमध्यें हा फेरफार झाल्यावर दोन्ही धातूंचें परस्पर मोल कायद्यानें ठरविलेल्या मोलाजवळ जवळ येऊं लागेल; कारण कमी भावाच्या धातूचें मोल वाढून अधिक भावाच्या धातूचें मोल उतरेल. या योजनेस बायमेत्यालिझम ( ह्मणजे द्विधातुक ) ह्मणतात. या मतांत दोष असा आहे कीं, ज्या जिनसाचा पुरवठा वाढवितां येतो, त्याचें मोल परिणामीं कोणत्यातरी रीतीनें नियमित करतां येईल, व तें जिन्नस उत्पन्न करण्यास लागलेल्या खर्चावरच अवलंबून असलें पाहिजे असें नाहीं, असें गृहित धरलें आहे. कल्पना करा कीं, सोनें आणि रुपें यांचें परस्पर मोल कायद्यानें १: १५$\frac{१}{२}$ असें ठरविलें, आणि कांहीं विलक्षण शोध लागून एक तोळा सोनें पैदाकरण्यापेक्षां दहा तोळे रुपें उत्पन्न करण्यास कमी श्रम लागूं लागले; व हें असेंच चाललें, तर लोक सरकारचा कायदा ह्मणून १: १५$\frac{१}{२}$ अशा भावानें सोन्यारुप्याची अदलाबदल करण्यास खुषी होणार नाहींत.

**बास्तियात साहेबाच्या ग्रंथांतील एक उदाहरण.** पैशाच्या विषयासंबंधानें आणखी एक विचार सांगून हा भाग पुरा करण्यांत येईल. पैसा हाच केवळ संपत्तीचें मूळ ही कल्पना दृढ झाल्यामुळें मनस्वी चुका झाल्या आहेत. प्रत्येकास

वाटत असतें कीं, आपल्यापाशीं जसजसा पैका अधिक होईल तसतसे आपण अधिक श्रीमंत होत जातों, आणि यावरून असें अनुमान बसविलें आहे कीं, लोकांत अधिक पैसा खेळत असला ह्मणजे ते अधिक श्रीमंत होत. हें अनुमान चुकीचें आहे, असें बास्तियात साहेबाच्या पुढील उदाहरणावरून स्पष्ट होईल. "दहा गृहस्थ एक डाव खेळावयास बसले. त्यांत त्यांनीं १००० रुपयांचा पण लावला. एक चकती दहा रुपयांची असें समजून प्रत्येकापाशीं दहा दहा चकत्या दिल्या. खेळ आटोपतांना दरएकापाशीं जितक्या चकत्या होत्या तितक्यांच्या दसपट रुपये त्यास मिळाले. मंडळींत एक गृहस्थ चांगला गणिती परंतु तर्कशास्त्रशून्य असा होता. त्यानें असें पाहिलें कीं, खेळ संपतेवेळीं आपणापाशीं जितक्या अधिक चकत्या असतील तितके आपण अधिक धनवान् होतों; व आपल्या मित्रांचाही अनुभव असाच असें पाहून तो ह्मणाला 'माझें तसेंच तुमचें' कारण जें एकास तेंच सर्वांस लागू आहे. ह्मणून त्यानें सुचविलें कीं, प्रत्येकास पूर्वीपेक्षां दुप्पट चकत्या द्याव्या. तो बोलावयाची फुरसत, लागलेच सर्वांच्या हातांत वीस वीस चकत्या पडल्या; परंतु मंडळी खेळ आटोपून जेव्हां उठली, तेव्हां पूर्वीपेक्षां आपण श्रीमान झालों असें त्यांस वाटलें नाहीं. पणाची रकम वाढविलेली नसल्यामुळें प्रत्येकास प्रमाणानें रुपये मिळाले. दरएकास चकत्या दुप्पट मिळाल्या खऱ्या, परंतु प्रत्येक चकतीचें मोल दहा रुपये न होतां पांचच रुपये झालें; तेव्हां असें समजून आलें कीं, जें एकास लागू तेंच सर्वांस नेहमी लागू असतें असें नाहीं.

## २ ऱ्या भागावर प्रश्न. पैसा.

१. पैक्याचीं कार्यें कोणतीं ?

२. मोलाचें परिमाण याचा अर्थ काय ? एक उदाहरण द्या.

३. अदलाबदलीचें साधन ह्मणजे काय तें सांगा आणि उदाहरण द्या.

४. पैका ह्मणून जो पदार्थ निवडावयाचा तो सोनें किंवा रुपें हींच असलीं पाहिजेत काय ?

५. निरनिराळ्या काळीं आणि निरनिराळ्या देशांत कोणकोणते पदार्थ पैसा ह्मणून उपयोगांत आले आहेत ?

६. जो पदार्थ पैसा ह्मणून पसंत करावयाचा त्यांत कोणकोणते गुण असावेत तें सांगा.

७. त्यांपैकीं प्रत्येक गुणाची फोड करून त्याचें महत्त्व उदाहरणानें उघड करून दाखवा.

८. हे गुण विशेषेंकरून कोणत्या पदार्थांत आढळतात.

९. श्रमास मोलाचें परिमाण करण्यांत मुख्य तोटे कोणते आहेत ?

१०. मोलाचें दुहेरी परिमाण ह्मणजे काय ?

११. दुहेरी परिमाणापासून तोटे कोणते ?

१२. इंग्लंडांत दुहेरी परिमाण आहे काय ?

१३. बायमेत्याझिलम ह्मणजे काय व त्या मतांत चूक कोणती आहे.

१४. बास्तियातसाहेबानें जें उदाहरण देऊन पैक्याचें खरें स्वरूप उघड करून दाखविलें तें कोणतें तें सांगा.

---

१. हिंदुस्थानांत सोन्याचें नाणें नाहीं. यावरून लहान लहान रकमा देण्याची कांहीं लोकांची वहिवाट कशी असावी ?

निरनिराळ्या दहा दुकानांत तुह्मास दहा पौंड देणें आहेत, तर खिशांत शंभर रुपये घालून जाणें तुह्मास बरें वाटेल काय ?

२. जर एका मनुष्यास सोन्याची खाण सांपडली तर तो देशाची संपत्ति वाढवितो काय ?

३. जर प्रत्येकापाशीं आहे त्याच्या दुप्पट पैका एकदम झाला तर एकंदर संपत्तीवर काय परिणाम घडेल ?

४. पृथ्वीवरील सर्व सोनें, रुपें, आणि तांबें यांचा नाश झाला तर क्रयविक्रय बंद होईल काय ?

---

# भाग २ रा.

## जिनसांचें मोल.

**जिनसांच्या मोलासंबंधानें विचार करतांना त्याचे वर्ग तीन करतां येतील.**

१ ला. ज्यांचें मोल ठरविणें विकणाराच्या स्वाधीन असतें, आणि ज्यांचा पुरवठा अधिक करतां येत नाहीं ते; उदाहरणार्थ मयत चिताऱ्याचीं चित्रें.

२ रा. जे जिन्नस अधिक उत्पन्न करण्यास अधिक खर्च लागतो ते; जसें शेतांतील आणि खाणींतील उत्पन्न.

३ रा. उत्पन्न करण्याचा खर्च न वाढवितां ज्या जिनसांचा पुरवठा अधिक करतां येतो ते; उदाहरणार्थ शिल्पानें तयार केलेला माल.

**मूळखर्च.** जिनसांचे हे तीन वर्ग सांगतेवेळीं 'मूळखर्च' हे शब्द योजिले आहेत. मिल्ल साहेब ह्मणतो कीं, मूळखर्च हा मुख्यत्वेंकरून वेतन आणि नफा मिळून होतो. प्रोफेसर केर्न्स यानें निराळी व्याख्या केली आहे, आणि ती वास्तविक प्रकारास ज्यास्त मिळून आहे: त्यानें असें दाखविलें आहे कीं, मूळखर्चाचे घटकावयव तीन आहेत, ते कष्ट, अभोग आणि धोका हे होत; पहिला श्रमकारास सोसावा लागतो, दुसरा भांडवलवाल्यास व तिसरा उभयतांस निरनिराळ्या प्रमाणानें सोसावा लागतो. श्रमकाराच्या कष्टाचें आणि धोक्याचें बक्षीस वेतन

होय; भांडवलवाल्याच्या अभोगाचें आणि धोक्याचें बक्षीस, नफा होय. हें उघड आहे कीं, जेथें श्रम आणि भांडवल यांत चढाओढ अशी असते कीं, सर्व व्यापारांत वेतन आणि नफा यांच्या रकमेचें मान, सोसावे लागलेले कष्ट, धोका आणि अभोग यांच्याशीं अगदीं प्रमाणांत असतें, तेथें नफा आणि वेतन हीं उत्पादनास लागलेल्या खर्चाचें द्रव्यमान होत; आणि अशा वेळीं अर्थशास्त्रदृष्ट्या मूळ खर्चाची व्याख्या, तो वेतन आणि नफा मिळून झाला आहे अशी केली, किंवा ते कष्ट, अभोग आणि धोका यांचा मिळून झाला असतो अशी केली तरी सारखेंच.

वर सांगितलेल्या जिनसांच्या तिन्ही वर्गांचें मोल ज्या कारणांनीं नियमित होतें, त्यांचें विवेचन करण्यापूर्वी मोलासंबंधानें अपेक्षा आणि पुरवठा ह्मणजे काय हें स्पष्ट करून सांगितलें पाहिजे. आपण मोलाचे ठिकाणीं किंमत या शब्दाचा उपयोग केल्यास हें सांगणें सुलभ पडेल असें वाटतें. असें करण्यांत चूक होत नाहीं, कारण मागें सांगितलेंच आहे कीं, किंमत हा मोलाचा एक विशेष प्रकार आहे. तथापि अशी कल्पना केली पाहिजे कीं, जिनसांच्या किंमतींत होणारा फरक त्या जिनसांच्या मोलांतच कांहीं बदल झाल्यानें होतो, सोन्याचें मोल बदलून होत नाहीं. ह्मणून चहाची किंमत वाढली आहे असें ह्मटलें ह्मणजे हीं वाढ चहाच्या मोलांत झाली आहे असें समजावें; सोन्याचें मोल उतरून झाली आहे असें नव्हे.

**अपेक्षा आणि पुरवठा यांचा किंमतीवर परिणाम.** जिनसांची किंमत, अपेक्षा आणि पुरवठा यांवर अवलंबून असते असें वारंवार बोलण्यांत येतें; हें अगदीं खरें आहे. परंतु जे कोणी हे शब्द योजितात, त्यांना त्यांचा अर्थ नेहमीं बरोबर कळत नाहीं. किंमती आणि अपेक्षा व पुरवठा यांच्यांतील खरा

संबंध थोडक्यांत पुढें सांगितला आहे:—जिनसाची किंमत अशी असली पाहिजे कीं अपेक्षा आणि पुरवठा यांची बरोबरी होईल. सर्व साधारण नियम असा आहे कीं, किंमत कमी झाल्यानें अपेक्षा वाढते आणि किंमत वाढल्यानें अपेक्षा कमी होते. उदाहरणार्थ कल्पना करा कीं, एक घर लिलांव करून विकावयाचें आहे. आणि तें घेण्यास सहा गृहस्थ तयार आहेत; घर खरेदी करण्याकरितां ते एकमेकांत चढाओढ करितील. घराची किंमत हळू हळू वाढत जाऊन सहा असामीपैकीं पांच गृहस्थ लिलांवांतून आपलें आंग काढून घेतील, आणि लिलांवाची किंमत जो सर्वांत अधिक बोलेल त्यास तें घर जाईल. व ही किंमत इतकी असली पाहिजे कीं, तिच्यावर बाकीच्या गृहस्थांस बोलतां येऊं नये. कारण असें न झालें तर बाकीचे गृहस्थ घराची किंमत तितकीच किंवा अधिक बोलूं लागले तर लिलांव पुरा होणार नाहीं ह्मणून जेव्हां जिन्नस घेणारे किंवा विकणारे यांच्यांमध्यें यथेच्छ चढाओढ असते तेव्हां बाजारभाव असा पाहिजे कीं, अपेक्षा आणि पुरवठा यांचें साम्य राहील. वर सांगितलेल्या उदाहरणांत **अ, ब, क, ड, ई, फ** या सहा गृहस्थांस एक घर खरेदी करणें आहे; घराची किंमत इतकी वाढत गेली कीं **ब, क, ड, ई, फ** यांस तें खरेदी करण्याचें सोडून देणें भाग पडलें; आतां फक्त **अ**ची अपेक्षा राहिली; ह्मणून ही अपेक्षा आणि पुरवठा यांचें साम्य झालें.

आतां हें उघड आहे कीं, वर सांगितलेल्या उदाहरणांत त्या घरास जी किंमत येणार ती, घर बांधण्यास जे श्रम व भांडवल लागलें त्यांच्या बाजारभावाहून अधिक असेल. असें झाल्यानें घरांचा पुरवठा उत्तरोत्तर अधिक होईल. परंतु घरांचा पुरवठा अधिक झाल्यानें घरांची किंमत कमी व्हावयास लागेल,

व शेवटीं ती इतकी होईल कीं, घरें बांधण्यास लागलेले श्रम आणि भांडवल यांचें बक्षीस नेहमींच्या मानावर येऊन राहील. याच प्रमाणें घराची किंमत श्रम आणि भांडवल यांच्या नेहमींच्या फलापेक्षां कमी आली तर घरें बांधणारे व मजूर आपलें भांडवल व श्रम दुसऱ्या धंद्यांत घालतील; व त्यामुळें घरांचा पुरवठा कमी होऊन, भांडवलवाले व मजूर यांस त्यांच्या व्यापारांत एऱ्हवींप्रमाणें फायदा व वेतन मिळूं लागेल. जिन्नसाची माफक किंमत ह्मणजे, जी जिन्नस उत्पन्न करावयास लागलेल्या खर्चावरून ठरते ती. तिच्या दोहों बाजूंस बाजारभावांत जो नेहमीं फेरबदल होत असतो, त्यास मिल्ल साहेबानें निरंतर उठणाऱ्या समुद्राच्या लाटांची उपमा दिली आहे. समुद्राचा सर्वत्र धर्म सपाटीवर येण्याचा असतो, त्याचा पृष्ठभाग लाटांनीं उचंबळून वरचेवर वादळानें क्षुब्ध होतो. निदान इतकें खचीत आहे कीं, उघड्या समुद्रांतही पाण्याचा एक बिंदु दुसऱ्या बिंदूहून सर्व काळ कधींही उंच नसतो. पाण्याचा प्रत्येक भाग अदलूनबदलून वरखालीं होत असतो; परंतु समुद्राची सपाटी कायम असते.

**जिनसांच्या तीन वर्गांपैकीं पहिल्याची किंमत नियमित करणाऱ्या गोष्टीः**—वर सांगितलें कीं, ज्या मालापासून फायदा होऊं लागतो त्या मालाचा पुरवठाही अधिक होऊं गतो, आणि ह्याचा परिणाम असा होतो कीं, फायदा कमी होऊन किंमती नेहमींच्या मानावर येतात.

आतां अशा कांहीं वस्तु आहेत कीं, ज्यांची किंमत कितीही वाढली तरी त्यांचा पुरवठा अधिक करतां येणारच नाहीं. प्राचीन चित्रकारांचीं चित्रें, जुन्या मूर्ति, विशेष ठिकाणीं तयार केलेलें मद्य, दुर्मिळ चित्रें आणि पुस्तकें अशाप्रकारच्या जिन-

सांच्या किंमती मूळखर्चा जवळ जवळ सर्वदा राहात नाहींत. यावरून असा प्रश्न निघेल कीं, असल्या जिनसांची किंमत कशावरून ठरते? तर याबद्दल मागें सांगितल्याप्रमाणें अशा जिनसांची किंमत अपेक्षा व पुरवठा यांचें साम्य होईल अशी असते. कित्येकांस वाटेल कीं, असें होणें अशक्य आहे, कारण प्रत्येक मनुष्यास राफेलचें चित्र बाळगण्याची हौस आहे असें कां ह्मणूं नये? ह्मणून अपेक्षा वाढली तरी पुरवठा थोडा असून स्थिर आहे. आतां अपेक्षा ह्मणजे काय हें बरोबर ठरविलें पाहिजे. अपेक्षा ह्मणजे एखादी वस्तु बाळगण्याची केवळ इच्छा नव्हे; कारण राफेलचें चित्र आपल्याजवळ असावें असें बहुधा सर्वांस वाटेल. वस्तु बाळगण्याची इच्छा ही अपेक्षा नव्हे; अपेक्षा होण्यास त्या इच्छेचा आणि खरेदी करणाऱ्याच्या सामर्थ्याचा संयोग झाला पाहिजे. बाळगण्याची वासना आणि विकत घेण्याचें सामर्थ्य यांच्या या मिलाफास "फलित अपेक्षा" असें योग्य नांव मिळालें आहे. हीच केवळ फलित अपेक्षा किंमतीस वळण देते. येथें आतां आपल्या नजरेस दोन गोष्टी येतात, अपेक्षा आणि किंमत ह्या एकमेकावर अवलंबून असतात. अपेक्षा किंमतीवर अवलंबून असते. जशी किंमत वाढेल तशी अपेक्षा कमी होते; आणि किंमत अपेक्षेवर अवलंबून असते. पहिल्या वर्गांतील जिनसांचा पुरवठा नियमित असतो, पुरवठा आणि अपेक्षा यांचें साम्य पुरवठा वाढवून करतां येत नाहीं, ह्मणून किंमत वाढवून पुरवठ्याइतकीच अपेक्षा राहील असें केलें पाहिजे. कल्पना करूं कीं एका मयत चितार्‍याचें चित्र विकावयास काढलें आहे. त्याची किंमत १००० रुपये ठेवल्यास कदाचित् तें हजारों लोकांस घ्यावेंसें वाटेल; किंमत ५००० रुपयांपर्यंत वाढविल्यास अपेक्षा पन्नास लोकांसच रा-

हील; किंमत जर १०००० रुपयांपर्यंत चढविली तर दहा गृहस्थांची अपेक्षा राहील व चित्र आपणांस मिळण्याकरितां ते एकमेकांत चढाओढ करतील. शेवटीं किंमत १८००० रुपयांपर्यंत चढल्यावर अ आणि ब या दोघांसच अपेक्षा राहिली. कदाचित् बचा निश्चय असेल कीं १९००० रुपयांवर अधिक द्यावयाची नाहीं. परंतु अच्या मनांत २०००० रुपयांपर्यंत द्यावयाची असेल ह्मणून १९००० आणि २०००० यांच्या दरम्यान कांहीं तरी किंमत ठरणार. ती कोणती हें ठरणें अडाम स्मिथ ज्यास बाजारांतील घासाघीस ह्मणतो त्या गोष्टीवर अवलंबून आहे. चित्राच्या मालकास माहित असेल कीं, अ २०००० रुपये देईल पण चित्र जाऊं देणार नाहीं; असें चित्राच्या मालकास माहित असून १९००० रुपयांहून अधिक न देण्याचा बचा निश्चय अस माहित नसेल, तर तो चित्राचा मालक तें चित्र २०००० रुपयांस घेण्यास अचें मन वळवील. परंतु ब फक्त १९००० रुपये देणार, व मालक कसेंही करून तें विकणारच असें जर अस माहित असेल तर मग तो १९००० रुपयांहून कांहीं अधिक देतों असें ह्मणेल. ती रक्कम १९०१० रुपये असें आपण धरूं. याठिकाणीं फलित अपेक्षा पुरवठ्याबरोबर झाली; कारण किंमत १९००० रुपयांवर गेली ह्मणजे बनें आपली अपेक्षा सोडून दिली, आतां अची कायती अपेक्षा राहिली, त्यानें तें चित्र घेतलें.

**ज्या जिनसास अदलाबदलीचें मोल आहे, त्याचे विशेष दोन गुण असतात, ह्मणजे; एक त्याचा उपयोग आणि दुसरा दुर्मिळपणा.**

मयत चिताऱ्याच्या चित्रासारख्या जिनसाची किंमत कोणकोणत्या कारणांनीं नियमित होते, ह्या गोष्टीचें विवेचन अद्याप सं-

पळें नाहीं. कोणी विचारील कीं, चित्रास २०.००० रुपये देण्यास अ कां तयार होतो, आणि ब फक्त १९००० रुपयेच कां देतों ह्मणतो ? या प्रश्नाचें समाधान होण्यास मोलाच्या मूलतत्त्वांचा बारीक विचार केला पाहिजे. प्रत्येक जिनसाचें अदलाबदलीचें मोल, त्याचा जात्या उपयोग आणि दुर्मिळपणा ह्या दोन गोष्टींवर अवलंबून असतें. पहिली गोष्ट ह्मणजे जात्या उपयोग. या खालीं ज्या ज्या गुणांच्या योगानें कांहीं गरज भागते, किंवा कांहीं इच्छा तृप्त होते ते सर्व गुण येतात. हीं दोन्ही मूलतत्त्वें ज्या ज्या जिनसास अदलाबदलीचें मोल असतें त्या प्रत्येकांत असतात. जेथें दुर्मिळपणा नाहीं तेथें तो जिन्नस कितीही जरुरीचा किंवा सुंदर असला तरी त्यास अदलाबदलीचें मोल येत नाहीं. जसें हवेशिवाय जरी आपलें चालणार नाहीं, तरी एरव्हीं तिला अदलाबदलीचें मोल नाहीं, कारण प्रत्येकास पाहिजे तितकी हवा अनायासें मिळते. परंतु बुडीमारण्याच्या घाटेंतील हवेस अदलाबदलीचें मोल येतें. कारण श्रम आणि भांवडल खर्चिल्यावांचून ती मिळणें अशक्य आहे. ज्या कुरणांत किंवा रानांत फुलझाडें होतात तेथें फार सुंदर फुलांस अदलाबदलीचें मोल नाहीं, कारण तेथें तीं पाहिजे तितकीं मिळतात. परंतु तींच शहरांत आणलीं ह्मणजे त्यांस अदलाबदलीचें मोल येतें; कारण शहरांत तीं दुर्मिळ आहेत.

आतां दुसऱ्यापक्षीं जेथें उपयोगाच्या मोलाचा अभाव असतो, तेथें जिन्नस कितीही दुर्मिळ असला तरी त्यास अदलाबदलीचें मोल नाहीं, कारण ज्यापासून कांहीं गरज भागत नाहीं किंवा कोणती इच्छा तृप्त होत नाहीं तो विकत कोण घेईल ? "श्वानोच्छिष्टं काकमांसं अनिष्टमपि दुर्लभम्."

ह्या दोन गोष्टींमुळें जिनसांच्या किमतींत निरनिराळ्या प्रका-

रानें फेरबदल होतो. जिनसाची किंमत ठरण्यांत उपयोगापेक्षां दुर्मिळतेचा भाग अधिक असतो. उदाहरणार्थ, जोड्याच्या उपयोगाचें मोल असें आहे कीं, एका जोड्याची किंमत पन्नास रुपये झाली तरी थोडेच लोक तो घालावयाचा टाकतील. परंतु या ठिकाणीं त्याच्या उपयोगाची मातब्बरी कमी होऊन बहुधा सर्व किंमत दुर्मिळपणावर अवलंबून राहील. तथापि हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, जिनसाचा उपयोग कांहीं तरी असलाच पाहिजे, नाहीं तर जिनसास मुळींच किंमत येणार नाहीं. मागें व्यक्त करून दाखविलें आहे कीं, बाळगण्याची इच्छा आणि विकत घेण्याचें सामर्थ्य यांचा संयोग होऊन फलित अपेक्षा बनते. जिनसांची किंमत ठरण्यास ही फलित अपेक्षा कारण होते. हें उघड आहे कीं, कोणताही पदार्थ बाळगण्याची इच्छा होण्यास त्यास उपयोगाचें मोल पाहिजेच, ह्मणजे त्यापासून कांहीं गरज भागली पाहिजे, किंवा कांहीं इच्छा तृप्त झाली पाहिजे. जिन्नस खरेदी करण्याचें सामर्थ्य दुर्मिळपणावर अवलंबून असतें. यास उदाहरण, एक मनुष्य मजकडे येऊन प्रेतें नेण्याच्या १०० गाड्या विकत घेतां का ? ह्मणून विचारूं लागल्यास, त्या खरेदी करणें माझ्या मनांत मुळींच यावयाचें नाहीं, कारण मला त्यांचा उपयोग मुळींच दिसत नाहीं, ह्मणून त्या बाळगण्याची इच्छा होणार नाहीं. दुसऱ्यापक्षीं जर मला असें समजलें कीं, राष्ट्रीय चित्रालयांतील रॅफ्याट नांवाचीं चित्रें लिलांवानें विकणार आहेत, तर त्यांतून मला एक तरी मिळेल असें मनांत देखील आणावयास नको. तीं चित्रें बाळगण्याची माझी इच्छा मोठी असली तरी, विकत घेण्याचें सामर्थ्य मुळींच नाहीं, कारण तीं अप्रतिम चित्रें दुर्मिळ असल्यामुळें त्यांची किंमत इतकी वाढेल कीं ती माझ्यानें देववणार नाहीं.

राफेलच्या चित्रासारख्या जिनसाची किंमत नियमित करणारीं कारणें पूर्वी एका उदाहरणांत सांगितलीं आहेत, त्यांत दुर्मिळपणापेक्षां उपयोगाच्या मोलाचा भाग अधिक आहे. त्या चित्रासंबंधानें दुर्मिळपणा **अ** स व **ब** स सारखाच, त्यांत पुरवठा वाढविण्याची सोय नाहीं, तेव्हां चित्र बाळगण्यापासून जें सुख होणार त्याचें मोल **अ** आणि **ब** पैशांमध्यें जें करतील त्यावर किंमत अवलंबून राहील. आतां चित्रापासून होणाऱ्या सुखाचें मोल **अ** २०००० रुपये कां करतो, व **ब**स आपल्या इच्छेची किंमत १९००० रुपयांहून अधिक कां करवत नाहीं, याच्या कारणाची येथें फोड करून सांगतां येणें अशक्य आहे. तरी असें ह्मणतां येईल कीं, प्रत्येकास चित्र बाळगण्याची इच्छा सारखीच असेल, व दोघांनाही त्यापासून सारखेंच सुख होईल, परंतु **अ** इतका **ब** श्रीमान नसेल, ह्मणून चित्राच्या खरेदींत त्याच्या इतकी रक्कम घालणें त्यास बरोबर वाटत नसेल.

यावरून हें उघड होतें कीं, ज्या जिनसाचा पुरवठा मुळींच वाढवितां येत नाहीं, त्याची किंमत मुख्यत्वेंकरून त्याच्या अंगीं असलेल्या—गरज भागणें किंवा इच्छातृप्ति होणें या—गुणांचें मोल कांहीं लोक त्यास जितका पैका देण्याचें ठरवितील त्यानें नियमित होणारें आहे. अशा ठिकाणींसुद्धां दुर्मिळपणा असतो, कारण दुर्मिळपणा कमी झाला कीं किंमत कमी झाली, आणि दुर्मिळपणा अगदीं नाहींसा झाला कीं किंमतही नाहींशी होणार.

**शेतीच्या उत्पन्नाची किंमत.** आतां ज्या जिनसांचा पुरवठा वाढविण्यास त्या मानानें अधिक श्रम आणि भांडवल हीं लागतात, आणि पुरवठा वाढत जाईल तसतसा ज्यांस अधिक खर्च येतो, त्या जिनसांची किंमत कोणत्या कारणावरून निय-

मित होते तें पाहूं. या वर्गांत येणाऱ्या जिनसांत शेतीचें उत्पन्न मुख्य होय; परंतु त्यांत खाणींतील उत्पन्न व दालदीचें उत्पन्न यांचा समावेश होतो. जिनसाचा पुरवठा वाढेल तसा त्यास अधिक खर्च येतो ह्मणजे काय, हें बरोबर समजण्याकरितां एक उदाहरण घेऊं. कांहीं मंडळी नवीन ठिकाणीं जाऊन एक खेडें वसवितात, आणि या कामाकरितां ते मिळेल तितकी उत्तम जमीन स्वाभाविकपणें पसंत करितात. आपण अशीही कल्पना करूं कीं, ह्या खेड्यांत पन्नास लोक आहेत, आणि त्यांना जें अन्न पाहिजे तें सर्व गांवदरीच्या सुपीक जमिनींत ते उत्पन्न करितात. कांहीं वर्षांत खेड्यांतील लोकांची संख्या ५० साची १५० होते; ह्मणून त्यांस पूर्वीपेक्षां तिप्पट अन्न पाहिजे हें सांगावयास नको. अन्नाचा पुरवठा अधिक कोठून होणार ? यास उत्तर असें मिळेल कीं, खेड्यापासून कांहीं कोसांवर सुपीक जमीन विपुळ आहे, त्यांत उत्पन्न करावें. हें अगदीं खरें, कारण आपण खेडें सुपीक प्रदेशांत वसविलें आहे. परंतु खेड्यापासून कांहीं कोसांवर जें धान्य उत्पन्न करावयाचें तें बाजारांत आणण्यास गांवदरीच्या धान्यास लागतो इतका खर्च पुरणार नाहीं. तें नेण्याचा खर्च खाणारांनीं दिला पाहिजे. कल्पना करा कीं, गांवदरीचे गहूं बाजारांत दोन रुपयांस एक मण या दरानें विकत. दूर ठिकाणीं गहूं उत्पन्न करण्याचा खर्च सारखाच येतो, परंतु ते गांवांत नेण्याच्या श्रमास कांहीं तरी मोबदला पाहिजे, ह्मणून कल्पना करूं कीं दरमणीं हा खर्च चार आणे येतो. याकरितां जेव्हां गहूं गांवांत येऊन पडतात तेव्हां त्यांची किंमत मणीं सवादोन रुपये होते. ह्मणून खेड्यांत खपणाऱ्या सर्व धान्याची किंमत चढेल; कारण बाहेरून आलेलें धान्य आपल्या सारखेंच असून जर सवादोन

रुपयांच्या दरानें जातें, तर गांवदरीचे शेतकरी आपलें धान्य पहिल्या दरानें ह्मणजे दोन रुपयांस एक मण या दरानें कां विकतील? या उदाहरणांत अशी कल्पना केली आहे कीं, मंडळीची वसाहत सुपीक प्रदेशांत झाली, ह्मणून अन्नाचा पुरवठा अधिक पाहिजे होता तेव्हां तो मिळविण्यास नवीन खर्च काय तो धान्य नेण्याचाच आला. परंतु, अधिक अन्न उत्पन्न करण्यास जे श्रम अधिक लागतात; ते दूरच्या जमिनींत पीक करावयाची आवश्यकता पडल्यामुळें लागतात, हें सहज लक्षांत येईल. आतां पीक दूर ठिकाणीं करावयास लागून जमीन कमपीक असल्यास किती आयास पडतील बरें? वाईट जमिनींत धान्य उत्पन्न करून तें बाजारांत आणीपर्यंत शेंकडा तीस अधिक खर्च येईल; असें झाल्यास सर्व धान्याचा भाव शेंकडा तीस वाढेल.

पुष्कळ खर्च केल्याखेरीज अन्नाचा पुरवठा वाढणार नाहीं, अशा आणखी एका गोष्टीचा विचार केला पाहिजे. कल्पना करा कीं, एका लहान बेटावर किंवा कड्यांनीं वेष्टित अशा डोंगरांत कांहीं लोकांनीं वसाहत केली आहे. या लोकांची संख्या वाढल्यास त्यांना अन्नाचा पुरवठा अधिक केला पाहिजे. तो करण्यास लागवड केलेल्या जमिनींतच अधिक श्रम आणि भांडवल घालून उत्पन्न वाढविल्याखेरीज इलाज नाहीं. तथापि सुधारलेलीं यंत्रें व कृषिकर्म शास्त्राचें पूर्ण ज्ञान यांचें सहाय्य असूनही कांहीं मर्यादा पोंचल्यानंतर दुप्पट श्रम आणि दुप्पट भांडवल खर्चूनही दुप्पट पीक निघणार नाहीं हें सर्वांस माहित असेलच. आणि पूर्वी लोकसंख्या कमी असतां दर मणास जो खर्च येई, तोच आतां अधिक उत्पन्न वाढविण्यास दुप्पट लागल्यास कांहीं नवल नाहीं.

**लोकसंख्येची वृद्धि, अन्नाची किंमत वाढविते.** वरील उदाहरणावरून दिसेल कीं, लोकवृद्धीमुळें अन्नाची वाढलेली अपेक्षा भागविण्यास अन्न उत्पन्न करण्याचा खर्च वाढविलाच पाहिजे. ह्मणजे असेंच ह्मणावयाचें कीं, लोकवृद्धि ही शेतीच्या उत्पन्नाची किंमत वाढविण्यास प्रत्यक्ष कारण होते. पुरवठा आणि अपेक्षा यांचें साम्य झालें पाहिजे. लोकवृद्धीबरोबर अपेक्षा वाढते, आणि ज्यास्त खर्च केल्याशिवाय अधिक पुरवठा होत नाहीं. लोकवृद्धीमुळें शेतीच्या उत्पन्नाची किंमत वाढते; या गोष्टीचा प्रतिकार दोन प्रकारांनीं कांहीं अंशीं करितां येतो. ते प्रकार असे:—

१ ला. शेतीचें उत्पन्न परदेशांतून आणणें.

२. रा. शेतीच्या यंत्रांत सुधारणा करून आणि रसायनशास्त्रांत नवीन शोध लावून उत्तम खतें वगैरे उपयोगांत आणणें हे होत.

लोकवृद्धीच्या परिणामाचा प्रतिकार करणाऱ्या दोन कारणांपैकीं पहिलें इंग्लंडांत अधिक प्रबळ आहे. त्या देशांत सन १८४१ सालापासून त्या देशांत लोकवृद्धि अतोनात होऊं लागली आहे, परंतु धान्याची किंमत विशेष वाढली नाहीं. धान्याचे कायदे रद्द केले ह्मणून ही वाढलेली लोकसंख्या जगली आहे. धान्याच्या कायद्यांचा अम्मल असतांना इंग्लंडांत, बाहेरून आलेल्या धान्यावर मोठी जकात बसविली होती, यामुळें परदेशचें धान्य येण्याची बंदी होऊन लोकांस स्वदेशांत होणाऱ्या धान्यावर अवलंबून रहावें लागे. यामुळें लोकवृद्धीचा परिणाम शेतीच्या उत्पन्नाची किंमत वाढविण्याकडे पूर्ण झाला. धान्याचे कायदे रद्द झाले नसते तर लोकवृद्धि खुंटली असती; लोकवृद्धि वाढतच राहाती तर धान्याचा दुष्काळच पडला असता. लोक-

संख्या वाढल्यानें अन्न महाग होतें, हें चांगलें लक्षांत येण्यास, जे जिन्नस फारसे बाहेरून आणतां येत नाहींत त्यांच्या किंमतीचा विचार केला पाहिजे. दूध, ताजें लोणी, आणि अंडीं, यांची किंमत अलीकडे फार त्वरेनें वाढत चालली आहे; व लोकवृद्धि अशीच होत गेल्यास हे जिन्नस फारच महाग होतील. असें न होण्यास ते जिन्नस हल्लींपेक्षां चांगले टिकवितां येतील असा कांहीं उपाय शास्त्रानें काढल्यास बरें होईल. खाटीकांकडील मांसाची किंमत फारच वाढत चालली होती, परंतु अमेरिका व इतर दूर देशांहून ताजें मांस येऊं लागल्यामुळें ती उतरली. तरी इंग्लंडास परदेशाकडून मांसाचा पुरवठा कसा करावा या प्रश्नाचा अद्यापि निर्णय झाला नाहीं. मुख्य अडचण अशी आहे कीं, मांस देशांत येऊन पोंचल्याबरोबर त्याची विक्री झाली पाहिजे ती कशी व्हावी. जहाज किनाऱ्यास लागेपर्यंत त्यांतून आणलेलें मांस नासत नाहीं, कारण तें थंड ठिकाणीं ठेवलेलें असतें; परंतु तेथून तें एकदां हालविलें ह्मणजे त्वरेनें नासूं लागतें. ही अडचण कांहीं कालानें दूर होण्याचा संभव आहे.

**शेतीच्या उत्पन्नाची किंमत ज्या नियमांस अनुसरून ठरते त्यांचा सारांशः**—शेतीच्या उत्पन्नाची किंमत ज्या कारणांनीं नियमित होते त्यांचा गोषवारा पुढें थोडक्यांत दिला आहे. अपेक्षा आणि पुरवठा यांमध्यें साम्य घातलेंच पाहिजे. जेव्हां अपेक्षा पुरवठ्याहून अधिक असते, तेव्हां साम्य राहत नाहीं, कारण इतर जिनसांच्या ठिकाणीं ज्याप्रमाणें अपेक्षा काढून घेण्यास सवड असते तशी येथें सोय नाहीं. असें आहे कीं अगत्याच्या गोष्टीची अपेक्षा आणि लोकसंख्या यांच्यामध्यें नेहमीं कांहीं प्रमाण असलेंच पाहिजे भाकरी सारख्या प-

दार्थांची अपेक्षा किंमतीच्या व्यस्त प्रमाणांत नसते. भाकर महाग असो किंवा स्वस्त असो, मनुष्यांनीं ती खाल्लीच पाहिजे किंवा मेलें तरी पाहिजे; ह्मणून भाकरीच्या अपेक्षेवर किंमतीचा परिणाम फार थोडा होतो, कारण भाकरीची अपेक्षा कमी करण्यापूर्वी लोकांस इतर सर्व खर्च कमी करावा लागतो. वर सांगितलें कीं, इतर जिनसांप्रमाणें अगत्याच्या वस्तूंची अपेक्षा मागें घेतां येत नाहीं हें खरें, परंतु उपासमर किंवा अर्धीमुर्धी उपासमर होऊन ती कमी होऊं शकते. अपेक्षा कमी करण्याच्या या साधनानें लोकसंख्या कमी होते, ह्मणून अगत्याच्या पदार्थांची अपेक्षा लोकसंख्येच्या प्रमाणांत नेहमीं असली पाहिजे असें ह्मणण्यास बाध येत नाहीं. याकरितां जेव्हां अपेक्षा पुरवठ्याहून अधिक असते, तेव्हां साम्य जमतें तें अपेक्षा कमी करून नव्हे, तर पुरवठा वाढवून होय. पुरवठा अधिक करण्यास कमी सुपीक जमिनीची किंवा गैरसोयीच्या ठिकाणच्या जमिनीची लागवड केली पाहिजे. असें केलें ह्मणजे अधिक अन्न उत्पन्न करण्यास श्रम आणि भांवडल अधिक घालावीं लागतात, ह्मणजे मूळ खर्च वाढून किंमती चढतात. तेव्हां अगत्याच्या गोष्टी संबंधानें ह्मटलें तर अपेक्षा किंमतीवर अवलंबून नसते, पण किंमत अपेक्षेवर अवलंबून असते असें दिसून येईल; ह्मणजे असें ह्मणावयाचें कीं इतर गोष्टी सारख्या राहिल्यास किंमत लोकसंख्येवर अवलंबून असते. येथें हें सांगितलें पाहिजे कीं लोकवृद्धीच्या मानानें अन्नाची जी किंमत चढावी ती कित्येक कारणांमुळें चढत नाहीं. उदाहरणार्थ, खुला व्यापार, जिन्नस नेण्याआणण्याचीं सुधारलेलीं साधनें, आणि दुसऱ्या कांहीं गोष्टी यांच्या योगानें इंग्लंडांत चालू शतकामध्यें लोकवृद्धीमुळें खरोखर वाढावी तितकी किंमत वाढली नाहीं.

**खाणींचें व दालदीचें उत्पन्न.** शेतीच्या उत्पन्नासंबंधानें वर जें सांगण्यांत आलें, तें खाणींच्या आणि दालदीच्या उत्पन्नास लागू आहे. माशांची अपेक्षा जेव्हां वाढते तेव्हां ती भागविण्याकरितां कमी उत्पन्नाचीं किंवा दूरचीं ठिकाणें शोधावीं लागतात; यामुळें मूळ खर्च ( ह्मणजे मासे धरण्याचे श्रम आणि त्यासंबंधीं धोका ) वाढतो, आणि किंमती चढतात. सन १८७२ सालच्या सुमारास दगडी कोळशाचा जो भाव फार वाढला त्याचीं कारणें बहुतांशीं अशींच होतीं. सन १८७१–७२ सालांत लोखंडाच्या व्यापारास फार तेजी आल्यामुळें कोळशाची ही अपेक्षा वाढली. ती भागविण्याकरितां कमी उत्पन्नाच्या जागांतून कोळसा काढावा लागला; यामुळें मूळ खर्च पूर्वींपेक्षां ज्यास्त झाला. कांहीं लोकांची समजूत अशी होती कीं, ज्यावेळीं हा प्रकार घडला ह्मणून मानावयाचें, त्यावेळीं खाणींतील मजुरांचें वेतन वाढल्यामुळें एकाएकीं किंमत वाढली, परंतु तशी गोष्ट नव्हे; किंमत वाढल्यावर वेतन वाढलें. कोळशाच्या व्यापारास मनस्वी तेजी आल्यामुळें मजूर लोक ज्यास्त वेतन मागूं लागले, व तें त्यांस मिळालें. लोकांचें वेतन वाढल्यामुळें कोळशाची किंमत दरटनास फक्त एक रुपया वाढली, परंतु खाणीच्या तोंडाजवळ कोळशाची किंमत दरटनास पांच रुपयांहून अधिक वाढली होती. सन १८७३ सालांत कोळशाचा खप कमी होऊं लागला, आणि किंमती उतरूं लागल्या. कोळसा महाग होता तेव्हां खाणीच्या भिकार भागांत सुद्धां काम करून चालीप्रमाणें वेतन आणि नफा मिळत असे, परंतु किंमती उतरल्या बरोबर त्या भागांत खणण्यापासून फायदा होईना, ह्मणून हळूहळू ते भाग तसेच सोडावे लागले. कोळशाचा दर टनास १५ रुपये असतो तेव्हां खाणींतील अगदीं भिकार जाग्यांतून

सुद्धां कोळसा काढण्यांत फायदा होतो. परंतु तोच दर टनास १२ किंवा १० रुपये झाल्यास हा फायदा बुडेल आणि मग अर्थातच त्या जाग्यांत काम करणें सोडावें लागेल.

**शिल्पानें तयार होणाऱ्या मालाची किंमत ज्या नियमांस अनुसरून होते ते नियम.** मोलाच्या साधारण उपपत्तीचें विवेचन करतांना कारखान्यांत तयार होणाऱ्या जिनसांची किंमत ज्या नियमांवरून होते त्यांचा उल्लेख झाला आहे; परंतु त्यांच्या स्वरूपाचें स्पष्टीकरण येथें कांहीं विस्तारानें केलें पाहिजे. मूळ खर्च वाढविल्याखेरीज ज्या जिनसांचा पुरवठा वाढवितां येतो ते जिन्नस कारखान्यांत तयार होतात. ह्मणून किंमती संबंधानें जिनसांचे जे तीन वर्ग केले आहेत त्यांतील तिसऱ्या भागांत त्यांची गणना होते.

पूर्वीं सांगण्यांत आलेंच आहे कीं, कारखान्यांत तयार होणाऱ्या मालाची किंमत त्याच्या मूळखर्चावर असते, यांत इतकें मात्र लक्षांत ठेविलें पाहिजे कीं तो माल तयार करणाऱ्यांस एकमेकांवर चढाओढ करण्यास मोकळीक आहे. ह्या मालाच्या मूळखर्चाचे घटकावयव कोणते आहेत हें आतां विशेष रीतीनें उघड करून सांगणें अवश्य आहे. कदाचित् असें वाटण्याचा संभव आहे कीं, शेतीच्या आणि खाणीच्या उत्पन्नाच्या किंमतीस जे नियम लागू आहेत, तेच शिल्पनिर्मित मालाच्या किंमतीस लागू असावे. कारण कारखान्यांत जिन्नस तयार करण्यास जो कच्चा माल लागतो, तो नेहमीं जमिनीपासूनच उत्पन्न झालेला असतो. तागाचें कापड तागापासून होतें; ह्मणून असें वाटणें स्वाभाविक आहे कीं, तागाचें कापड अधिक तयार करण्यास मूळखर्च वाढविला पाहिजे. कारण ज्या सृष्ट पदार्थापासून तें बनतें त्याचा खर्च हळूहळू वाढेल. शिल्पनिर्मित जिनसाच्या

किंमतींत कच्च्या मालाच्या किंमतीचा अंश आहे यांत संशय नाहीं, परंतु बहुतेक शिल्पकृत जिनसांत तो अंश महत्वाचा नसतो. कापसाच्या कापडाचें उदाहरण घेऊं. कापड तयार होईपर्यंत कापसावर इतके संस्कार व्हावे लागतात कीं, तयार झालेल्या कापडाच्या मानानें त्या कापसाची किंमत फारच थोडी असते. कच्चा कापूस हिंदुस्थानांत पिकतो; तो गलबतावर चढवून समुद्रांतून लिवरपुलास नेला पाहिजे; तो विलायतेस पोंचल्यावर त्यावर असंख्य संस्कार घडतात, व त्या कामांत निरनिराळ्या प्रकारचे कारागीर असतात, त्या सर्वांस त्यांच्या श्रमाचा मोबदला मिळाला पाहिजे; व हीं कामें चालण्यास जें भांडवल लागतें तें चालीप्रमाणें नफा मिळून उगवलें पाहिजे व भांडवलवाल्याच्या अभोगाचें बक्षीसही निघालें पाहिजे. मागें लोखंडाच्या कांबीचें उदाहरण दिलें त्यांत असें सांगितलें आहे कीं, घड्याळाकरितां कृतीनें तिच्या हेअरस्प्रिंग केल्या तर तिचें मोल ४००० पट वाढतें.

**मूळखर्चाचा मुख्य घटकावयव.** या संबंधानें असें स्पष्ट दिसून येईल कीं, शिल्पनिर्मित माल तयार करण्यास जो खर्च लागतो, त्याचा मुख्य घटकावयव श्रम होय. मूळखर्चांत भांडवलवाल्याच्या अभोगाचा ही बराच अंश असतो. श्रम आणि अभोग यांच्या मानानें कच्च्या मालाच्या किंमतीचा विचार करण्याचें फारसें कारण नाहीं. तयार झालेल्या जिनसास किंमत इतकी आली पाहिजे कीं, भांडवलवाला, व मजूर यांना आपला उद्योग चालू ठेवण्यास उमेद राहील.

शिल्पनिर्मित जिनसांचा पुरवठा वाढविल्यास, त्यांचा खर्च अधिक होत नाहीं; इतकेंच नव्हे, तर कमीच होतो, असें वारंवार घडतें. जिन्नस तयार करण्याचा कारखाना मोठा असला ह्मणजे बऱ्याच गोष्टी कमी खर्चानें करितां येतात. जेथें वाफेच्या

शक्तीचा उपयोग करितां येण्यासारखा आहे, तेथें त्यापासून भांडवल व श्रम हीं मनस्वी वांचतात. तथापि कारखाना मोठा असल्याखेरीज वाफेच्या शक्तीचा उपयोग करण्यांत फायदा नाहीं. उदाहरणार्थ, मागावर हातानें कापड विणण्याचा धंदा कमी होऊन त्या जागीं गिरण्या आल्या आहेत, परंतु गिरण्यांचे कारखाने मोठे नसते तर त्यांत कापड स्वस्त न निघतें. साधारण नियम असा कीं, कोणताही धंदा चालविण्यास लागणारा खर्च त्या धंद्यांत होणाऱ्या कामाच्या मानानें वाढत नाहीं. बहुत वेळां पूर्वींच्या इमारतींतच अधिक लोकांस काम करण्याचीं सोय होते. मजुरांवर देखरेख करणारास कमी लोकांवर व अधिक लोकांवर देखरेख करण्यांत फारशी तफावत वाटत नाहीं. दुप्पट किंवा तिप्पट काम वाढलें तरी हिशेबाच्या खात्यांत कारकुनांची संख्या दुप्पट किंवा तिप्पट वाढवावी लागत नाहीं. व जेथें कारखाना मोठा असेल तेथेंच पूर्ण श्रमविभाग करणें सोपें होईल हें उघडच आहे. उदाहरणार्थ, जेव्हां मागावर हातानें कापड काढीत, तेव्हां विणण्याच्या सर्व क्रिया एकाच मनुष्यास कराव्या लागत. हल्लीं प्रत्येक क्रिया करण्यास भिन्न भिन्न कारागिरांचा समुदाय योजिलेला असतो, ह्मणून माल पुष्कळ निघण्यास फार साहाय्य होतें. ज्याचें भांडवल थोडें आहे व ज्याचा कारखाना लहान आहे, त्यास मोठ्या खर्चाचीं यंत्रें घेतां येत नाहींत, कारण त्यांस पुरे इतकें काम त्याजपाशीं नसतें. कांहीं जिन्नस असे आहेत कीं, त्यांचा थोडा खप होतो तो ज्यास्त झाल्यास ते उत्पन्न करण्याचा खर्च पुष्कळ कमी होतो. ह्या गोष्टीचें एक चमत्कारिक उदाहरण वल्ह्यानें चालणाऱ्या लहान होड्या तयार करण्याच्या संबंधानें आढळांत आलें आहे. कांहीं वर्षांमागें या होड्या तयार करण्यासाठीं एका यंत्राची युक्ति निघाली. त्या-

पासून या होड्या करण्याचा खर्च शेंकडा तीस या मानानें वांचला असता. तथापि होड्या बांधणारांनीं यंत्राचा उपयोग केला नाहीं, तो एवढ्याच करितां कीं, त्या यंत्राची गति फार असल्यामुळें उभ्या वर्षांत जितक्या होड्या तयार होतात तितक्यांस लागणाऱ्या फळ्या त्या यंत्रानें थोड्या वेळांत कापून तयार होतात. होडी तयार करणाऱ्यानें पैसा खर्चून असलें यंत्र खरेदी केलें, तर फार करून बारा महिन्यांत एक महिनाभर त्याचें काम पडेल. बाकी अकरा महिने यंत्र तसेंच पडणार, यामुळें मालकास फायदा होणार नाहीं. होड्यांची अपेक्षा फार वाढल्याखेरीज किंवा एकच कारखानदार पुष्कळ देशांस होड्या पुरवीपर्यंत हें यंत्र बहुधा उपयोगांत यावयाचें नाहीं.

**भांडवलवाल्यास मजुरीचा खर्च पडतो तो मजुरीच्या रकमेच्या प्रमाणानें कमज्यास्त होत नाहीं.** भांडवलवाला आपल्या हाताखालच्या लोकांस जें वेतन देतो त्या रकमेच्या प्रमाणानेंच नेहमीं त्याचा वेतनखर्च असतो असें नाहीं; हें लक्षांत ठेवलें पाहिजे. वेतनाच्या मानानें ज्या मोलाचें काम होतें त्यावर तो अवलंबून असतो. उदाहरणार्थ, घड्याळें किंवा कांच करण्याच्या कारखान्यांत मोठें वेतन देऊन कसबी लोक ठेवण्यांत विशेष फायदा असतो हें सर्वांस माहित आहे. ह्मणून बिनकसबी लोकांहून दुप्पट वेतन द्यावें लागलें तरी कसबी लोक ठेवण्यांतच खर्च कमी लागतो असें समजलें पाहिजे. ब्रासी साहेब ह्मणून जे मोठे रेलवे कंट्राक्टर आहेत, त्यांनीं फ्रान्सदेशांत कांहीं रेलवे बांधण्याचें काम पत्करलें होतें, तेव्हां तेथें मजूर लोक इंग्लंडाहून आणविण्यांत त्यांना फायदा दिसूं लागला. कारण इंग्लिश मजूर, फ्रेंच मजुराहून जरी दुप्पट वेतन मागत होते तरी त्यांच्या दुप्पटीहून ते अधिक काम करीत ह्मणून फ्रेंच

मनुष्यापेक्षां इंग्लिश मनुष्याचें वेतन जरी दुप्पट असलें तरी त्याचे श्रम अधिक खर्चाचे होत असें ह्मणतां येणार नाहीं.

श्रमाच्या फलद्रुपपणाचें दुसरें एक स्वरूप मनांत आणलें पाहिजे. श्रमाचा फलद्रुपपणा वाढल्यानें श्रमकारांचाही पुष्कळ फायदा होतो. फलद्रुपपणा वाढला ह्मणजे अमुक श्रम आणि भांडवल यांपासून धनोत्पत्ति अधिक होते, ह्मणून जर किंमती आहेत तशाच राहिल्या तर श्रमाचा फलद्रुपपणा वाढल्यामुळें भांडवलाचा नफा व श्रमाचें वेतन हीं दोन्ही वाढतील. कल्पना करा कीं, शिक्षणानें शेतकऱ्याचा श्रम अधिक फलद्रुप होतो. हा परिणाम फार करून तो अधिक समजुतदार, अधिक विश्वासू, आणि अधिक नेमस्त असा झाल्याचा होय. तेव्हां शेतीच्या उत्पन्नाची किंमत न वाढवितां व आपला नफा किंवा शेताचा शारा कमी न करितां त्याच्या मालकास त्याचें वेतन वाढवितां येतें.

**भांडवलाचा नफा.** भिन्न काळीं आणि भिन्न देशीं नफ्याचा सरासरीचा दर कोणत्या कारणावरून ठरतो हें सांगण्याची येथें अवश्यकता नाहीं. धनाच्या वांटणीविषयीं जें खंड पुढें येणार आहे, त्यांत या विषयाचा विचार होईल. येथें इतकेंच सांगणें पुरे आहे कीं, एका देशीं व एका काळीं सर्व धंद्यांत भांडवलाचें व्याज सारखेंच राखण्यास पुष्कळ कारणें घडून येतात. एका व्यापारापेक्षां दुसऱ्यांत चिरकाळ नफा अधिक होतो असें दिसलें ह्मणजे हा अधिक होणारा नफा बारकाईनें पाहतां भांडवलाचा नफा असें समजूं नये; श्रमाचें वेतन, धोक्याचा, किंवा कामाच्या त्रासदायकपणाचा, किंवा त्यांत होणाऱ्या बेअब्रूचा तो मोबदला किंवा हा असाधारण नफा स्वाभाविक किंवा मुद्दाम मिळविलेल्या मक्त्यापासून झालेला असेल. केव्हां केव्हां कांहीं विशेष धंदा करणारे लोक एकत्र जमून कट करतात; कांहीं वर्षांमागें कोय-

नेला संबंधानें एक कट झाला होता; ह्मणजे कांहीं भांडवलवाल्यांनीं जगांतील सर्व कोयनेल खरेदी करून त्याची किंमत दुप्पट केली, आणि पुष्कळ नफा मिळविला. कोणताही जिन्नस एकानें आपल्या स्वाधीन करून घेऊन त्यापासून पाहिजे तसा नफा मिळविल्याचें हें एक उदाहरण आहे. नियमास अडथळा आणणारीं हीं वरील सर्व कारणें दूर केलीं ह्मणजे असें आढळेल कीं भांडवलाचें व्याज चोहोंकडे सारखेंच मिळतें.

भांडवलाच्या स्वरूपाचें वर्णन मागें झालें आहे; आतां येथें इतकेंच सांगितलें ह्मणजे पुरे कीं, जमीन, श्रम, आणि भांडवल यांनीं मिळून उत्पन्न केलेला धनाचा जो अंश भांडवलाच्या वांट्यास येतो तो नफा समजावा. या बक्षिसाची रक्कम भिन्न काळीं, भिन्न राष्ट्रांत भिन्न असते. कांहीं देशांत भांडवलवाल्यांस व्यापारांत घातलेल्या दर १०० रुपयांवर निव्वळ १० रुपये मिळतात; याखेरीज त्यांना धोक्याचा मोबदला व देखरेखीचें वेतन मिळतें, तें निराळेंच. असें असतें तेव्हां व्याजाचा दर शेंकडा १० असें ह्मणतात. पुष्कळ देशांत व्याजाचा सरासरी दर याहून फार कमी असतो; इंग्लंडांत शेंकडा ३ पेक्षां कांहींसा कमी आहे.

**नफा आणि किंमती यांतील संबंध.** भांडवलवाल्याचें आणि श्रमकाराचें बक्षीस (ह्मणजे त्यांचा नफा आणि वेतन) हीं त्यांनीं निर्माण केलेल्या जिनसांच्या किंमतींत आलीं पाहिजेत हें नेहमीं लक्षांत असलें पाहिजे. धंदा पुढें चालवायाचा असल्यास, भांडवलवाला व मजूर यांचा नफा व वेतन, त्यावेळीं व्यापारांत असलेल्या दराच्या मानानें मिळेल, इतकी जिनसाची किंमत असलीच पाहिजे. याहून किंमत कमी झाल्यास मजूर व भांडवलवाला, हे दुसऱ्या धंद्यांत शिरून अधिक द्रव्य मि-

ळवितील, आणि ह्या जिनसांचा कारखाना बंद पडेल. ह्मणून ज्या गोष्टीनें देशांतील चालू फायद्याचा दर वाढतो, तीच गोष्ट तयार झालेल्या जिनसांची किंमत वाढविण्यास कारण होते.

तथापि किंचित् विचाराअंतीं स्पष्ट दिसून येईल कीं, नफा, आणि भांडवल यांचा दर एकंदरींत विशिष्ट भांडवल आणि श्रम यांच्या फलद्रुपपणावर, ह्मणजे त्यापासून माल पुष्कळ तयार होण्यावर अवलंबून असतो. असें असलें ह्मणजे मूळ खर्च कमी होऊन वेतन व नफा हीं वाढतात, आणि किंमती कमी असूं शकतात. यावरून असें दिसून येईल कीं, मोठा नफा व मोठ्या किंमती आणि हलका नफा व हलक्या किंमती यांचा नेहमीं संबंध नसतो. उदाहरणार्थ, कल्पना करा कीं, एका खेड्यांतील सुतारानें असें एक यंत्र काढलें कीं, त्यामुळें त्याचें भांडवल व श्रम यांची उत्पादक शक्ती शेंकडा ५० वाढली. जेथें तो पूर्वीं दहा पेट्या किंवा दहा मेजें करी, तेथें आतां तितक्याच भांडवलानें व श्रमानें तो पंधरा पेट्या किंवा पंधरा मेजें करूं लागला. किंमती उतरल्या नाहींत तर त्याच्या भांडवलावर व श्रमावर त्यास शेंकडा ५० फायदा अधिक होईल हें उघड आहे. त्याचें वेतन व त्याचा नफा हीं दोन्ही वाढलीं; आणि मूळखर्च कमी झाला. तथापि त्यास आपल्या युक्तीचा फायदा सार्वकाळ मिळेल असा संभव नाहीं. पेट्या, खुर्च्या, मेजें वगैरे जिनसांचा पुरवठा वाढल्यावर त्यांची किंमत उतरेल. वरचेवर सांगण्यांत आलें आहे कीं, अपेक्षा व पुरवठा यांचें साम्य केलें पाहिजे. याठिकाणीं पुरवठा शेंकडा ५० प्रमाणें वाढला. अशी कल्पना करूं कीं, हा पुरवठा वाढण्यापूर्वीं पूर्वींचा पुरवठा अपेक्षेइतका होता. याकरितां आपल्या मालास गिऱ्हाईक पाहिजे असल्यास सुतारानें त्याची किंमत कमी केली पाहिजे. कदाचित्

त्याला अनुभवावरून समजेल कीं, आपला सर्व माल खपण्यास शेंकडा १५ या मानानें किंमत उतरली ह्मणजे झालें. ह्मणून त्याच्या युक्तीपासून होणाऱ्या फायद्याचा हा अंश सोडण्यास तो राजी होतो, व आपलें वेतन आणि नफा यांत शेंकडा ३५ च भर पडली एवढ्यानें संतुष्ट राहातो. या ठिकाणीं वेतन व नफा हीं दोन्ही वाढलीं, परंतु मूळखर्च कमी होऊन शेवटीं किंमतीही उतरल्या.

वर दिलेल्या उदाहरणांत अशी कल्पना केली आहे कीं, ज्या सुतारानें यंत्र काढलें त्यास त्याच्या धंद्याचा कोणी प्रतिस्पर्धी जवळ नाहीं. पण कल्पना करा कीं, त्याच खेड्यांत तीन किंवा चार सुतार होते; ते होईल तितक्या त्वरेनें तशीं यंत्रें मिळवितील; खुर्च्या मेजें वगैरे जिनसांचा पुरवठा फारच वाढेल; प्रत्येक सुतार, आपल्याकडे गिऱ्हाईक यावें ह्मणून दुसऱ्याहून कमी किंमतीस सामान विकूं लागेल; आणि शेवटीं असें होईल कीं यंत्राच्या युक्तीचा सर्व फायदा गिऱ्हाइकांसच द्यावा असें त्यास वाटूं लागेल; सुताराचें वेतन व नफा पूर्वीच्या थरावर येतील, आणि किंमती शेंकडा ५० प्रमाणें उतरतील. ह्या उदाहरणावरून असें दिसतें कीं:—

१. श्रम आणि भांडवल हीं जेव्हां अधिक फलद्रुप होतात, तेव्हां वेतन व नफा हीं वाढतात आणि मूळखर्च कमी होतो.

२. हा फलद्रुपपणा जेव्हां वाढतो तेव्हां किंमती उतरून त्याबरोबर वेतन आणि नफा हीं वाढतील किंवा न वाढतील.

३. जेथें एकपक्षीं भांडवलवाल्यांत व दुसऱ्या पक्षीं मजुरांत यथेच्छ चढाओढ आहे, तेथें भांडवल आणि श्रम यांच्या फलद्रुपपणाचा फायदा बहुधा गिऱ्हाईकास मिळतो, ह्मणजे असें ह्मणावयाचें कीं, फलद्रुपपणा वाढल्यानें किंमती उतरतात,

आणि श्रमाचें वेतन व भांडवलाचा फायदा हीं सार्वकाळ चढत नाहींत.

येथें असें सांगणें योग्य आहे कीं, फलद्रुपपणा वाढल्याचा बहुधा परिणाम आपण बोलत आहों त्या विशिष्ट जिनसाची किंमत कमी करण्याकडे असतो; आणि श्रमाच्या वेतनाचा पैसा, किंवा भांडवलाचा नफा हे त्यापासून अधिक होत नाहींत, तथापि नवीन युक्तीमुळें स्वस्त झालेली वस्तु कामकरी लोक व भांडवलवाले यांच्या उपभोगांत येणारी असेल, तर श्रम आणि भांडवल यांचें वास्तविक बक्षीस वाढलें. ह्मणजे असें कीं, वेतन आणि नफा यांत जो पैसा वांटून दिला जातो त्याचें विकत घेण्याचें सामर्थ्य वाढलें. जोडे स्वस्त झाले असें समजा; तर श्रमाच्या वेतनाचा पैसा आहे तोच राहिला, तरी खरोखर वेतन वाढलें असेंच ह्मटलें पाहिजे, कारण तितक्याच पैशास जोडे खरेदी करून दुसरे जिन्नस घेतां येतील. उद्योगांत वाफेच्या उपयोगापासून भांडवलवाले व मजूर यांचें हित झालें आहे तें वरील प्रकारचेंच होय. यामुळें श्रम आणि भांडवल यांचा फलद्रुपपणा मनस्वी वाढून जो फायदा झाला तो सर्व भांडवलवाले व मजूर यांस आपल्याकडे राखतां आला नाहीं; कारण वेतनाचा व फायद्याचा दर विशेष वाढला नाहीं; तसें होण्यास मुख्य अडचण इतर भांडवलवाले व मजूर यांची चढाओढ होय. श्रम आणि भांडवल यांचा फलद्रुपपणा वाढल्यामुळें त्यांचें एकंदरींत हित झालें तें हेंच कीं, त्यापासून बहुतेक शिल्पनिर्मित जिनसांची किंमत उतरली. या गोष्टीचा आणखी विचार पुढें करण्यांत येईल.

**किंमतीवर अपेक्षा आणि पुरवठा यांचा जो परिणाम होतो त्याचा सारांश.** मागें जिनसांचें जे तीन वर्ग

सांगितले त्यांच्या किंमतीवर अपेक्षा आणि पुरवठा यांची क्रिया कशी घडते त्याप्रकाराचें वर्णन पुढें थोडक्यांत दिलें आहे. हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, ह्या सर्व जिनसांची किंमत कसें तरी करून अशी बसविली पाहिजे कीं, अपेक्षा आणि पुरवठा हीं सारखीं होतील.

पहिल्या वर्गांतल्या जिनसांचें, ह्मणजे ज्यांचा पुरवठा नियमित आहे, त्यांचें असें आहे कीं त्यांच्या पुरवठ्यांत व अपेक्षेंत सारखेपणा राहण्यास किंमत इतकी चढवावी लागते कीं, पुरवठ्याहून अधिक असलेली अपेक्षा नाहींशी होईल.

आतां जिनसांचा दुसरा वर्ग घेऊं. मूळखर्च वाढविल्या खेरीज ज्यांचा पुरवठा वाढवितां येत नाहीं, त्या जिनसांची अपेक्षा पाहिजे तशी कमी करतां येत नाहीं. कारण या वर्गांतील बहुतेक जिन्नस फार अगत्याचे असतात; ह्मणून पुरवठ्याहून अपेक्षा जेव्हां अधिक असेल, तेव्हां पुरवठाच वाढविला पाहिजे. मूळखर्च वाढविल्याखेरीज हें होणें नाहीं. ह्मणून ज्यास्त लागलेला श्रम आणि भांडवल हीं उगविण्याकरितां किंमती चढल्या पाहिजेत.

मूळखर्च वाढविल्याखेरीज जे जिन्नस पाहिजे तितके तयारकरितां येतात त्यांचा वर्ग तिसरा. यांची अपेक्षा पुरवठ्याहून अधिक असली ह्मणजे किंमती वाढतात, व अपेक्षेचा कांहीं अंश कमी होतो; परंतु अपेक्षा व पुरवठा हीं सारखीं करण्याचा हा प्रकार फार वेळ टिकत नाहीं. जिन्नस उत्पन्न करणाऱ्या लोकांस चालीपुरतें वेतन व नफा मिळणें अवश्य आहे; किंमतीचा भाव याहून अधिक झाल्यास जिन्नस अधिक तयार होऊं लागतात. जिनसांची वृद्धि झाली ह्मणजे पुरवठा वाढतो, आणि किंमती उतरतात; शेवटीं अपेक्षा व पुरवठा यांचा मेळ पुरवठा वाढून पडतो.

जिनसांचे जे तीन वर्ग केले आहेत, त्यांच्या किंमती ज्या कारणांवरून नियमित होतात त्यांचें विवेचन येथपर्यंत झालें. आतां पुढल्या भागांत पैशाचें मोल या विषयाचें विवेचन होईल.

## ३ ऱ्या भागावर प्रश्न. जिनसांचें मोल.

१. मोलाच्या संबंधानें जिनसांचे किती वर्ग केले आहेत?

२. मूळखर्च ह्मणजे काय?

३. मूळखर्चाचे घटकावयव मिल्लसाहेबानें कोणते सांगितले आहेत?

४. प्रोफेसर केर्न्ससाहेबानें मूळखर्चाची दुसरी व्याख्या कोणती दिली आहे?

५. "किंमती अपेक्षा व पुरवठा यांवर अवलंबून असतात" या वाक्याचा बरोबर उलगडा करा.

६. अपेक्षा व पुरवठा यांचें साम्य व्हावें लागतें, तें ज्या रीतीनें घडून येतें त्याचें एक उदाहरण द्या.

७. भांडवलवाला व श्रमकार हे मिळून जिन्नस तयार करतात. त्याबद्दल त्यांना चालीप्रमाणें नफा व वेतन ह्मणून कांहीं रक्कम मिळते. आतां ही रक्कम व जिनसांचा बाजारभाव हीं सारखीं ठेवण्याकडे कांहीं गोष्टींचा कल असतो तो कसा हें स्पष्ट करून सांगा.

८. हा सारखेपणा राहण्यास जिनसांची वृद्धीच झाली पाहिजे. ज्या जिनसांचा पुरवठा मुळींच वाढवितां येत नाहीं त्यांच्या किंमतीचा मेळ कसा पडतो?

९. फलित अपेक्षा ह्मणजे काय?

१०. ज्या जिनसास अदलाबदलीचें मोल असतें त्याचे विशेष दोन गुण कोणते असतात?

११. हे गुण सर्वकाळ एकसारखेच दृष्टीस पडतात काय?

१२. उदाहरणें द्या.

१३. राफेलच्या चित्रासारख्या जिनसाची किंमत ठरविण्यांत कोणता गुण अधिक प्रबळ असतो ?

१४. ज्या जिनसांचा पुरवठा वाढविण्यास खर्च अधिक लागतो त्यांतील मुख्य मुख्य जिन्नस कोणते ?

१५. अन्नाचा पुरवठा अधिक उत्पन्न करण्यास त्या मानानें भांडवल व श्रम हीं अधिक खर्चावीं लागतात, असें कोणत्या कारणावरून होतें तें उदाहरण घेऊन दाखवा.

१६. अन्नाच्या ज्यास्त पुरवठ्याची अपेक्षा कशामुळें होते ?

१७. ह्मणून अन्नाची किंमत वाढविण्यास मुख्यत्वेंकरून कोणती गोष्ट कारण होते ?

१८. या गोष्टीच्या प्रवृत्तीचा प्रतिकार केव्हां केव्हां कसा होतो ?

१९. शेतीच्या उत्पन्नांची किंमत ज्या नियमांस अनुसरून होते, तेच नियम आणखी कोणत्या जिनसास लागू आहेत ?

२०. मोलासंबंधानें जिनसांचे जे तीन वर्ग केले आहेत त्यांपैकीं तिसरा कोणता ?

२१. ज्या नियमांस अनुसरून शेतीच्या उत्पन्नाची किंमत होते तेच नियम शिल्पनिर्मित जिनसांच्या किंमतीस लागू आहेत काय ?

२२. त्यांतील भेदांचें कारण स्पष्ट करून सांगा.

२३. पुरवठा वाढल्यावर केव्हां केव्हां शिल्पनिर्मित पदार्थांची किंमत कमी होते. हें कसें तें उदाहरण घेऊन दाखवा.

२४. श्रमाच्या फलद्रूपपणाचा परिणाम मूळखर्चावर कोणत्या रीतीनें होतो ?

२५. वेतन, नफा, मूळखर्च आणि किंमती यांमध्यें कोणता संबंध असतो ?

२६. उदाहरण घेऊन असें दाखवा कीं, कांहीं प्रसंगीं किंमती न वाढतां नफा आणि वेतन हीं दोन्ही वाढतात.

२७. ह्मणून किंमतीशी नफ्याचा दर व श्रमाचें वेतन यांचा जो संबंध असतो त्याविषयीं व्यवहारोपयोगी कोणतें अनुमान निघतें ?

२८. श्रम आणि भांडवल यांचा फलद्रूपपणा सर्व साधारण वाढला, ह्मणजे मजूर, भांडवलवाले, व जिन्नस घेणारे, यांचें हित कोणत्या प्रकारानें होतें ?

२९. ज्यांचा पुरवठा मुळींच वाढवितां येत नाहीं असे जिन्नस, शेतीचें उत्पन्न, आणि शिल्पनिर्मित जिन्नस यांची किंमत ज्या नियमांवरून ठरते ते सांगा.

---

१. गरीब लोक जर गवत खाऊन राहूं लागले, तर रोटीवाला एक आणा किंमतीच्या पावाचा आकार वाढवील काय ?

२. अन्न उत्पन्न करण्याचा खर्च जर आहे तसाच राहून हिंदुस्थानची लोकसंख्या दरसाठ वर्षांस दुप्पट होऊं लागली तर काय परिणाम होईल ?

३. कोणीं एकानें नवीन यंत्र काढलें, व त्यामुळें विशिष्ट जिन्नस अधिक तयार होऊं लागला, तर यंत्र काढणाऱ्यानें त्या बद्दलची सनद करून घेऊन सर्व फायदा आपणच खावा असें तुह्मास वाटतें काय? किंवा त्यानें कारखानदारांत चढाओढ होऊं देऊन जिन्नस घेणाऱ्या लोकांस आपल्या युक्तीचा सर्व फायदा द्यावा ?

४. जिनसांच्या किंमतींत फेरबदल होण्यास त्यांची अपेक्षा कारण होते. एका भिक्षेकऱ्यास गाडी पाहिजे असें वाटल्यास गाड्यांच्या किंमतीवर त्याचा कांहीं परिणाम होईल काय ? होणार नसेल तर कां नाहीं ?

५. कल्पना केली कीं, माझ्या घरांतील सर्व माणसांनीं अमेरिकेंतून येणारें मांस खाण्याचें टाकलें, तर तें मांस देशांत आणल्याचा परिणाम खाटक्याच्या बिलावर कांहीं होईल काय?

६. समजा कीं, मांस स्वस्त झालें, आणि त्यामुळें आमच्या खाटक्याचीं बिलें एक तृतीयांशानें उतरलीं. आतां आमच्या घरीं पूर्वी सहा माणसें होतीं त्या ठिकाणीं नऊ झालीं तर माझी कायमची स्थिति पूर्वीपेक्षां बरी झाली काय?

---

## भाग ४.

## पैशाचें मोल.

पैशाचे किंमतीविषयीं लोक बोलतांना वारंवार ऐकण्यांत येतें. हे शब्द फार करून व्याजाच्या दरासंबंधानें उपयोगांत येतात; जे पैसा कर्जाऊ काढतात व तो फेडते वेळीं घेतलेल्या रकमेपेक्षां जेव्हां त्यांस फार अधिक द्यावें लागतें, तेव्हां पैशाची किंमत किंवा व्याजाचा दर भारी आहे असें ह्मणतात. तथापि येथें असें सांगितलें पाहिजे कीं, पैशाची किंमत या शब्दाचा व्यवहारांत जो अर्थ आहे तो खेरीज करून विचार केल्यास त्या शब्दांचा कांहींच अर्थ नाहीं, असें ह्मटलें पाहिजे. मागील एका भागांत सांगितलेंच आहे कीं, जिनसाचें मोल त्याच्या अदलाबदलीच्या सामर्थ्यावर ह्मणजे तो देऊन मिळणाऱ्या जिनसांच्या संख्येवर आहे. त्या वेळेस असें दाखविण्यांत आलें कीं, किंमत ही मोलाचा विशेष प्रकार होय, जिन्नसाचें मोल पैशानें केलें ह्मणजे त्यास किंमत ह्मणतात. ह्मणून वर सांगितलेल्या अर्थाखेरीज पैशाच्या किंमतीविषयीं बोलणें ह्मणजे किंमतीची किंमत असें ह्मटल्याप्रमाणें आहे. ही शब्दयोजना वेडेपणाची आहे असें सांगावयास नकोच. कारण मग दहा रुप-

यांची किंमत दहा रुपये किंवा एका अधेलीची किंमत दोन पावल्या असें कां ह्मणूं नये ? कोणत्याही जिनसाचें मोल त्याची त्याच्याशींच तुलना करून ठरविणें अशक्य आहे.

**पैशाचें मोल.** पैशाचें मोल ह्मणजे त्याचें अदलाबदलीचें सामर्थ्य: पैसा देऊन दुसरे जिन्नस जेव्हां पुष्कळ मिळतात, ह्मणजे किंमती हलक्या असतात, तेव्हां पैशाचें मोल मोठें असतें. पैसा देऊन त्याबदली दुसऱ्या वस्तु जेव्हां थोड्या मिळतात, ह्मणजे जेव्हां किंमती मोठ्या असतात, तेव्हां पैशाचें मोल कमी असतें.

**ज्या नियमांस अनुसरून खनिज उत्पन्नाचें मोल ठरतें तेच नियम पैशाच्या मोलास लागू आहेत.** इंग्लंडांत मुख्य नाणें सोन्याचेंच आहे. एक औंस वजन सोन्यास अमुक पैका नेहमीं मिळतो ह्मणून कांहीं लोकांचा चुकीचा असा समज होतो कीं, पैक्याची किंमत कधींच बदलत नाहीं. किंमती चढ असोत किंवा उतार असोत, टांकसाळेंत एक औंस वजन सोन्यास नेहमीं ३ पौंड १७ शि. १०½ पेन्स मिळतात. ह्या गोष्टीवरून पैशाची किंमत बदलत नाहीं हें सिद्ध होतें असें ज्यांस वाटतें, त्यांना असेंही वाटेल कीं, जमिनीची किंमत बदलत नाहीं; कारण एक बिघा जमिनीचे पांच पांच पाडांचे चार विभाग करतां येतात. एक औंस सोन्यास नेहमीं ३ पौंड १७ शि. १०½ पेन्स येतात, यावरून एवढेंच समजावयाचें कीं, एक औंस सोन्याचे ३ पौंड व १७ शि. १०½ पेन्स इतक्या किंमतीचा पौंडाचा अंश असे विभाग होतात.

इतर खनिजपदार्थांचें मोल जसें ठरतें तसेंच मौल्यवान धातूंचेंही ठरतें. ह्मणजे मौल्यवान धातूंचें मोल अपेक्षा व पुरवठा यांचें समीकरण होऊन ठरतें. अपेक्षा वाढली ह्मणजे मोल वाढतें,

व अधिक पुरवठाही होऊं लागतो. आतां हा वाढलेला पुरवठा जर कमी उत्पन्नाच्या ठिकाणापासून होत असेल, तर मूळ खर्च वाढून मौल्यवान धातूंचें मोल चढेल. पण वाढलेला पुरवठा जर चांगल्या खाणी सांपडून होऊं लागला, तर मूळखर्च कमी होऊन सोन्यारुप्यांचें मोलही उतरेल. अमेरिकेमध्यें नवीन खाणींचा शोध लागल्यामुळें अलीकडे तेथें रुपें फार निघूं लागलें आहे. यामुळें हिंदुस्थानासारख्या देशांत ह्मणजे जेथें रुप्याचेंच नाणें चालतें, तेथें सरकारास बरेंच नुकसान सोसावें लागत आहे. याचा परिणाम इंग्लंडांतील नाण्यावर कांहींच होत नाहीं. कारण इंग्लंडांतील रुप्याचीं नाणीं हीं फक्त खुणांदाखल आहेत; एक पौंड सोन्याचें जें मोल असतें तितकें वीस शिलिंगांतील रुप्याचें कधींच असत नाहीं. इंग्लंडांतील चलनी नाणीं सोन्याचींच होत, आणि चाळीस शिलिंगांहून, अधिक रकम देतेवेळीं सोन्याचें नाणेंच दिलें पाहिजे असा कायदा आहे. रुप्याचा भाव उतरल्यामुळें हिंदुस्थान सरकारचें पुष्कळ नुकसान होत आहे, कारण लष्करी खात्यासंबंधानें वगैरे विलायतेस भरावा लागणाऱ्या पैक्यास बट्टा फार पडतो, व सरकारचा मुख्य वसूल जो जमिनीचा धारा तो अमुक रुपये असा कायद्यानें ठरविला असल्यामुळें वाढवितां येत नाहीं.

**सोनें व रुपें यांच्या अपेक्षेवर कार्य करतात त्या गोष्टी.** मागें सांगितलें आहे कीं, जिनसाची अपेक्षा त्याच्या मोलानें नियमित होते. या नियमास पैसा अपवाद नाहीं. कोणतेंही काम करण्यास जितकें सोनें लागतें त्याच्या तेवीसपट रुपें कां लागतें ? कारण हल्लीं सोन्यापेक्षां रुप्याचें मोल तेवीसपट कमी आहे. कोणत्याही देशांत पैशाच्या किती रकमेची गरज असते, हें अंशतः पैशाच्या मूळखर्चावर व अंशतः देवघेवीच्या

जलदीवर अवलंबून आहे. सोनें व रुपें यांचा मुख्य उपयोग पैसा बनविण्याकडे होतो; परंतु नानाप्रकारच्या कलाकौशल्यांत व अलंकार करण्याकडेही त्यांचा उपयोग होतो; ह्मणून प्रत्येक देशास सोनें व रुपें यांची जी अपेक्षा असते ती त्यांच्या मोलावर, राष्ट्रांतील धन व लोकसंख्या यांच्या मानावर, जितकेवेळां मालाचा क्रय विक्रय पैसा देऊन होतो त्यावर, आणि कलाकौशल्यांत त्यांचा जसा खप असेल त्यावर अवलंबून असते.

पैशाची अपेक्षा राष्ट्रांतील धनावर अवलंबून असते असें ह्मटलें, ह्मणून असें समजूं नये कीं, देशांत जितका पैसा खेळत असेल तेवढ्यावरून राष्ट्रीय धनाचा बरोबर अंदाज करतां येईल. एका व्यक्तीच्या धनाचा आकार त्याच्या हातांतून जाणाऱ्या पैशावरून करीत नाहींत. मोठमोठ्या रकमा द्यावयाच्यावेळीं पैशाऐवजीं तो चेक, नोटा वगैरेचा उपयोग करतो; परंतु लहान रकमा देतेवेळीं त्यास पैशाचा उपयोग करावा लागतो. चाकर व मजूर यांचें वेतन देतांना, किंवा गाडीभाडें किंवा खाणावळीचें बील वगैरे किरकोळ देणें त्यास पैशानें द्यावें लागतें. ह्मणून असें दिसून येतें कीं, कोणा मनुष्याच्या धनाचा अंदाज जरी तो उपयोग करतो तेवढ्या पैशावरून कदापि होणार नाहीं, तरी त्याची पैशाविषयीं जी अपेक्षा असेल तींत व त्याच्या धनांत बहुधा कांहीं प्रमाण सांपडेल. कारण त्याचें धन वृद्धिंगत होत असल्यास तो अधिक चाकर नोकर ठेवील, दूरदूरचे व मोठमोठ्या खर्चाचे प्रवास करील, व त्याचा रोजखर्चही बहुतकरून वाढेल.

व्यक्तीस जें लागू आहे तें राष्ट्रासही आहे. पैशाच्या अपेक्षेवरून राष्ट्रीय धनाचा बरोबर अंदाज करतां येणार नाहीं; तथापि त्या अपेक्षेचें व देशाची संपत्ति आणि लोकसंख्या यांचें कांहीं

प्रमाण असतें. जसें ज्या देशांत दोन कोटी लोक आहेत त्यांत एक कोटी लोक आहेत त्या देशापेक्षां मजुरीचे पैसे घेणारे लोक अधिक निघतील. असें आहे तरी गेल्या वीस वर्षांत, इंग्लंडांत जी लोकवृद्धि व धनवृद्धि झाली त्या मानानें त्या देशांत पैशाची अपेक्षा वाढली नाहीं. याचें कारण निःसंशय हेंच कीं, चोहोंकडे पेढ्या स्थापन होऊन त्यांचें महत्व वाढलें आहे. इंग्लंडांत प्रत्यहीं नुसत्या दर्शनी चिठ्यांवर मनस्वी क्रयविक्रय होतो, व त्यांत एका नाण्याचेंसुद्धां कारण लागत नाहीं. इंग्लंडाच्या व्यापाराच्या मानानें इतर कोणत्याही देशापेक्षां तेथें नाण्यांचा उपयोग कमी करण्यांत येतो असें ह्मणतात. सोन्यारुप्याचें काम चेकांच्या योगानें कसें होतें, हें पुढें पत व तिचा किंमतीवर परिणाम या भागांत दिलें आहे. चेकांचा उपयोग करतेवेळीं ते नाण्याऐवजीं कसे चालतात, हें सर्वांस माहित आहे ह्मणून त्याचें अधिक स्पष्टीकरण करावयास नको. पूर्वी मोठमोठ्या रकमा देतेवेळीं पैसा मोजावा लागत असे. शेतकरीलोक धान्य किंवा गुरेंढोरें यांचा क्रयविक्रय बाजारांत करावयास येत तेव्हां ते पैसा देत व घेत असत. यामुळें बाजारच्या दिवशीं मोठ्या गांवीं हजारों पौंड हातोहातीं जात. परंतु हल्लीं मोठमोठ्या देवघेवींत पैशाचा उपयोग अगदींच बंद झाला आहे. शेतकरीलोक आपलीं चेक बुकें बाजारांत आणतात; पैशाचें कारण कायतें वाटखर्चास लागेल तेवढेंच. ह्मणून पैशाची अपेक्षा व देशांतील संपत्ति आणि लोकसंख्या यांत जरी कांहीं प्रमाण असतें तरी तें प्रमाण पत वाढेल तसें फिरणारें आहे.

जिनसांचा क्रयविक्रय पैसा देऊन जितके वेळां होतो, त्या वेळावर मौल्यवान धातूंची अपेक्षा पुष्कळांशीं अवलंबून असते. उदाहरणार्थ, पागोटें मागावरून निघाल्यावर पैसा घेऊन धाऊक

व्यापाऱ्यास विकलें जातें, तो व्यापारी दुकानदारास तें पैसा घेऊन देतो, व तो दुकानदार पगडी करणाऱ्यास तें पैसा घेऊन देतो. याप्रमाणें पगडी घालणाऱ्याच्या डोक्यास ती लागेपर्यंत पागोट्याची देवघेव चार पांचवेळां पैसा देऊन झाली. हल्लीं ठोक व्यापारी माल तयार करणाऱ्यास बहुतकरून चेक किंवा हुंडी देत असतील, किरकोळ व्यापारीही ठोक व्यापाऱ्याशीं तसाच व्यवहार करील; ह्या रीतीनें फिरत असलेला पैका ज्यास्त उपयोगास लागतो. मालाचा उपयोग होण्यापूर्वीं त्याचा जितके वेळां क्रयविक्रय होतो त्या मानानें अंशतः प्रत्येक देशांत सोनें व रुपें यांची अपेक्षा असते असें या उदाहरणावरून उघड होतें.

कलाकौशल्यांत व भूषणें करण्यांत सोनें व रुपें यांचा खप होतो त्यामुळें त्यांची अपेक्षा कशी कमज्यास्त होते हें येथें सांगण्याची अवश्यकता नाहीं. मागें सांगितलें आहे कीं, इतर खनिज उत्पन्नास जे नियम लागू आहेत तेच सोनें व रुपें यांस लागू आहेत. ह्मणून ज्या गोष्टीमुळें मौल्यवान धातूंचा उपयोग कलाकौशल्यांत अधिक होतो त्या गोष्टीमुळेंच सोनें व रुपें यांची अपेक्षा वाढून किंमतही वाढेल.

**अपेक्षा व पुरवठा यांच्या वृद्धीचा परिणाम पैशाच्या मोलावर कसा होतो हें दाखविणारीं उदाहरणें.** सोनें आणि रुपें यांच्या मोलावर अपेक्षेचा काय परिणाम घडतो, याची पूर्णपणें समजूत पडण्याकरितां अशी कल्पना करूं कीं, पैशाऐवजीं ज्यांचा उपयोग होतो अशा नोटा व हुंड्या मुळींच नाहींत. आणखी अशीही कल्पना करूं कीं, सोनें व रुपें यांचा अधिक पुरवठा नवीन खाणी सांपडून किंवा परदेशांतून त्या धातु आणवून व्हावयाचा तोही बंद झाला. ह्या दोन कल्पना केल्यावर आपल्या प्रश्नाचा उलगडा करण्यास सोपें पडेल.

आतां आपण असा एक देश घेऊं कीं, जेथील लोक आपली सर्व देवघेव सोनें व रुपें यांशींच करितात, व हे धातु वाढविण्याचें साधन तेथें मुळींच नाहीं. कल्पना करा कीं, अशा देशांत धनाची वृद्धि फार होते, शिल्पनिर्मित माल दुप्पट निघू लागतो, आणि लोकसंख्याही वाढते. असें झालें ह्मणजे तितक्याच पैशानें दुप्पट क्रयविक्रय करावा लागतो; ह्मणून सर्व साधारण किंमती निम्या उतरल्या पाहिजेत, ह्मणजे असेंच ह्मणावयाचें कीं, सोनें व रुपें यांचें मोल दुप्पट वाढतें. दुसरें एक उदाहरण घेऊं. आतां उलटी कल्पना अशी करावयाची कीं, देशांतील व्यापार लोकसंख्या व कारखाने हे स्थिर असून सर्व देवघेव पैशानें होते. ह्या देशांत खेळत असलेला पैसा एक कोटी पौंड आहे. नवीन खाणी सांपडल्यामुळें किंवा परदेशांतून आणविल्यामुळें देशांत खेळणारा पैसा दोन लक्ष पौंड अधिक झाला. पूर्वी जितका क्रयविक्रय होत होता तितकाच हल्लीं होतो. वेतन घेणारे लोक पहिल्याइतकेच आहेत; परंतु देशांत खेळणारा पैसा एक पंचमांशानें वाढला. अशा प्रसंगीं वेतन व किंमती त्या मानानें वाढल्याच पाहिजेत, कारण सोन्याचें मोल ह्मणजे त्याचें अदलाबदलीचें सामर्थ्य शेंकडा २० प्रमाणें कमी झालें. या उदाहरणावरून असें उघड होतें कीं, इतर गोष्टी आड न आल्यास देशांत खेळत असलेलें सोनें व रुपें हे धातु वाढल्यानें त्यांचें मोल ह्मणजे अदलाबदलीचें सामर्थ्य कमी होतें. पहिल्या उदाहरणावरून असें सिद्ध झालें कीं, धन वाढून देशांत चालत असलेला पैसा जर वाढला नाहीं, तर रुप्याचें किंवा सोन्याचें मोल ह्मणजे त्याचें अदलाबदलीचें सामर्थ्य वाढलेंच पाहिजे. किंमती वाढल्यावरून देश धनाढ्य होतो असें नाहीं.

धनाची वृद्धि व देशाची वृद्धि यांचें पूर्ण परिमाण सोनें व रुपें यांच्या मोलावर कधींच होत नाहीं, हें येथें सांगण्याची अवश्यकता नाहीं. वर दिलेल्या उदाहरणांत विरुद्धपरिणामकारक गोष्टींचा अभाव मानणें अवश्य होतें, परंतु त्या गोष्टी नसतात असें केव्हांच होत नाहीं. पहिल्या उदाहरणांत अशी कल्पना केली होती कीं, देशांत खेळणारें सोनें व रुपें यांची वृद्धि न होतां शिल्पनिर्मित जिन्नस व लोकवृद्धि हीं वाढलीं, ह्मणून असें ह्मटलें कीं, पैशाचें मोल फार वाढलें पाहिजे; परंतु पैशाची किंमत वाढली ह्मणजे पुरवठाही वाढूं लागतो; आणि व्यापाराची वृद्धि होईल तसतशा पैशाऐवजीं दुसऱ्या कांहीं योजना सर्वदा करण्यांत येतात. ह्या गोष्टींचीं कार्यें विपरीत असतात, ह्मणून पैशाच्या मोलांत एकदम फेरफार न होण्यास बहुधा त्या पुरे होतात.

**कालिफोर्निया व आस्ट्रेलिया या देशांत सांपडलेल्या सोन्याच्या खाणींचा परिणाम.** दुसऱ्या उदाहरणांत अशी कल्पना केली होती कीं, लोकसंख्या किंवा धन हीं न वाढतां देशांतील पैशाची वृद्धि झाली. सन १८५० च्या सुमारास आस्ट्रेलिया व क्यालिफोर्निया देशांत सोन्याच्या खाणी सांपडल्यामुळें देशांत चालत असलेल्या पैशांत पुष्कळ भर पडली. १८५० सालापूर्वी सर्व प्रकारचें सोन्याचें उत्पन्न दरसालचें सुमारें एक कोटी पौंड होतें; परंतु १८५२ व ५७ च्या दरम्यानच्या पांच वर्षांत, आस्ट्रेलिया व क्यालिफोर्निया या प्रत्येक देशांत सोन्याचें उत्पन्न एक कोटी झालें; या कारणामुळें या वर्षांतील दरसालचा सोन्याचा पुरवठा तिप्पट झाला. याविषयींची चांगली माहिती असलेल्या लोकांनीं प्रथम असें भविष्य केलें कीं, हा सोन्याचा वार्षिक पुरवठा मनस्वी वाढल्यामुळें, सोन्याची किंमत उतरून एकंदर किंमती वाढतील. परंतु हें

त्यांचें भाकित खरें झालें नाहीं; कांहींवेळ उलटा असा संशय येऊं लागला कीं, एकंदर किंमतीवर, सोनें अधिक सांपडल्याचा परिणाम कांहीं तरी झाला कीं काय? फार लक्ष लावून शोध केल्यानंतर असें ठरविण्यांत आलें कीं, सन १८७० सालांत सोन्याचें मोल १८५० पासून शेंकडा १५ प्रमाणें उतरलें. ही जी थोडीशी किंमत उतरली, ती सोन्याचा पुरवठा वाढला त्या मानानें पाहतां कांहींच नव्हे. यास्तव सोन्याचा वार्षिक पुरवठा फार वाढून शेवटीं त्याचें मोल फारच थोडें उतरलें, याचें कारण काय असावें हा शोध काढणें मनोरंजक होईल. एक कारण असें दिसतें कीं, सोनें अविनाशी आहे; त्याचा वार्षिक पुरवठा जरी शेंकडा ३० या मानानें वाढला तरी जगांतील सोन्याच्या संचयांत विशेष भर पडली असें नाहीं. सन १८५० सापूर्वी सोनें उपयोगांत किती होतें हें नक्की सांगतां येत नाहीं, परंतु माहितगार लोकांच्या अदमासावरून तें ५६०००००० पौंड असावें असें ठरलें आहे. नवीन शोधामुळें कोणत्याही वर्षी शेंकडा ५½ याहूनही रकम चढली नाहीं; आणि खाणी सांपडल्यानंतर जगांतील सोन्याचा संचय दुप्पट होण्यास सुमारें वीस वर्षें लागलीं.

बरें, सोन्याचें उत्पन्न वाढलें तें सुद्धां बरींच वर्षें टिकलें नाहीं. पुष्कळ सोनें सांपडत होतें त्या जागा लवकर रिकाम्या झाल्या, आणि सोन्याचें उत्पन्न जें सन १८५६ सालीं ३२०००००० पौंडपर्यंत चढलें होतें, तें १८६० त १८०००००० पौंड झालें, आणि १८८१ त २१५००००० पौंडांवर आलें. परंतु सोन्याचें उत्पन्न पुष्कळ वाढून त्या मानानें त्याचें मोल उतरलें नाहीं, याचें विशेष महत्त्वाचें कारण असें दिसतें कीं, याच सुमारास अशा कित्येक गोष्टी घडल्या

कीं, त्यांच्या योगानें व्यापार व उद्योग यांस एकदम उत्तेजन मिळालें, व वाढलेल्या सोन्याचा त्यांत खप होऊन गेल्यामुळें किंमती वाढल्या नाहींत. त्या गोष्टी येणेंप्रमाणें:—

१ ली. त्यावेळीं इंग्लंड देशांतच नव्हे, परंतु जगाच्या सुधारलेल्या सर्व भागांमध्यें शिल्पांत व माल वाहून नेण्याच्या कामांत, वाफेच्या उपयोगाचा पूर्ण अम्मल बसला.

२ री. इंग्लंडांत खुल्या व्यापाराचा स्वीकार झाल्यापासून व्यापार फार त्वरेनें वाढूं लागला. सन १८४८ आणि १८६० यांच्या दरम्यान इंग्लंडांतील निर्यात माल ६०००००० पासून १३५०००००० पौंडपर्यंत वाढला, आणि १८८३ त तो २५०००००० पौंड झाला. आयात माल तर फारच विलक्षण रीतीनें वाढला आहे. वरच्या आंकड्यांवरून जो क्रयविक्रय अधिक झालेला दिसतो, त्यांत नवीन सांपडलेलें सोनें गेलें असें ह्मटलें पाहिजे.

३ री. हिंदुस्थानांत रेल्वे व सार्वजनिक उपयोगाचीं दुसरीं कांहीं कामें सुरू झाल्यामुळें, तिकडे लोकांस वेतन देण्याकरितां लाखों रुपयांच्या किंमतीचें रुपें तिकडे पाठवावें लागलें. हें रुपें पुष्कळांशीं फ्रान्स व दुसऱ्या कांहीं देशांत चालू असलेल्या रुप्याच्या नाण्यामधून घेतलेलें होतें. त्या रुप्याच्या जागीं बरेंच सोनें गेलें. असा अंदाज केला आहे कीं सात वर्षांत हिंदुस्थान देशांत इंग्लिश भांडवल ४३०००००० पौंड खपलें.

४ थी. अलीकडे सोन्याची किंमत वाढावयास आणखी एक कारण झालें आहे, तें असें कीं, फ्रान्स, जर्मनी व इतर देश यांणीं रुप्याचें नाणें मोडून त्या ठिकाणीं सोन्याचें केलें आहे. आणि इताली व संयुक्त संस्थानें या देशांत कित्येक वर्षें ज्या न

मोडतां येणाऱ्या नोटा चालू होत्या त्या मोडून तेथें त्यांच्या बदली पाहिजे तेव्हां नाणीं मिळूं लागलीं.

कांहीं विद्वान लोकांचें मत असें आहे कीं, ह्या सर्व गोष्टी एकत्र होऊन त्यांनीं सोन्याच्या नवीन शोधाचा परिणाम नाहींसा केला, इतकेंच नव्हे, परंतु त्यांचें ह्मणणें असें आहे कीं, सन १८७४ आणि १८८३ दरम्यानच्या सालांत सोन्याची रेलचेल न होतां कमताईच झाली; व त्यामुळें त्याचें मोल वाढून किमती उतरल्या. हें कसेंही असो, परंतु सोन्याचा पुरवठा मनस्वी वाढून त्या मानानें त्याचें मोल फारच थोडें कां उतरलें, याचें समाधान होण्यास वर सांगितलेल्या गोष्टी पुरे आहेत. आतां ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, सोन्याचा नवीन पुरवठा दृष्टोत्पत्तीस न येण्यास जीं चार कारणें वर दर्शविलीं आहेत, त्यांचा संबंध सोन्याच्या शोधाशीं मुळींच नव्हता. सोन्याच्या नवीन खाणी सांपडल्या असत्या किंवा नसत्या तरी इंग्लंडांत झालेली व्यापारवृद्धि, लोकवृद्धि, आणि खुला व्यापार, यांमुळें वाढलेलें धन, आणि त्याच्या योगानें पूर्वेकडे झालेला व्यापाराचा फैलाव, ह्या गोष्टी, अशाच घडल्या असत्या. सोन्याचा पुरवठा वाढल्यामुळें ह्या गोष्टी घडून आल्या असें मानण्यास कांहींच कारण नाहीं. व्यापार व लोकसंख्या स्थिर असतां जर हे नवीन सोन्याचे शोध लागते, तर ज्या देशांत या सोन्याच्या खाणी आहेत, ते देश खेरीजकरून इतर कोणत्याही देशाचें हित झालें नसतें; व ज्यांत खाणी आहेत त्या देशांचा सुद्धां फायदा पाहूं गेल्यास हाच झाला असता कीं, त्यांचें विकत घेण्याचें सामर्थ्य वाढलें असतें. आस्ट्रेलिया आणि क्यालिफोर्निया या देशांत सोन्याच्या खाणी असल्यामुळें त्यांचें जे हित झालें तें हेंच कीं त्यांनीं आपलें सोनें विकून परदेशचा

माल घेतला, असें प्रोफेसर केर्न्स यानें दाखविलें आहे. त्या देशांचा दुसरा फायदा असा झाला कीं, सोन्याच्या खाणी सांपडल्याचें वर्तमान जाहीर होतांच तिकडे पुष्कळ लोक जाऊन राहिले. सोन्याच्या खाणींच्या बातमीसारखी मनास उलच देणारी दुसरी गोष्ट नसेल; बातमी लागतांच एकदम हजारों लोक आस्ट्रेलियाकडे धांवले. त्यामुळें असें झालें कीं, सन १८५१ आणि १८५७ च्या दरम्यानच्या ६ वर्षांत विक्तोरिया वसाहातींतील लोकसंख्या ७७००० पासून ४१०००० पर्यंत वाढली; आणि सुपीक व पातळ वसलेल्या देशांत लोकवृद्धि अशी एकदम झाली ह्मणजे तेथील उत्पन्न चांगल्या उपयोगास लागून तो देश सधन होतो. नवीन सोन्याचा शोध लागल्यापासून जगांतील सर्व व्यापारी मंडळीस मोठा उपयोग झाला, कारण त्याच्या योगानें चलनी नाण्याचा पुरवठा व्यापारवृद्धीमुळें ज्यावेळीं फार जरुरीचा होता त्याचवेळीं तो वाढला. व्यापार स्थिर असतां जर ह्या खाणी सांपडल्या, तर व्यापारी लोकांत फार घोटाळा होऊन त्यांचें नुकसान झालें असतें; पैशाचें मोल बदलून पैशासंबंधी सर्व करारांत फेरफार झाला असता. बहुतकरून सर्वांपाशीं अधिक पैका झाला असता, पण पैशाचें विकत घेण्याचें सामर्थ्य कमी झालें असतें. हें विसरतां कामा नये कीं, जर साधारण किमती दुप्पट झाल्या तर ज्या मनुष्यास दरमहा पूर्वी एक पौंड मिळत होता, त्यास आतां दोन पौंड मिळून अधिक फायदा नाहीं, कारण पूर्वी एका पौंडास जितके जिन्नस मिळत तितक्यांसच आतां दोन पौंड पडतात. ह्या खंडांतील दुसऱ्या भागाच्या शेवटीं बास्तियात साहेबाचें जें उदाहरण दाखल केलें आहे, त्यावरून आमचे ह्मणण्याचा खरेपणा ध्यानांत येईल, पत्त्याच्या खेळांत पणास लाविलेली

रक्कम जर आहे तीच राहिली, तर तिच्या ऐवजीं कितीही चकत्यांचा उपयोग केला तरी सारखाच; चकत्यांची संख्या वाढली तर त्याच मानानें त्यांचें अदलाबदलीचें सामर्थ्य कमी होतें.

## ४ थ्या भागावर प्रश्न. पैशाचें मोल.

१. पैशाची किंमत या शब्दाचा अर्थ काय ?

२. अर्थशास्त्र दृष्ट्या हे शब्द निरर्थक कां आहेत ?

३. पैशाचें मोल ह्मणजे काय ? पैशाचें मोल कायमचें असतें असा समज केव्हां केव्हां चुकीनें कां होतो ?

४. जिनसांच्या मोलावरून त्यांचे जे वर्ग केले आहेत त्यांपैकीं कोणत्या वर्गांत पैसा घातला पाहिजे ?

५. मूल्यवान धातूंचें मोल कशावरून ठरतें ?

६. रुप्याचें मोल किंवा त्याचें विकत घेण्याचें सामर्थ्य कमी होण्यास कोणत्या गोष्टी कारण झाल्या आहेत ?

७. सोनें व रुपें यांची अपेक्षा उत्पन्न होण्यास मुख्य कोण कोणत्या गोष्टी लागतात ?

८. राष्ट्रांतील धन व लोकसंख्या यांच्या मानानें पैशाची अपेक्षा कमज्यास्त कशी होते तें स्पष्ट करून दाखवा.

९. मोठमोठ्या देवघेवी, पैशाचा उपयोग केल्याशिवाय कशा चालतात ह्याचें एक उदाहरण द्या.

१०. माल उपयोगांत येण्यापूर्वी त्याचा क्रयविक्रय पुष्कळ वेळां होत असल्यास पैशाची अपेक्षा वाढते हें कसें तें उदाहरण घेऊन दाखवा.

११. अपेक्षा वाढल्याचा परिणाम पैशाचे मोलावर कसा होतो तें उदाहरणानें स्पष्ट करून दाखवा.

१२. पुरवठा वाढल्यानें पैशाचे मोलावर काय परिणाम होतो तो उदाहरण घेऊन दाखवा.

१३. या उदाहरणांत दाखविलेले परिणाम खरोखर कां घडत नाहींत ?

१४. सोनें व रुपें यांची अपेक्षा वाढल्यास तिचा प्रतिकार बहुधा कोणत्या गोष्टींनीं होतो ?

१५. सोन्याच्या नवीन खाणी सांपडल्याचा परिणाम त्याच्या मोलावर काय झाला आहे ?

१६. सोन्याचें मोल कमी व्हावें तितकें कां झालें नाहीं याचीं कारणें सांगा.

१७. सोन्याच्या अपेक्षेवर या कारणांचें कार्य काय होतें तें सांगा.

१८. नवीन सोन्याचा शोध लागल्यामुळें इंग्लंदचा व्यापार व लोकसंख्या हीं वाढलीं काय ?

१९. सोन्याच्या खाणी सांपडून देशांतील धन व लोकसंख्या हीं वाढलीं नसतीं तर काय परिणाम झाला असता ?

---

१. कल्पना करा कीं, एका लक्षाधीश सावकाराच्या मनांत असें आलें कीं, अमक्या एका बेटांतील लोकांवर कांहीं उपकार करावा. त्या बेटांतील लोकांचें दुसऱ्या देशांशीं व्यापारसंबंधानें दळणवळण मुळींच नाहीं. तर बेटांतील प्रत्येक मनुष्याजवळ आहे त्याच्या दुप्पट पैका सावकारानें केल्यास त्याचा हेतु सिद्धीस जाईल काय ?

२. जर लोकसंख्या व व्यापार यांची वृद्धि इतकी झाली कीं, वेतन घेणारे लोक दुप्पट झाले, व पूर्वींपेक्षां क्रयविक्रयही दुप्पट होऊं लागला, तर पैशाचा पुरवठा वाढला नाहीं असें धरून साधारण किमती व वेतन यांच्यावर काय परिणाम होतील ?

३. आस्ट्रेलियाहून दोन जहाजें येत आहेत. एकांत सोनें भरलें आहे व दुसऱ्यांत तितक्याच मोलाची लोकर व धान्य

भरलें आहे. आतां दोहोंतून एक जहाज बुडणार असलें, तर तुह्मांस कोणतें बुडावेंसें वाटेल ?

४. विलायतेस दगडी कोळसा व लोखंड हीं न सांपडतीं आणि सोन्याच्याच खाणी असत्या तर तेथील धन वाढलें असतें काय ?

---

# खंड ३.

## धनाची वांटणी.

### विषयारंभक सूचना.

**धनाचे विभाग सारा, वेतन, आणि नफा असे होतात.** मागें धनाची उत्पत्ति या सदराखालच्या खंडांत सांगितलें कीं, उत्पादनास अवश्य लागणाऱ्या तीन गोष्टी जमीन, श्रम, आणि भांडवल ह्या होत. ह्मणून हें उघड आहे कीं, ह्या तीन गोष्टी ज्यांच्या स्वाधीन असतील त्यांमध्यें ह्मणजे जमिनीचा मालक, श्रमकरणारा, व भांडवलवाला, यांमध्यें धनाची वांटणी व्हावी. जमिनीच्या मालकाच्या वांटणीस सारा, श्रमकरणाऱ्याच्या वांटणीस वेतन, व भांडवलवाल्याच्या वांटणीस नफा असें ह्मणतात. अशा प्रकारें धनाचे तीन विभाग होतात ते:—जमिनीचा सारा, श्रमाचें वेतन आणि भांडवलाचा नफा हे होत. या तीन विभागांचें परस्परांत प्रमाण काय असतें, हें पुढील भागांत दाखविण्यांत येईल, व एक अधिक झाला ह्मणजे दुसरा कमी कसा होतो, व साधारण किंमती उतरल्यास साऱ्याबद्दल अधिक रक्कम कां द्यावी लागते यांचीं कारणेंही दाखविण्यांत येतील.

धनाच्या वांटणीचे नियम ज्यांस बरोबर समजले आहेत, त्यांस

ह्या प्रश्न व अर्थशास्त्र संबंधी दुसरे कित्येक मनोरंजक प्रश्न सहज सोडवितां येतील.

**सारा, वेतन, आणि नफा हीं निरनिराळ्या देशांत निरनिराळ्या लोकांस मिळतात.** विलायतेस शेतकीच्या उद्योगांत सारा, वेतन, आणि नफा हीं नेहमीं भिन्न भिन्न तीन वर्गांस, ह्मणजे जमिनीचे मालक, मजूर आणि भांडवलवाले यांस वांटून दिलीं जातात. हें मात्र लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, इतर देशांत वांटणीचे प्रकार भिन्न असतात. युरोप खंडांतील पुष्कळ भागांत असें आढळतें कीं, उत्पादनास अवश्य लागणाऱ्या तिन्ही गोष्टी एकाचेच स्वाधीन असतात. जमीन, श्रम, आणि भांडवल हीं एकाचींच असतात. अशा मनुष्यास शेतकरी मालक ह्मणतात; त्या तिन्ही गोष्टींपासून मिळणारें धन ह्मणजे सारा, वेतन व नफा तोच घेतो. ऐर्लंद देशांत व हिंदुस्थानांत पुष्कळ ठिकाणीं श्रम आणि भांडवल हीं एकाचींच असतात. ह्यास शेतकरी कूळ ह्मणावें. या ठिकाणीं वेतन व नफा यांवर कुळाचा हक्क असतो, व सारा मात्र परक्यास जातो. वरील उदाहरणांवरून दिसून येईल कीं, भिन्न देशांत जमीन, श्रम, व भांडवल यांची मालकी भिन्न लोकसमुदायाकडे असते; सारांश जमीन वहिवाटण्याची पद्धत भिन्न असते.

## तिसऱ्या खंडांतील विषयारंभक सूचनेवर प्रश्न.

१. धनाचे विभाग किती केले आहेत? व हे विभाग उत्पादनास अवश्य असणाऱ्या कोणत्या गोष्टींशीं जुळतात?

२. हे विभाग घेणारे लोक नेहमीं निराळे असतात काय?

३. ह्या विभागांची वांटणी करण्याचे जे प्रकार भिन्न देशांत आहेत त्यांपैकीं कांहीं सांगा.

---

कास जाते त्यास सारा ह्मणतात; जमिनीच्या उपयोगाचीही किंमत त्यास मिळते. कांहीं देशांत जमिनीचा सारा जनरूढीवरून ठरतो, व कांहीं देशांत तो चढाओढीनें ठरतो. इंग्लंडांत सारा चढाओढीनेंच ठरवितात. चढाओढीनें सारा ठरविणें ह्मणजे असें कीं, कांहीं अटी संभाळून जमिनदार जो मनुष्य सारा ज्यास्त देईल त्याकडे आपली जमीन ठेवतो. या रीतीनें सारे ठरले ह्मणजे, इतर जिनसांच्या संबंधानें क्रयविक्रय होतांना देणारा व घेणारामध्यें जसा व्यवहार होतो तसाच जमीनदार व त्याचें कूळ यांच्यामध्येंही होतो.

ज्या जमिनीचा सारा चढाओढीनें ठरतो, तो कोणत्या तत्त्वावरून ठरतो, हें प्रथम सांगून नंतर जनरूढीवरून ज्या जमिनीचा सारा ठरतो त्याविषयीं कांहीं माहिती देण्यांत येईल. जमीन कोणींच उत्पन्न केली नसून कांहीं लोक जमिनीचे मालक कसे होऊन बसले या गोष्टीचा शोध करण्याचें येथें कारण नाहीं. कांहीं व्यक्तींच्या ताब्यांत जमीन आहे इतकें कबूल केलें ह्मणजे पुरे; व ह्या खंडांत जीं अनुमानें काढलीं आहेत तीं अनुमानें ही गोष्ट गृहीत धरूनच काढलीं आहेत. सारा हा जमिनीच्या स्वामित्वाचा परिणाम होय. जमीन अगदीं परिमित असते, व तिची अपेक्षा सर्वसाधारण असल्यामुळें तिच्या उपयोगाबद्दल जमिनीच्या मालकास नेहमीं सारा मिळतो. जमिनीच्या मालकांस तिच्या उपयोगाबद्दल सारा मागतां येतो याचें कारण हेंच कीं, जमीन ही वस्तु पुष्कळ लोकांस हवी असते, व जमिनीच्या मालकाखेरीज दुसऱ्या कोणापासून ती मिळत नाहीं. (अर्थशास्त्राचीं मूलतत्त्वें, मिल्ल.)

**साऱ्याच्या स्वरूपाचें अधिक विवेचन.** शेतीच्या जमिनीचा सारा दोन गोष्टींवरून ह्मणजे जमिनीचा सुपीकपणा, व ती सोयीच्या ठिकाणीं असणें यांवरून ठरतो. या दोन गोष्टींचा अभाव असल्यास जमिनीस सारा मुळींच यावयाचा नाहीं. जमीन जर इतकी निकस असेल कीं, तिची लागवड करण्यास लागलेलें भांडवल व श्रम यांचा खर्च तिच्या उत्पन्नांतून भागणार नाहीं, तर तिजकरितां कोणी सारा भरणार नाहीं. आतां केव्हां केव्हां असें होतें कीं, उत्तम सुपीक जमीन असून तिला सारा येत नाहीं, कारण ती गैरसोयीच्या ठिकाणीं असते. अमेरिकेंत व आस्ट्रेलियामध्यें मोठमोठे प्रदेश अशा स्थितींत आहेत. मोठ्या लोकवस्तीपासून ते फार दूर आहेत. जमिनींत उत्पन्न विपुल येण्यासारखें असून त्याचा खप होणार नाहीं ह्मणून त्या तशाच पडल्या आहेत, कारण तेथें रस्ते, रेलवे, किंवा जलमार्ग अशी कांहींच सोय नाहीं. ह्मणून या जमिनींस सारा मिळत नाहीं. कांहीं जमीन स्वभावतः फार सुपीक असून व उत्पन्नाचा खप होण्यासारख्या ठिकाणीं असून देखील तिला सारा मिळत नाहीं, कारण पिकास ससे व दुसरीं जनावरें यांचा उपद्रव फार असतो. इंग्लंडांत पुष्कळ जमिनींचा सारा याच कारणानें उतरला आहे. हा तोटा जमिनीच्या मालकासच सोसावा लागतो असें नाहीं; तो सर्व राष्ट्रास भोगावा लागतो. जमीन नापीक असती तर राष्ट्राचें जें नुकसान झालें असतें तेंच ससे व इतर प्राणी यांच्या उपद्रवामुळें होतें. जमिनीचा मक्तेदार सारा कमी करून आपलें नुकसान उगवून घेईल, परंतु शेतीचें उत्पन्न ज्यांच्या निर्वाहास लागतें त्यांना, उत्पन्न कमी झाल्यामुळें जिनसास ज्यास्त किंमत द्यावी लागते.

सर्व देशांतील जमिनी कमज्यास्त सुपीक असतात, व त्या कमज्यास्त सोयीच्या ठिकाणीं असतात, आणि जेथें सारा चढाओढीनें ठरवितात तेथें तो जमिनीच्या कमज्यास्त उत्पादकपणावरून[1] ठरतो.

उदाहरणार्थ दोन शेतें घेऊं. एकाचा उत्पादकपणा अधिक असल्यामुळें भांडवल व श्रम यांचें फल दुसऱ्या शेतापेक्षां ज्यास्त येतें. आतां अधिक उत्पन्नाच्या शेतास कमी उत्पन्नाच्या शेतापेक्षां सारा किती अधिक येईल? पहिलें शेत करण्यांत दुसऱ्यापेक्षां जो फायदा असेल त्याच्या किंमतीइतका येईल. परंतु अद्यापि असा प्रश्न निघेल कीं कमी उत्पन्नाच्या शेतास जो सारा पडतो त्याची रक्कम कशावरून ठरते? या प्रश्नाचा उलगडा होण्यास रिकार्डोसाहेबाच्या साऱ्याविषयींच्या तत्त्वाची माहिती देणें अवश्य आहे.

**रिकार्डोचें साऱ्यासंबंधी तत्त्व.** लागवडींत जी अतिनिकृष्ट जमीन असेल, व जिचा सारा केवळ तिच्याहून वर सांगितलेल्या कमी उत्पन्नाच्या जमिनींत जो अधिक फायदा होतो त्यावरून ह्या जमिनीचा सारा ठरतो. रिकार्डोसाहेबाच्या साऱ्यासंबंधी तत्त्वाचें हें थोडक्यांत लक्षण सांगितलें. आतां तें सिद्ध करण्यास लागूं. प्रत्येक देशांत कांहीं जमीन इतकी नापीक किंवा अशा गैरसोयीच्या ठिकाणीं असते, कीं, त्यांत होणाऱ्या उत्पन्नांतून भांडवल व मजुरी यांचा खर्च कसाबसा भागतो. असल्या जमिनीस सारा मिळणार नाहीं हें उघड आहे, कारण तिला सारा द्यावा लागल्यास लागवड करणारास साधारण नफा मिळणार नाहीं. सारा घेतल्यास जमिनीची लागवडच

---

१ उत्पादकपणा या शब्दानें येथें व दुसरीकडे सुपीकपणा व सोयीचे ठिकाणीं असणें असे दोन्ही अर्थ घ्यावे.

होणार नाहीं, कारण साधारण नफा मिळत नाहीं अशा धंद्यांत लोक आपलें भांडवल घालणार नाहींत.

**लागवडीची मर्यादा.** लागवडींत असून सारा येत नाहीं अशा कनिष्ठ प्रतीच्या जमिनीच्या उत्पन्नाहून कोणत्याही विशिष्ट जमिनींत जें अधिक उत्पन्न होतें त्यावरून त्या विशिष्ट जमिनीचा सारा ठरतो. ही कनिष्ठ प्रतीची जमीन लागवडीच्या मर्यादेवर असते असें रिकार्डो ह्मणतो; कारण सारा नसला तरी फारच कनिष्ठ प्रतीच्या जमिनींत शेतीच्या उत्पन्नाच्या किंमती कायम राहिल्यास फायदा होत नाहीं. आतां रिकार्डोच्या तत्त्वाच्या दुसऱ्या भागाचें विवेचन करूं.

**लागवडीच्या मर्यादेचा उत्पादकपणा जसा असेल त्या मानावरून शेतीच्या उत्पन्नाची किंमत ठरते.** हें उघड आहे कीं, भिन्नकाळीं व भिन्नदेशीं लागवडीच्या मर्यादेवर असणाऱ्या जमिनीचा उत्पादकपणा कमज्यास्त असतो. शेतीच्या उत्पन्नाची किंमत, जें शेत फार खर्चानें पिकविलें असतें, त्यावरून होते, ह्मणून पर्यायानें असें ह्मणावयाचें कीं ती किंमत लागवडीच्या मर्यादेच्या उत्पादकपणावरून ठरते. आतां दोन प्रश्नांचा निकाल होणें आहे. ते हे कीं, जमीन लागवड केलेली असून जिला सारा पडत नाहीं, तिच्या उत्पादकपणाची जागा कशावरून ठरते, आणि आस्ट्रेलिया बेटांत जी जमीन लागवडीच्या सीमेवर आहे तीच विलायतेस असती तर तिला पुष्कळ सारा कसा येता ? या दोन प्रश्नांचा उलगडा होण्यास शेतीच्या उत्पन्नाच्या किंमतीविषयीं विचार केला ह्मणजे झालें. सर्व देशांत लागवडीच्या मर्यादेची जागा लोकांच्या गरजा व त्या भागविण्यास त्यांच्या जवळचीं साधनें यावरून ठरते. कल्पना करा कीं, धान्य उत्पन्न करतां येईल असा प्रदेश अगदीं

मर्यादित असला, तर लोकसंख्या वाढली ह्मणजे त्यांतील कमपीक जमिनीची लागवड केलीच पाहिजे. अशा ठिकाणीं लागवडीची मर्यादा उतरते, यामुळें शेतीच्या उत्पन्नाची किंमत वाढते, व तसाच साराही वाढतो. आतां दुसऱ्यापक्षीं परदेशीं दळणवळण ठेवण्याचीं साधनें सुलभ होऊन अन्न मिळविण्याच्या प्रदेशाचा विस्तार अपरिमित वाढल्यास लागवडीची मर्यादा न उतरतां लोकवृद्धीमुळें वाढलेली अन्नाची अपेक्षा कांहीं कालपर्यंत भागवितां येईल. इंग्लंदांत सन १८७४–८४ या दहा वर्षांत असें घडलें आहे. लोकवृद्धीमुळें अन्नाची वाढलेली अपेक्षा परदेशांतून धान्य आणवून पुरविली आहे. यास्तव किमती उतरल्या व त्यामुळें लागवडीची मर्यादा वाढली. हें पूर्वीं लागवडींत असलेल्या कांहीं जमिनी पडल्यावरून व चोहोंकडे शेतांचे सारे कमी झाले यावरून दिसून येतें.

जेथें शेतीचें उत्पन्न स्वस्त असतें, तेथें लागवडीची मर्यादा चढत असते, जसें आस्ट्रेलिया बेटांत उत्कृष्ट जमिनीचीच लागवड करण्यांत फायदा असतो. शेतीचें उत्पन्न महाग होईल तशी लागवडीची मर्यादा उतरते; कारण मग कमी उत्पादक जमिनीचीं लागवड करण्यापासून फायदा होतो. आमच्या ह्मणण्याचा खरेपणा उदाहरणानें चांगला व्यक्त होईल. कल्पना करा कीं, शेतीच्या उत्पन्नाची किंमत एकाएकीं एक तृतीयांश चढली. जमिनीच्या मक्तेदारांचें उत्पन्न त्या मानानेंच वाढेल; त्यांचा नफा नेहमींच्या दराहून फार वाढेल; परंतु इतर व्यापारी चढाओढ करून मक्तेदारांस अतिशय फायदा राहूं देणार नाहींत, ह्मणून शेतांचे सारे वाढतील. पूर्वीं जी जमीन लागवडीच्या सीमेवर होती (ह्मणजे जी लागवडींत असून जिला सारा येत नव्हता) तिला आतां सारा मिळूं लागेल, ह्मणून लागवडीची मर्यादा उतरेल.

शेतीच्या उत्पन्नाची किंमत थोडी फिरली, तरी देखील लागवडीची मर्यादा साल दरसाल कशी फिरते, यांचें एक फारच चमत्कारिक उदाहरण सालिसबरीप्लेन नांवाच्या एका ठिकाणीं दिसून येतें. तेथील कांहीं जमीन इतकी निकस आहे कीं, शेतीच्या उत्पन्नाची धारण महाग असल्या खेरीज तिची लागवड करण्यांत शेतकऱ्यास फायदा होत नाहीं. ह्मणून जेव्हां किंमती वाढतात तेव्हां त्यापैकीं कांहीं नापीक जमीन लागवडींत येते, व तींत जें थोडें पीक होतें त्यांतून शेतकऱ्याचें भांडवल व श्रम यांची भरपाई होते. परंतु किंमती उतरल्या ह्मणजे ही ज़मीन लागवडींतून जाते, कारण तिच्या उत्पन्नांतून भांडवल व श्रम यांचा खर्च उगवत नाहीं. मागें एका भागांत सांगितलें कीं, सन १८७२ च्या सुमारास दगडी कोळशाची किंमत फार चढली, व अशी किंमत चढल्यामुळें कमी उत्पन्नाच्या खाणी खोदण्यापासून फायदा झाला, परंतु किंमती उतरल्या बरोबर त्या खाणींतील काम बंद पडलें. लागवडीची मर्यादा ( खाणीस हे शब्द लागू पडल्यास ) किंमती वाढल्या तेव्हां कमी झाली, व कोळशाची चणचण जेव्हां कमी झाली तेव्हां ती पूर्व स्थितीवर आली.

**लोकवृद्धि शेतीच्या उत्पन्नाची किंमत वाढविते.** हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, लागवडीची मर्यादा उतरण्यास शेतीच्या उत्पन्नाचीच किंमत वाढली पाहिजे, कारण लागवडीच्या मर्यादेखालची जमीन लागवडीस येऊन तिजपासून फायदा होण्यास धारण वाढणें अवश्य आहे. मागें असें सांगितलें कीं, शेतीच्या उत्पन्नाची अपेक्षा वाढल्यानें किंमती वाढतात, व अपेक्षेची वृद्धि लोकवृद्धीमुळें होते. लोकसंख्या वाढली ह्मणजे शेतीच्या उत्पन्नाची अपेक्षा वाढलीच पाहिजे. ही वाढलेली

अपेक्षा धारण महाग करते, आणि यामुळें पूर्वीं जी जमीन लागवडीच्या सीमेवर होती, तिच्याहून निकस जमीन लागवडींत आणण्यांत फायदा होतो. येणेप्रमाणें लोकवृद्धि शेतीच्या उत्पन्नाची अपेक्षा वाढवून त्याची किंमत वाढविते, आणि लागवडीची मर्यादा खालीं आणते.

लोकवृद्धि जमिनीचा सारा दोन प्रकारांनीं वाढविते. पहिला प्रकार असा कीं, शेतीच्या उत्पन्नाची चणचण होऊन त्याचें मोल वाढतें; व दुसरा असा कीं, लागवडीची मर्यादा उतरल्यामुळें साऱ्याच्या रूपानें जमीनदारास उत्पन्नाचा जो वांटा जावयाचा तो वाढतो. कारण साऱ्याची व्याख्या अशी झाली आहे कीं, विशिष्ट जमिनीच्या व लागवडींत असून जीस सारा येत नाहीं अशा कनिष्ठ प्रतीच्या जमिनीच्या उत्पादकपणांतील अंतराचें मोल तो सारा होय. ह्मणून लागवडीची मर्यादा उतरली ह्मणजे हें अंतर वाढतें, आणि जमिनीचा सारा अधिक होतो. असें कल्पूं कीं एका शेताच्या उत्पादकपणाचें मोल १०० या संख्येनें दर्शविलें. आणि लागवडीच्या मर्यादेवर असेल अशा जमिनीच्या उत्पादकपणाचें मोल ३० या संख्येनें दर्शविलें. तर मग पहिल्या शेताचा सारा ७० या संख्येनें दर्शविला जाईल. परंतु लागवडीची मर्यादा उतरून कनिष्ठप्रतीच्या व न सारा देणाऱ्या जमिनीच्या उत्पादकपणाचें मोल २० धरलें तर पहिल्या शेताचा सारा ८० होतो.

**रिकार्डोच्या तत्त्वाचा सारांश.** अमुक जमिनीचा सारा, ह्मणजे त्या जमिनीचा उत्पादकपणा व निकृष्ट जमीन लागवडींत असून जिला सारा येत नाहीं, ह्मणजे जी लागवडीच्या सीमेवर असते तिचा उत्पादकपणा, यांतील फरक होय. ह्मणून ज्या गोष्टीमुळें लागवडीची मर्यादा उतरते त्यामुळेंच सारा

वाढतो कारण तेणें करून विशिष्ट जमिनीचा उत्पादकपणा व सारा न देणारी लागवडींत असलेली अशा निकृष्ट जमिनीचा उत्पादकपणा यांतील फरक वाढतो.

**जमिनीचे मालक व शेतीच्या उत्पन्नाचा उपयोग करणारे लोक यांमध्यें एका प्रकारचा विरोध असतो.** रिकार्डोच्या साऱ्यासंबंधी तत्त्वापासून असें अनुमान काढतां येईल कीं, जमीनदार लोक व इतर लोक यांच्यामध्यें एक प्रकारचें वैमनस्य असतें. लोकवृद्धीमुळें सारा वाढतो, परंतु लोकवृद्धि मनस्वी झाल्यास देशाचें फार अकल्याण होतें. गरीब लोकांच्या निर्वाहाकरितां ज्या पट्ट्या बसविल्या आहेत त्या बहुतेक जमिनीवरच आहेत, असें नसतें तर हा हितविरोध हल्लींपेक्षां फार वाढता. भिकाऱ्यांच्या पोषणाचा खर्च जमीनदारांवर लादला नसता, तर जमिनीच्या मालकांची तुंबडी भरण्याकरितां लोकांनीं अविचारानें लग्नें करून पुष्कळ प्रजा उत्पन्न करावी, ही गोष्ट त्यांस फार हितावह झाली असती, कारण त्यामुळें लोकवृद्धि होऊन सारे चढले असते. असें पाहूं गेलें ह्मणजे लोकवृद्धीचे कांहीं वाईट परिणाम जमीनदारास भोगावयास लावणें हें वाजवी दिसतें. भिकाऱ्यांच्या पोषणाचा बोजा जमीनदारावरून काढल्यास गरीब लोकांच्या अविचारावर ते खचीत सधन होतील. एका वर्गाची संपत्ति वाढण्यास जी गोष्ट कारण झाली, तीच दुसऱ्या वर्गाचें दारिद्र्य वाढवून त्यास धुळीस मिळवील. ह्मणून जमीनदारांची संपत्ति अधिकाधिक जशी वाढेल तसा गरीब लोकांत जीवनार्थ कलह फारच माजेल. भिकाऱ्यांचा खर्च जमीनदारांवर लादल्यानें वर सांगितलेल्या विरोधाचा परिणाम बराच कमी होत आहे; आणि सुदैवानें अशाही कित्येक गोष्टी आहेत कीं, ज्यांत जमिनीचे मालक व इतर लोकसमुदाय यांचें हित एकच असतें.

**कांहीं प्रकारानें जमीनदार, भांडवलवाला, व मजूर यांचें हित एकच असतें.** भिकाऱ्यांची वृद्धि व साऱ्यांची वृद्धि ह्यांस जरी एकच कारण आहे, तरी जमीनदार व इतर लोक यांच्या हितांत सर्व प्रकारें विरोध असला पाहिजे असें होत नाहीं. जमीनदार, भांडवलवाला व मजूर यांचें हित कांहीं अंशीं एकच असतें. जमीन, भांडवल व श्रम यांचा उत्पादकपणा होईल तितका वाढविण्यांत सर्वांचेंच हित असतें. असें मानतां येईल कीं, जमीन, श्रम, व भांडवल यांचा फलद्रुपपणा कांहीं गोष्टीमुळें वाढेल; अशा प्रसंगीं प्रत्येकाच्या वांटणीस अधिक धन येईल, कारण उत्पन्न अधिक आल्यास जमीनदारास सारा, भांडवलवाल्यास नफा, व मजुरास वेतन असें अधिक देतां येईल. कांहीं वर्षांमागें इग्लंदच्या दाक्षिण भागांत शेतांत खपणाऱ्या लोकांची मजुरी इतकी थोडी होती, व धारण इतकी महाग होती कीं, मजुरांच्या हातून काम बरोबर होत नव्हतें. शेतांत कष्ट करणाऱ्या मजुरांस पोटभर अन्न व आंगभर वस्त्र नसे, यामुळें त्यांस ह्मातारपणा व अशक्तपणा लवकर येई; ज्यांना त्याची माहिती बरोबर होती ते ह्मणत कीं, हा जर गुलाम किंवा गाडीचा घोडा असता तर ह्याच्या धन्यानें याचें पोषण चांगल्या रीतीनें केलें असतें, परंतु स्वतःच्या मजुरीवर त्याची उपासमर होते. ह्मणून त्या लोकांचें ह्मणणें असें पडलें कीं, मजुरास रोजमुरा अधिक मिळाल्यास त्याचा श्रम अधिक फलद्रुप होऊन तो आपल्या धन्याच्या उपयोगीं अधिक पडेल. तथापि मजुरांची स्थिति जी हल्लीं बरी झालेली दिसते, ती धन्यास स्वहिताची चांगली समजूत पडल्यापासून नव्हे. त्याचीं कारणें निराळीं आहेत. त्यांपैकीं एक हें कीं, मजुरास अवश्य लागणाऱ्या पदार्थांची किंमत फार उतरली, कारण

चक्का दहीं व डुकराचें मास वगैरे पदार्थ अमेरिकेहून पुष्कळ येऊं लागले. यामुळें सर्व मजुरांच्या वर्गाच्या सुखाचें मान वाढलें. दुसरें असें कीं हळू हळू शिक्षणाचा प्रसार झाल्यामुळें शेतकऱ्या मजुरास वाटूं लागलें कीं, इतर मजुरांपेक्षां आपली स्थिति फार वाईट आहे; आठदिवसांस ९ शिलिंग घेऊन काम करण्याचें त्यास आवडेना; आगगाड्या व आगबोटी यांच्या साह्यानें, आपल्या श्रमास ज्यास्त वेतन मिळेल अशा ठिकाणीं जाण्याचें त्यास सामर्थ्य आलें; विद्यावृद्धीचा परिणाम असा झाला कीं, देशांतर करण्यास जें धैर्य व साहस पाहिजे होतें तें त्यास मिळालें. कांहीं वर्षांमागें चढाओढ ह्मणजे काय हें त्यांस माहित नव्हतें. ज्यास्त वेतनाचें काम शोधण्याकरितां घर सोडून जावें हें त्यांच्या स्वप्नींही नव्हतें. ते जीं गुरें मेंढरें राखीत त्यांची स्वतंत्र रीतीनें काम करण्याची योग्यता जितकी होती, तितकीच यांची होती. आतां ती वस्तुस्थिति राहिली नाहीं: शेतीच्या गांवांतून कारखाने असलेल्या शहरीं लोकांचा ओघ चालू आहे. सारा व मक्तेदारांचा नफा यांवर ह्या स्थित्यंतराचा काय परिणाम होईल हें तूर्त सांगतां येत नाहीं; तथापि अशी आशा धरण्यास जागा आहे कीं, हल्लींची संक्रमण स्थिति निघून गेली ह्मणजे, मजुरांची बुद्धि व शारिर सुख वाढल्यापासून शेतींत गुंतलेल्या तिन्हीं वर्गांचें हित होईल. ही आशा वाजवी आहे किंवा नाहीं हें पुढील गोष्टीवरून समजेल. इंग्लंडच्या दक्षिण भागापेक्षां स्कातलंद व नार्थबर्लंद येथील मजूर लोकांची स्थिति पुष्कळ दिवसांपासून बरी आहे; त्यांचें शिक्षण अधिक असतें, त्यांचीं घरें चांगलीं असतात, व त्यांचें वेतनही ज्यास्त असतें; असें असून सारे चढ आहेत, व शेतीची एकंदर स्थिति समाधानकारक आहे, इतकेंच नसून दोनठिकाणचीं सारख्याच

आकाराचीं व प्रकारचीं शेतें घेतलीं तर मजुरीचा दर जेथें ज्यास्त आहे तेथें मजुरदारांचा खर्च एकंदरींत कमी येतो. कांहीं दिवसांपूर्वी अबरडीन शायर व नारफाक या दोन परगण्यांतील एकाच प्रकारच्या दोन शेतांतील मजुरीचा दर ताडून पाहण्यांत आला. स्काच मजुरास दर आठवड्यास २० शिलिंग मिळत, व नार्फोकांतील मजुराश १४ शिलिंग मिळत, तरी वर्षाअंतीं मजुरीचा खर्च पहिल्या शेतास ५१० पौंड व दुसऱ्यास ८०० पौंड येई. स्काच मक्तेदाराचे मजूर अधिक बुद्धिमान व जोरदार असल्या कारणानें त्यांना अधिक वेतन देणें निभावत असे.

**लोकसंख्या राष्ट्राच्या भरभराटीचें लक्षण नव्हे.** रिकार्डोचें साऱ्याविषयीं तत्त्व ज्यांना पूर्ण समजलें आहे, त्यांना अर्थशास्त्रविषयक पुष्कळ प्रश्न सोडविणें सुलभ जाईल. हें तत्त्व व पहिल्या खंडांत सांगितलेला सिद्धांत कीं, जिनसांची अपेक्षा ही श्रमाची अपेक्षा नव्हे, यांची समजूत बरोबर पडली ह्मणजे, व्यवहारांत नेहमीं लोकांचीं जीं भलभलतीं अनुमानें आढळतात त्यांच्या चुका विद्यार्थ्यास कळून येऊन ते तशा करणार नाहींत. कित्येक लोक हे वेडे तर्क स्वतःसिद्ध गोष्टी आहेत असें प्रतिपादन करितात. उदाहरणार्थ, आपणास वर्तमानपत्रांत आणि इतर ठिकाणीं असें लिहिलेलें वारंवार आढळतें कीं, सर्व देशांच्या भरभराटीचा बरोबर अंदाज त्यांतील लोकवृद्धीवरून करितां येतो; ह्मणजे जसजशी लोकसंख्या वाढेल तसतशी राष्ट्राची भरभराट अधिक होईल. आस्ट्रेलिया सारख्या देशांत ही गोष्ट कांहीं अंशीं खरी आहे, कारण तेथें सुपीक जमीन विपुल असून मनुष्यास अवश्य लागणारे पदार्थ फार स्वस्त मिळतात. अशा देशांत लोकवृद्धीपासून राष्ट्रीय धनाची वृद्धि होते कारण

जमिनीचा स्वाभाकिक फलद्रुपपणा उपयोगांत येण्यास श्रमवृद्धि झाली पाहिजे. परंतु हिंदुस्थान देश घ्या; येथें लोकसंख्या पुष्कळ वाढली आहे; परंतु त्या मानानें धनवृद्धि मुळींच नाहीं; लोकांच्या सुखाचीं साधनें कमी झालीं आहेत, व अगणित लोक भीक मागत व अन्न अन्न करीत आहेत. लोकांजवळ कोणत्याही प्रकारचा संग्रह नाहीं, व एका पिकास धक्का बसला कीं त्यांस अन्नाची पंचाईत पडते. महागाईच्या दिवसांत अवश्य पदार्थ विकत घेण्याकरितां कांहीं चैनीच्या वस्तूंचा उपभोग बंद ठेवणें त्यांना होत नाहीं; त्यांना ऐषआरामच नाहीं; नेहमींपेक्षां अधिक सवंग दराचें धान्य मिळण्यास त्यांना मार्ग नाहीं; ते आधींच मानवी जीविताच्या तळ पायरीवर आहेत, त्याच्याहून खालीं जाणें ह्मणजे दुष्काळाची विपत्ति भोगणें होय. हें उघड आहे कीं, अशा स्थितींत असलेल्या देशांत लोकवृद्धि होणें हें भरभराटीचें चिन्ह नव्हे.

**सारा शेतीच्या उत्पन्नाची किंमत वाढवीत नाहीं.** रिकार्डोच्या तत्त्वापासून एक महत्वाचें अनुमान निघतें, तें हें कीं, साऱ्यांत शेतीच्या उत्पन्नाच्या किंमतीचा अंश नसतो; हेंच दुसऱ्या शब्दांनीं असें ह्मणतां येईल कीं, सर्व सारा माफ झाला तर शेतीचें उत्पन्न स्वस्त होणार नाहीं. आपण पाहिलें आहे कीं, शेतीच्या उत्पन्नाची किंमत लागवडीच्या मर्यादेवरून ठरते. अतिनिकृष्ट जमीन जी लागवडींत असते व जिला सारा येत नाहीं, त्यांत खर्चिलेलें भांडवल व श्रम यांची भरपाई होण्याइतकी उत्पन्नाची किंमत असलीच पाहिजे. किंमती कमी असल्यास ह्या जमिनीची लागवड बंद पडेल, व लागवडीची मर्यादा चढेल. परंतु असें होणार नाहीं, कारण सारे माफ झाल्यानें शेतीच्या उत्पन्नाची अपेक्षा कमी होणार नाहीं, व शेतीचें

उत्पन्न पूर्वीइतकेंच पाहिजे असतें; आणि मागें सांगितलें कीं शेतीच्या उत्पन्नाच्या अपेक्षेवरून लागवडीची मर्यादा ठरते.

जमिनीचा जो सारा चढाओढीनें ठरतो, व लागवडींत असलेल्या निकृष्ट जमिनीहून ह्या जमिनींत जें अधिक उत्पन्न येतें तेवढ्या उत्पन्ना इतका जो असतो त्यास रॅकरेंट ( Rackrent ) ह्मणतात.

रिकार्डोच्या तत्त्वावर असा आक्षेप घेतात कीं, सर्व मक्तेदारांस सारा द्यावा लागतो. तेव्हां सारा मुळींच नाहीं अशी जमीन लागवडींत कशी असेल ? मुळींच सारा येणार नाहीं इतक्या निकृष्ट जमिनी नसतील हें निःसंशय आहे; परंतु पुष्कळ शेतें अशीं आहेत कीं, ज्यांचे कांहीं भाग इतके निकस असतात कीं, त्यावर खर्चिलेल्या भांडवलाचा व श्रमाचाच काय तो खर्च भागेल; परंतु शेतावर जो अमुक एकरांचा ठोकळ सारा आकारलेला असतो तो हे जमिनीचे भाग वगळल्यास कमी होणार नाहीं. रिकार्डोच्या तत्त्वावर असाही आक्षेप आहे कीं, हें तत्त्व मक्तेदार व जमीनदार यांस मुळींच माहित नसतें, व ते त्यावरून जमिनीचा धारा ठरवीत नाहींत. हा आक्षेप असें ह्मणण्यासारखा आहे कीं, शारीर शास्त्रवेत्त्यांचे शोध चुकीचे असले पाहिजेत, कारण आपलें शरीर कसें बनविलें आहे याचें मुळींच ज्ञान नसतां मनुष्यें जन्म घालवितात. पचनव्यापार कसा चालतो हें न समजतां शरीरास मानेल तें अन्न लोकांना खातां येतें, आणि रिकार्डोचें तत्त्व मुळींच ठाऊक नसून त्यांस रॅकरेंट देतां व घेतां येतो.

**संप्रदायाचा साऱ्यावर परिणाम.** या भागांत येथून तेथून असें मानिलें आहे कीं, सारे सर्वांशीं चढाओढीनें ठरविले जातात. इंग्लंड व स्काटलंड या देशांत हा प्रकार चालू आहे,

परंतु पुष्कळ देशांत सारे ठरविण्यांत जनरिवाजाची मातबरी विशेष असते. उदाहरणार्थ, इताली व फ्रान्स या देशांच्या कांहीं भागांत जमिनीच्या वहिवाटीचा एक प्रकार आहे त्यास **मेटेअर** पद्धत ह्मणतात. तेथें जमिनीचें उत्पन्न मालक व शेतकरी यांच्यामध्यें कांहीं एक ठरींव प्रमाणानें वांटून दिलें जातें. हें प्रमाण बहुधा निम्मे असतें, परंतु कांहीं ठिकाणीं जमिनीच्या मालकास उत्पन्नाचा दोन तृतीयांश मिळतो. हें प्रमाण रूढीनें ठरलेलें आहे, चढाओढीनें नव्हे. जमिनीची लागवड करण्यास जें भांडवल लागतें त्याचा कितवा भाग जमीनदारानें घालावयाचा हेंही संप्रदायानें ठरलेलें असतें. कांहीं ठिकाणीं तो जमीन पिकविण्यास अवश्य लागणारीं जनावरें, हत्यारें, व बीं हीं सर्व पुरवितो; व कांहीं ठिकाणीं मालक जनावरें व बीं देतो, व शेतकरी हत्यारें आपलीं घेतात. या चालीस कांहींच नियम नाहीं. ह्मणून मेटेअर कूळ व जमिनीचा मालक यांच्यामध्यें उत्पन्नाच्या वांटणीचें अमुकच प्रमाण असावें याचें कारण काय, हें अर्थशास्त्रावरून ठरवितां येत नाहीं. तथापि मेटेअर पद्धतीपासून साऱ्यावर काय परिणाम होतात याचा विचार करणें उपयोगाचें आहे.

**साऱ्यावर मेटेअर पद्धतीचा होणारा परिणाम.** जेथें सारे चढाओढीनें नियमित केले जात नसून संप्रदायावरूनच ठरतात तेथें जमीनदारांचा कांहीं तोटा होतो. रिकार्डोच्या तत्त्वावरून ज्यास अर्थशास्त्रविषयक सारा ह्मणतां येईल त्याचा कांहीं अंश त्यांना सोडावा लागतो. टस्कनी देशांत कोणत्याही प्रकारची जमीन असो, उत्पन्नाचा दोनतृतीयांश सारा मालकास मिळतो. आतां हें उघड आहे कीं, शेतकऱ्यास आपल्या भांडवलाचा व श्रमाचा खर्च उगविण्यास टस्कनींत कमपीक शे-

ताचा जर एक तृतीयांश पुरत असेल, तर त्यास सुपीक शेत
उत्पन्नाच्या एक तृतीयांशांत व्याज व मजुरी जाऊन
फायदा राहिला पाहिजे. मेटेअर पद्धतीमध्यें जमिनीच्या
धिक सुपीकपणाचा फायदा मालक व कूळ या उभयतांस
ळतो. ह्मणून जमिनींत होईल तितकें जास्त उत्पन्न कर
शेतकऱ्याचें हित असतें. जेथें चढाओढीची पद्धत सुरू अ
तेथें श्रमाची मजुरी व भांडवलाचा साधारण नफा भागला
णजे जें उरतें त्यावर साऱ्याकरितां मालकाचा हक्क राहतो;
साठीं शेताच्या अधिक उत्पादकपणाचा फायदा कुळास स
काळ राहत नाहीं. मेटेअर पद्धतीमध्यें शेतकऱ्यास ह्या फा
द्याचा अंश मिळतो, ह्मणून जमिनीच्या उत्पादकपणापा
त्याचें हित होतें. ह्या गोष्टीमुळें त्याचा उद्योग वाढत असे
आणि मेटेअर पद्धतीपासून जमीनदारास जरी फायदा हो
नाहीं, तरी सर्व समाजास ती हितावह असावी असें दिस
अर्थशास्त्र दृष्ट्या मेटेअर पद्धतीमध्यें दोष एवढाच आहे क
शेताची कायमची सुधारणा करण्यांत कोणीच भांडवल घाल
नाहींत. उदाहरणार्थ, एक मेटेअर पद्धतीच्या भोगवट्या
शेत असून त्यांतील पाणी काढावयाचें आहे, जमिनीच्या माल
कास वाटेल कीं, आपण भांडवल घातल्यास शेताचा उत्पादक
पणा वाढेल, परंतु वाढलेल्या उत्पादकपणाचा सर्व फायद
त्यास न येतां निम्मा किंवा दोन तृतीयांश मिळणार. कुळें
सुद्धां असाच विचार करून शेतांत भांडवल घालीत नाहींत
तथापि ही गोष्ट विसरतां कामा नये कीं, चढाओढीच्या पद्धती
पासून सुद्धां शेतांत कायमच्या सुधारणा करण्याकरितां भांडवल
खर्चण्यास कुळास उत्तेजन मिळत नाहीं; आतां आपण केलेल
खर्च उगवून येईल अशी त्याची खात्री होण्याइतकी लांब मु
दत असेल, तर मात्र तो भांडवल घालण्यास धजेल.

## कुळाच्या हक्का संबंधीं अलस्टर प्रांतांतील चाल.

ऐर्लंदच्या कांहीं भागांत व मुख्यत्वेंकरून अलस्टर प्रांतांत कुळाच्या कांहीं विशेष हक्कामुळें जमीनदारास साऱ्याची रक्कम कांहीं कमी येते. ही चाल अशी आहे कीं, नवीन येणाऱ्या कुळानें शेत सोडणाऱ्या कुळास कांहीं रक्कम द्यावयाची, ती त्या कुळानें शेत नांवारूपास आणलें ह्मणून, व त्यानें केलेल्या सुधारणांच्या राहिलेल्या अंशाची फेड ह्मणून द्यावयाची. शेताची योग्यता वाढविल्याबद्दल जी रक्कम दिली जाते ती अर्थशास्त्रविषयक साऱ्याचा अंश होय. नव्या कुळानें ही रक्कम द्यावयाची नसती तर त्यास अधिक सारा द्यावा लागता. ह्या चालीनें खऱ्या साऱ्याचे दोन विभाग होतात, एका भागाची ऐन रक्कम ठरून ती नव्या कुळाकडून शेत सोडणाऱ्या कुळास दिली जाते, व दुसरा भाग जमीनदारास नेहमींप्रमाणें मिळत जातो. या रिवाजाचा मुख्य फायदा हाच कीं, कुळाचा हक्क जमिनीवर ठरल्यामुळें त्यास आपली शाश्वती वाटूं लागते. दुसऱ्यापक्षीं असें ह्मणतात कीं अर्थशास्त्रदृष्ट्या ही चाल वाईट आहे, कारण तिच्यामुळें नवीन येणाऱ्या कुळाचें भांडवल त्याच्या गरजेच्यावेळीं कमी होतें. या आक्षेपाचें उत्तर असें देतां येईल कीं, कुळाच्या हक्कामुळें जमीन वहिवाटण्यास जो सुरक्षितपणा मिळतो, तो न मिळता तर हें भांडवल शेतांत घातलेंच नसतें. अलस्टर प्रांतांतील कुळाच्या हक्काचा परिणाम फार समाधानकारक झाला आहे. ऐर्लंदच्या ज्या भागांत ही चाल आहे तेथील शेतकऱ्यांची स्थिति जेथें ही चाल नाहीं तेथील शेतकऱ्यांहून चांगली आहे. अलस्टर प्रांतांतील चाल ही जरी बऱ्याच ठिकाणीं आहे, तरी पूर्वी तिला कायद्याची बळकटी नव्हती. सन १८७० पूर्वी ऐर्लंदांत खरोखर दोन कायदे

होते, एक सरकारचा कायदा, व दुसरा लोक संप्रदायानें मानिलेला. १८७० च्या जमिनीच्या आक्टानें या दोन कायद्यांचा मेळ घालून अलस्टर प्रांतांतील कुळांच्या हक्काची चाल कायदेशीर केली. सन १८८१ चा ऐर्लंडांतील जमिनीचा कायदा हा १८७० च्या आक्टास पुरवणी दाखल होता. या दोन्ही कायद्यांचा एकंदरींत परिणाम असा झाला आहे कीं, जमिनींत कूळ व जमीनदार या दोघांची समाईक मालकी झाली. पूर्वी इंग्लंडांतही समाईक मालकीची अशीच एक चाल होती.

**ऐर्लंदांतील काटीअर व कोनाकर नांवाच्या जमीन वहिवाटीच्या पद्धति.** लोकवृद्धि फार झाल्यामुळें जमीनदार लोकांस कुळापासून चढाओढीच्या साऱ्याहून देखील अधिक सारा घेतां येतो. या पद्धतीस काटिअर पद्धत ह्मणतात. शेताच्या उत्पन्नाहूनही अधिक सारा बसवीत तो फक्त नांवाचा असे; अशी भिकार स्थिति असतां कुळास माहित असे कीं, आपण व आपलें कुटुंब यांनीं उपाशीं मरूं नये ह्मणून जमीनदारानें पुरे इतके बटाटे राहूं दिलेच पाहिजेत. ठरलेला नांवाचा सारा त्याच्या हातून कधींच फिटावयाचा नाहीं. ह्मणून जमीनदाराचा तो जन्माचा देणेकरी होऊन राही. त्यास उद्योग करण्यास उत्साह नसे, कारण त्याच्या श्रमाचें सर्व फळ जमीनदार मागील येण्याच्या फेडींत घेई. असें असून कुळासही लग्न करून कुटुंब वाढविण्याविषयीं प्रतिबंध कांहींच नव्हता. कारण त्याची खात्री असे कीं जमीनदार आपण व आपलीं मुलें यांच्या पोटास अवश्य इतकें अन्न दिल्याशिवाय राहणार नाहीं. जमीन भोगवट्याची कोणतीही पद्धत याहून अनर्थकारक नसेल; ऐर्लंदच्या ह्या काटिअर पद्धतीपासून सांपत्तिक, सामाजिक आणि नैतिक असे भयंकर परिणाम झाले आहेत.

ऐर्लंद देशांत कानाकर नांवाची जमीन वहिवाटण्याची दुसरी एक तऱ्हा आहे. त्यांत अशी चाल असे कीं मजुराकडून आपल्या जमिनीवर काम करून घ्यावयाचें असलें ह्मणजे, जमीनदारानें त्यास मजुरी ऐवजीं पैसा न देतां कांहीं खत घातलेली जमीन सारा माफ करून लागवडीस द्यावयाची.

साऱ्याच्या स्वरूपाचें वर्णन वर केलें, तो चढाओढीनें कसा ठरतो, व लोकरिवाजावरूनही कसा ठरतो, हें सांगितलें. आतां पुढल्या भागांत श्रमाच्या वेतनाविषयीं विचार होईल.

**१ ल्या भागावर प्रश्न. जमिनीचा सारा.**

१. सारा कशास ह्मणतात ? चढाओढीनें सारा ठरविणें ह्मणजे काय तें स्पष्ट करून सांगा.

२. जमीनदारास आपल्या जमिनीचा सारा मागतां येतो याचें कारण काय ?

३. जमिनीस सारा येण्यास कोणत्या दोन गोष्टींची आवश्यकता असते ?

४. कोणत्याही विशिष्ट जमिनीचा सारा कशावरून ठरतो ?

५. लागवडीची मर्यादा ह्मणजे काय ?

६. लागवडीच्या मर्यादेची जागा कशावरून ठरते ?

७. शेतीच्या उत्पन्नाच्या किमतीबरोबर लागवडीची मर्यादा फिरते ती कशी याचें एक उदाहरण द्या.

८. शेतीच्या उत्पन्नाची किंमत कशावरून ठरते ?

९. लागवडीची मर्यादा उतरल्यास सारा कोणत्या दोन प्रकारांनीं वाढतो ?

१०. रिकार्डोचें साऱ्याविषयीं तत्व थोडक्यांत सांगा.

११. जमिनदाराचें हित व इतर लोकांचें हित यांत एका अर्थी विरोध आहे तो कसा ?

१२. जमिनदार, मक्तेदार, व शेतकरी यांचें हित एकच आहे तें कोणत्या बाबतींत ?

१३. मजुरास हलकें वेतन दिल्यापासून मक्तेदार, व जमीनदार ह्यांस नेहमी फायदा कसा होत नाहीं तें दाखवा.

१४. आस्ट्रेलियासारख्या देशाच्या भरभराटीस लोकवृद्धि कशी कारण होते ?

१५. हिंदुस्थानासारख्या देशांच्या भरभराटीवर लोकवृद्धीचा काय परिणाम होतो ?

१६. सारा हा शेतीच्या उत्पन्नाच्या किमतीचा अंश नाहीं हें सिद्ध करा.

१७. सारे नेहमींच चढाओढीनें ठरवितात काय ?

१८. जमीन वहिवाटण्याची मेटेअर नांवाची पद्धत कोणती ? तिचें वर्णन करा.

१९. या पद्धतींत जमिनदारास चढाओढीनें ठरेल इतका सारा मिळतो काय ?

२०. मेटेअर पद्धतीपासून कांहीं फायदे व तोटे कोणते होतात ?

२१. अलस्टर प्रांतांत कुळाच्या हक्काची कशी वहिवाट आहे तिचें वर्णन करा. त्या वहिवाटीपासून कोणते फायदे व तोटे आहेत ?

२२. ऐर्लंदांत काटिअर नांवाचा जमीन वहिवाटीचा प्रकार आहे त्याचें वर्णन करा.

२३. त्यापासून कोणते तोटे होतात ते सांगा.

२४. कोनाकर ह्मणून काय आहे ?

---

१. जर कोणी मक्तेदार पत्करलेल्या जमिनीकरितां चढाओढीचा सारा देईल, तर ती जमीन सुपीक किंवा नापीक असल्यानें त्यास कांहीं फरक वाटेल काय ?

२. इंग्लंड देशाच्या क्षेत्रफळांत नवीन सुपीक जमीन शंभर चौरसमैल येऊन मिळाली, तर शेतीच्या उत्पन्नाच्या किमतीवर ह्याचा कांहीं परिणाम होईल काय ?

३. व हा परिणाम सार्वकाळ राहण्याचा संभव आहे काय ?

४. जर तुह्मांस शेत करावयाचें असेल तर तुह्मीं कांहीं चढाओढीनें सारा द्याल किंवा मेटेअरपद्धतीप्रमाणें कुळ व्हाल ?

५. इंग्लंडांतील सर्व जमिनदार लोकांनीं कुळास सारा माफ केल्यास भाकर स्वस्त होईल काय ?

६. सर्व मक्तेदारांनीं खासगी लोकांस सारा न देतां सरकारच्या तिजोरींत भरला तर देशाच्या साधरण संपत्तीवर काय परिणाम होईल.

---

## भाग २.

## श्रमाचें वेतन.

श्रमाबद्दल धनाचा जो अंश मिळतो त्यास वेतन ह्मणतात. भांडवलांतून वेतन दिलें जातें असें ह्मणण्यास मिस्तर हेनरी जार्ज यांचा जो आक्षेप आहे, त्याचा उल्लेख मागें आला आहे. आतां ही गोष्ट कदापि विसरतां कामा नये कीं, वेतन आणि नफा यांचा मूळ आधार ह्मटला ह्मणजे त्यांच्या साह्यानें जें उत्पन्न होतें त्याचें मोल होय. परंतु ज्याअर्थीं भांडवलवाल्यास, माल तयार होऊन बाजारांत जाईपर्यंत, आपल्या बक्षिसाकरितां वाट पाहण्याची सोय असते, आणि ज्याअर्थीं मजुरांची स्थिति हल्लीं अशी आहे कीं, त्यांस अशी वाट पाहण्याची सोय नाहीं, त्याअर्थीं मजुरांस मालाच्या मोलाचा जो अंश मिळावयाचा तो त्यांस भांडवलवाला दरमहा वेतनाच्या रूपानें देतो; आणि या दृष्टीनें पाहतां वेतन भांडवलांतून दिलें

जातें, व कोणताही विशिष्ट माल उत्पन्न करण्यास जो खर्च येतो त्यांत वेतनाचा समावेश होतो.

**चढाओढीनें ठरलेलें वेतन.** साऱ्याप्रमाणें वेतन प्रचारावरून किंवा चढाओढीनें ठरतें परंतु प्रायः तें चढाओढीनेंच नियमित केलें जातें, ह्मणजे असें कीं, कामकरी आपल्या श्रमाबद्दल मिळेल तितकें अधिक वेतन मिळवायास झटत असतो, व धनी आपल्यास मिळेल तितक्या कमी खर्चात काम करून घेण्यास पाहत असतो. ह्या साधारण नियमास अपवाद असावयाचेच; कांहीं मजुरदार असे असतात कीं, त्यांस दुसरीकडे ज्यास्त वेतन मिळत असलें तरी पूर्वीच्या धन्यास सोडीत नाहींत, व असेंही पाहण्यांत येतें कीं, मालक मजुरदारास धर्मार्थ काम सांगतो, व आपलें काम कमी खर्चानें होण्यासारखें असलें तरी कामावर असलेल्या मजुरास रजा देत नाहीं. परंतु असे प्रकार अपवादांतच गणिले पाहिजेत. यजमान व कामकरी लोक यांना कांहीं माल विकत घेणारे व देणारे असें मानतां येईल. यजमानास श्रमाची अपेक्षा असते; व मजुरास तो विकावयाचा असतो. काम सांगणारे लोक श्रम जितका स्वस्त मिळेल तितका घेण्यचा प्रयत्न करितील, परंतु त्याच्यामध्यें परस्परांत चढाओढ होते ह्मणून वेतन वाढतें. कल्पना करा कीं व्यापार वाढून श्रमाची अपेक्षा अधिक भासूं लागली, तर कारखानदार मजुरास बाहेर जाऊं देऊन आपलें नुकसान करून घेण्यापेक्षां त्यांचें वेतन वाढवून त्यांना कारखान्यांत राहूं देतील. मजुरदार आपल्या श्रमास मिळेल तितका पुष्कळ पैसा मिळावा असें इच्छित असतात, परंतु त्यांच्यामध्यें चढाओढ होऊन वेतन कमी होतें. समजा कीं तीन मजूर एका कारखानदारापाशीं काम मागण्यास निघाले, परंतु त्यास एकाच

मनुष्याची गरज आहे. अशी कल्पना केली कीं तिघे चांगले काम करणारे आहेत, व चढाओढीस प्रतिबंध नाहीं, तर जो कमी वेतन घेण्याचें पत्करील त्यास तें काम मिळेल. दुसऱ्यापक्षीं जर असें घेतलें कीं, तीन कारखानदारांस एकच नोकर ठेवणें आहे, तर जो ज्यास्त वेतन देईल त्याच्या चाकरीस तो राहील. आतां हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, देशांतील सर्व कामकरी लोक सर्व कामांत पाहिजे तशी चढाओढ करीत नाहींत. कामाच्या संबंधानें लोकांचे निरनिराळे समुदाय झालेले असतात. एकेका समुदायांत पूर्ण चढाओढ असते, परंतु एका समुदायांतून दुसऱ्यांत अशी नसतेच ह्मटल्यास चालेल. कसबी कारागिरीच्या कामांत चढाओढ करण्याकरितां खालच्या वर्गांतील पांट्या वाहणारे लोक येणार नाहींत; व कारागीर लोक वकील किंवा डाक्तर यांच्या धंद्यांत चढाओढ करीत नाहींत. भिन्नप्रकारच्या कामांत वेतनाचे दर भिन्न असतात याचें मुख्य कारण चढाओढ मर्यादित होते हेंच होय.

**वेतनाची रक्कम ज्यावरून नियमित होते त्या गोष्टी.** कांहीं उद्योगांत भांडवलाचा पुष्कळ भाग वेतन देण्यांत खर्चावा लागतो. ह्मणजे कांहीं कारखान्यांत इतर कारखान्यापेक्षां मजुर ज्यास्त लागतात. उदाहरणार्थ शेतांत धान्य पिकविण्यास मजुरीचा खर्च विशेष येतो, तितका गुरें पाळणाऱ्याच्या धंद्यांत येत नाहीं. ह्मणून देशांतील वेतनफंडाची रक्कम राष्ट्रीय उद्योगाच्या स्वरूपावर अवलंबून राहते; व कोणत्याही देशांतील सरासरी वेतन, तेथील वेतनफंड व मजुरदारांची संख्या यांतील प्रमाणावर अवलंबून असते. उद्योगाच्या स्वरूपांत फेरफार झाल्यानें वेतनांत फेरफार होतो. चालू शतकांत इंग्लंडांत चोहोंकडे वाफेच्या शक्तीचा उपयोग होऊन वेतनफं-

डापैकीं पुष्कळ रक्कम यंत्रें वगैरे स्थाइकभांडवलांत गेली. त्यामुळें अल्पकाळ मजुरांचें नुकसान झालें. परंतु त्यांचें नुकसान केवळ तेवढ्या वेळेपुरतेंच होतें. कारण यंत्रांचा उपयोग केल्यामुळें संपत्ति अतोनात उत्पन्न होऊन मालकांनीं आपलें भांडवल वाढविलें; यामुळें श्रमाची अपेक्षा वाढली, व वेतन देण्याकरितां काढलेलें भांडवल कमी न होतां शेवटीं वाढत गेलें. यंत्रें उपयोगांत आल्यानें इतर लोकसमुदायाचा जसा फायदा झाला तसा मजुरांचाही झाला. जिन्नस खपविणाऱ्यांचा फायदा असा झाला कीं, मास व दुभतें याशिवाय सर्व जिन्नस स्वस्त मिळूं लागले. केव्हां केव्हां असा आक्षेप घेतात कीं, वेतनफंड व मजुरांची लोकसंख्या यांच्या प्रमाणानें वेतन नियमित होतें, असें ह्मणावें तर व्यापाऱ्यांच्या श्रेणीस वेतन कमज्यास्त करण्याचें सामर्थ्य मुळींच असूं नये. परंतु खरा प्रकार उलट आहे; व्यापाऱ्यांच्या श्रेणींतील अधिकारी आपल्या व्यापारावर नजर ठेवितात, व व्यापाराच्या स्थितीवरून ते बरोबर ताडतात कीं, अमुकवेळीं वेतन कमी किंवा ज्यास्त झालें पाहिजे. उदाहरणार्थ एखाद्या व्यापारांत मूळखर्च न वाढतां जर किमती चढल्या तर श्रेणींतील लोकांस वाटूं लागतें कीं आपलें वेतन वाढलें पाहिजे, व त्या सर्वांचें ऐक्य असल्यामुळें त्यांना आपलें वेतन त्वरित व हटकून वाढवून घेतां येतें कारण कारखानदारांचे नफे वाढून श्रमाची अपेक्षा अधिक होत जाईपर्यंत वाट पाहण्यांत मजुरांचें कांहीं नुकसान होतें. व्यापाऱ्याच्या श्रेणीचा परिणाम वेतनावर काय होतो याचें विवेचन पुढें एका भागांत केलें आहे.

**वेतनावर लोकसंख्येचा परिणाम.** कष्ट करणाऱ्या लोकांच्या स्थितींत कायमची सुधारणा होण्यास आजपर्यंत जी

मोठी अडचण आली आहे ती ही कीं, वेतनफंड वाढले कीं बहुधा त्या मानानें वेतन घेणाऱ्यांची संख्या वाढल्यावांचून राहत नाहीं. धान्यावरची जकात उठविण्याच्यावेळीं कांहीं उतावीळ लोकांस असें वाटलें होतें कीं, जकात उठविल्यावर धान्याची स्वस्ताई होईल व तिच्या योगानें कष्ट करणाऱ्या गरीब लोकांच्या स्थितींत कायमची सुधारणा होईल. ते ह्मणत इतःपर कोणी उपाशीं मरणार नाहीं, व भीकही मागणार नाहीं. गरीब लोकांकरितां बांधलेलीं गृहें ओसाड पडतील अशी त्यांची खात्री होती. परंतु खरा प्रकार फार निराळा झाला. धान्याचे कायदे रद्द झाल्याबरोबर इंग्लंडांत जें स्वस्त धान्य येऊं लागलें, त्यामुळें, लोकवृद्धि फार झाली; स्वस्त धान्याचा विपुळ पुरवठा झाल्यापासून जें हित व्हावें, तें, लाखो प्रजा निर्माण होऊन तोंडें पसरून तयार झाल्यामुळें झालें नाहीं. कायदा रद्द होऊन धान्य स्वस्त मिळाल्याचा परिणाम कामकरी मनुष्यावर बराच काळपर्यंत असा झाला कीं, त्याचा सुखानुभव न वाढतां त्यास अधिक मुलें मात्र पोसतां आलीं. यांवरून असें अनुमान निघतें कीं, कामकरी लोकांच्या स्थितींत कोणत्याही प्रकारची बाह्य सुधारणा झाली तरी ती टिकणार नाहीं, ती कायमची होण्यास ज्यांच्या योगानें लोकवृद्धि मर्यादित राहील अशा कारणांची आवश्यकता आहे.

**सुखाचें परिमाण वाढविण्याची आवश्यकता.** गरीब लोकांच्या सुखाचें परिमाण साधारणपणें वाढविणें यासारखी दुसरी कोणतीही गोष्ट, त्यांची लोकसंख्या खात्रीनें मर्यादित करील असें दिसत नाहीं. त्यांना अधिक सुखानें राहण्याची संवय होईल तर त्याहून खालीं न जाण्याविषयीं ते होईल तितकी खटपट करतील. या संबंधानें रिकार्डो ह्मणतोः—"मा-

नवी जातीचे मित्रांस असें वाटल्याशिवाय राहत नाहीं कीं, सर्व देशांतील कष्ट करणाऱ्या लोकांस सुखोपभोगाची हौस असावी. व त्यांना त्याकरितां लागणारे पदार्थ वाजवी रीतीनें मिळण्याविषयीं उत्तेजन द्यावें. लोकसंख्या फाजील न वाढण्यास यासारखें दुसरें साधन नाहीं." शेतांत खपणाऱ्या मजुरांमध्यें सुखाचें परिमाण वाढलेलें हल्लीं स्पष्ट दिसत आहे, ह्मणूनच त्यांच्या स्थितींत झालेली सुधारणा कायम राहील असें मानण्यास आशा आहे. त्यांच्यांतील तरुण लोकांस आपल्या वाडवडिलांची आयुष्यक्रमणाची रीति सहन न होऊन ते दुसऱ्या धंद्यांत शिरण्यास, दुसऱ्या ठिकाणीं जाण्यास, व देशांतर करण्यास तयार झाले आहेत. गेल्या दहा पंधरा वर्षांत अशा कांहीं गोष्टी जमून आल्या कीं, त्यांच्या योगानें इंग्लंडांतील मजूरदाराचें नेहमीचें सुखाचें मान वाढलें. यासंबंधीं मुख्य गोष्ट सन १८७० चा शिक्षणाचा कायदा ही होय. लोकांना विद्येचा संस्कार झाला ह्मणजे, मनस्वी गर्दी झाल्यानें जो गलिच्छपणा उत्पन्न होतो, त्यापासून मुक्त होण्यास हरतऱ्हेनें ते झटतात. लोकांत जो नेमस्तपणा वाढला आहे तोही शिक्षणाचाच परिणाम असावा. देशांत दारूचा खप इतका कमी झाला आहे कीं, अबकारीच्या उत्पन्नांत दरसाल ५० लक्ष पौंडांची तूट पडत आहे. नेमस्तपणा वाढल्यानें नेहमीच्या सुखाचें मान वाढेल यांत संशय नाहीं. शिक्षणापासून मजूर लोकांचा दुसऱ्याप्रकारेंही फायदा झाला असेल. त्यांची बुद्धि वाढल्यानें त्यांचा श्रम अधिक फलद्रूप होतो, व मालकाच्या नफ्यांत कांहीं तोटा न होतां त्याचें वेतन वाढण्याचा संभव असतो. आस्ट्रेलिया, न्युझीलंद, अमेरिका आणि कानडा या देशांतील आपल्या जातभाईची स्थिति त्यास

माहित झाल्यानें मजूरदारांच्या सुखानुभवाचें मान स्वदेशीं वाढत आहे. उदाहरणार्थ इंग्लंदांत सुतार हलकें वेतन घेऊन काम करणार नाहीं, कारण त्यांचा कोणी सोबती देशांतर करून आस्ट्रेलियांत जाऊन राहिलेला असतो, त्याजकडून यांस समजलेलें असतें कीं राखांपटन किंवा सिडणी शहरास गेल्यास आपल्यास दररोज १० शिलिंग सहज मिळतील.

**मालथस साहेबाचा लोकवृद्धीचा नियम.** मालथस साहेबानें लोकवृद्धि या विषयावर एक प्रसिद्ध निबंध लिहिला आहे. त्यांत त्यानें असें प्रतिपादन केलें आहे कीं, प्राण्यांच्या वृद्धीचा रोख नेहमीं अन्नसामग्रीहून पलीकडे जाण्याचा असतो; याकरितां प्रजावृद्धीस कांहीं प्रतिबंध ठेविला नाहीं तर कांहीं काळानें मनुष्याचा निर्वाह होण्यास जगांत उत्पन्न होणारें सर्व अन्न पुरणार नाहीं. कांहीं लोकांस वाटतें कीं मालथस साहेबाची ही निवळ चुकी आहे, कारण पृथ्वीचे पाठीवरील लोकांस पुरे इतकें अन्न मिळणार नाहीं अशी स्थिति प्राप्त होईल असें दिसत नाहीं. परंतु हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं मालथस साहेबाच्या सांगण्याचा भाव इतकाच कीं लोकवृद्धीस प्रतिबंध नसतील तर ही अन्नाची कमताई पडेल. पण हे प्रतिबंध आहेतच आणि ते प्रत्येक देशांत जारीनें सुरू आहेत. प्रत्येक देशांत लोकसंख्येच्या मानानें जन्मावीं तितकीं मुलें जन्मत नाहींत, व जन्मलीं तरी पुष्कळ लवकर मरतात. लोकांच्या दूरदर्शीपणामुळें किंवा लढाई, दुष्काळ, आणि पटकी अशा प्रकारांनीं लोकसंख्या मर्यादित राहते. प्राणिकोटींत व उद्भिजकोटींत प्रजावृद्धीची शक्ति इतकी मनस्वी आहे कीं, त्यांना पाहिजे तसें पसरण्यास सवड असेल तर कांहीं हजार वर्षांनीं कोट्यवधि पृथ्व्या भरून जातील. अनिवार्यता हा जो सृष्टीचा

जबरदस्त व सर्वव्यापक नियम आहे तो त्यास मर्यादेंत राखतो. झाडेंझुडें व अज्ञानी प्राणी यांची अवस्था कशी असते हें सर्वांस माहित आहे. जेथें जेथें वाव सांपडेल जेथें तेथें त्यांचा विस्तार होऊन जागा व पोषण यांच्या अडचणीमुळें त्यांची फाजील वृद्धिखुंटावी. मालथस साहेबानें असें दाखविलें कीं, जीवनाच्या साधनाहून अधिक वाढण्याचा मानवी जातीचाही रोंख असतो, लोकवृद्धि मर्यादित राखण्यास जर दुसरे प्रतिबंध झाले नाहींत, तर उपासमर, रोग, व दुसरे कित्येक भयंकर प्रकार यांनीं लोकसंख्या कमी होते. लोकवृद्धीस हे जे वास्तविक प्रतिबंध आहेत, त्याखेरीज दुसरे मनुष्याच्या विवेकापासून होणारेही असतात. मालथस साहेबानें आपल्या निबंधांत निरनिराळ्या देशांच्या स्थितीचें वर्णन केलें आहे, व कोठें वास्तविक व कोठें विवेकाचे प्रतिबंध प्रबळ आहेत, हें सांगितलें आहे. पुष्कळ देशांत दोन्ही प्रतिबंध सुरू असतात; लंडन शहरांत अन्न, वस्त्र व निगा नसल्यामुळें, व मनुष्यांची गर्दी झाल्यामुळें रोग होऊन जीं मुलें मरतात त्यांची गणती सांगितल्यास आंगावर शहारे उभे राहतील. देशाच्या उन्नतीस काळिमा आणण्यासारखी ही गोष्ट आहे; कारण उन्नति वाढेल तसा विवेकाचा प्रतिबंध प्रबल होऊन वास्तविक प्रतिबंधाचें कारण लागूं नये हें सांगितलें पाहिजे असें नाहीं. देशाच्या उन्नतीचा अजमास, विवेकाचा किंवा वास्तविक प्रतिबंध ज्यास्त प्रबळ आहे हें जाणून करतां येईल.

श्रमाचें वेतन कोणत्या कारणांनीं नियमित होतें, हें बरोबर समजण्यास लोकसंख्येचें महत्त्व ध्यानांत पूर्ण बिंबलें पाहिजे. लोकवृद्धीचा प्रतिकार करणारीं कारणें चालू नसून लोकसंख्या

वाढल्यास कामकरी लोकांच्या स्थितीवर दोन प्रकारचा परिणाम होतो; कमी उत्पन्नाच्या जमिनींत लागवड करण्याची आवश्यकता पडल्यामुळें अन्नाची किंमत वाढते; व रोजमुरा घेणाऱ्या लोकांची संख्या वाढल्यामुळें बाजारांत चढाओढ वाढून वेतन कमी होतें.

**लोकवृद्धि कमी करण्यास देशांतर करणें हा अपुरा उपाय होय.** कांहीं लोकांस वाटतें कीं लोकवृद्धि कमी करण्यास देशांतर हा उपाय ठीक आहे. लोकसंख्येची स्वाभाविक वृद्धि बंद करण्यास परदेशगमनावरच केवळ भरंवसा ठेवणें वाजवी नाहीं. जे अतिदरिद्री व अनाथ असतात, त्यांना देशांतर करण्यास साधन नसतें, आणि तें साधन जर सरकारानें किंवा राष्ट्रानें वर्गणी करून पुरविलें, तर नवीन वसाहतींतील लोक जुन्या देशांतील भिकार आपल्या देशांत बहुधा येऊं देणार नाहींत. संयुक्त संस्थानांतील सरकारानें सन १८८३ त अनाथ ऐरिश कुटुंबें आपल्या देशांत उतरूं देण्याचें नाकारलें; पण त्या कुटुंबास प्रवासाचें भाडें देणारांनीं त्यांस अमुक दिवस पोसण्याचें कबूल केलें तर मात्र त्यांस परवानगी होती. ह्मणून असें दिसतें कीं आपण ज्यांना बाहेर घालविण्यास पाहतों, त्यांस परदेशचे लोक आपल्या देशांत घेण्यास खुषी नसतात; व ज्यांचें चांगलें चाललें असतें त्यांना आपलें काम सोडून देशांतर करण्याची इच्छा नसते. दुसरें असें कीं जर विवेकजन्य प्रतिबंध सुरू नाहींत, तर कांहीं लोकांनीं देशांतर करून तरी काय होणार? त्यांची जागा लागलीच नवी प्रजा व्यापून टाकणार. तिसरें असें कीं, लोकवृद्धीस देशांतर हा कायमचा उपाय नव्हेच, कारण कालांतरानें नवीन वसाहतींत देखील युरोपांतील जुन्या देशांत हल्लीं आहे

इतकी गर्दी होऊन देशांतराचा मुख्य फायदा नाहींसा होईल. लोकवृद्धि मर्यादेंत राखण्यास देशांतर हा जरी अपुरा उपाय आहे तरी तूर्त देशांतरापासून बरेंच हित होईल, मात्र विवेकाचा प्रतिबंध वाढला पाहिजे. कांहींकाळपर्यंत जो कसबी मजूर अमेरिका किंवा आस्ट्रेलिया देशास जाईल, तो त्या देशाचें धन वाढवून युरोप खंडांत मजुरांची जी गर्दी झाली आहे ती कमी करील. ऐर्लंडांतून बरेच लोक आपोआप अमेरिकेस गेले त्यांनीं दोन्ही देशांचें हित केलें आहे; व शेतांत काम करणाऱ्या कांहीं इंग्लिश लोकांनीं नुकतेंच देशांतर केलें, त्यापासून देशांत राहिलेल्या लोकांतसुद्धां बरीच सुधारणा झाली. कानडा, संयुक्तसंस्थानें, आणि न्यूझीलंद या देशांत काम करणाऱ्या कसबी लोकांस मोठ्या हौसेनें ठेवून घेतात.

**नफ्यामध्यें स्थानिक दर कमी झाल्याचा वेतनावर परिणाम.** इतिहासावरून असें दिसून येतें कीं सर्व देशांत धन आणि लोकसंख्या यांच्या वृद्धिबरोबर नफ्याचा दर उतरला आहे. चोहोंकडे नफ्याचा हा दर कां उतरला, याच्या कारणांचा शोध पुढील भागांत करण्यांत येईल येथें नफ्यांत स्थानिक दर कमी झाल्याचा वेतनावर काय परिणाम होतो, हें दाखविलें ह्मणजे पुरे, सर्व साधारण नफ्याचा दर कां उतरला याचा विचार करण्याचें कारण नाहीं. कल्पना करा कीं, अमक्या एका धंद्यांत काम करण्याऱ्या मजुरांस इतकें वेतन मिळत आहे कीं, कारखानदारास सरासरीहून अधिक नफा पडत नाहीं. हे लोक जर काम बंद पाडण्याची भीति घालून आपलें वेतन वाढवून घेतील तर मालकास तोटा सोसून धंदा चालवावा लागेल. ह्मणजे दुसऱ्या धंद्यापेक्षां त्याला यांत कमी नफा मिळेल. ह्मणून आपला कारखाना न वाढण्यावि-

षयीं तो सावध राहील; आणि तोटा कायमचा होतोसें दिसल्यास तो आपलें भांडवल त्या धंद्यांतून हळू हळू काढून दुसरीकडे घालील. ह्मणून नेहमींच्या मानापेक्षां नफा कमी पडून मजुरांचें वेतन जर वाढलें तर हा त्यांचा फायदा केवळ तात्कालपर्यंतचा समजला पाहिजे. कांहीं दिवसांपूर्वीं शेतकरी लोकांनीं काम बंद पाडलें, त्याच्या पूर्वींपासून मक्तेदार लोकांस आपल्या भांडवलावर साधारणमानापेक्षां कमी नफा मिळत असे, ही गोष्ट जर खरी असेल तर मजुरांचें वेतन वाढल्यानें शेतकामाच्या उद्योगांत कांहीं तरी फरक झाला पाहिजे. दुसऱ्या धंद्याहून कमी नफा पडूं लागल्यास मक्तेदार लोक आपलें भांडवल शेतींत ठेवणार नाहींत. कदाचित् असें होईल कीं, वेतन वाढल्यानें श्रम अधिक फलद्रूप होईल; असें असेल तर मक्तेदारास ज्यास्त खर्च पडल्यानें पीक चांगलें येईल, किंवा कामावर थोडे लोक ठेवून चालेल. कदाचित वेतनाचा खर्च वाढल्यामुळें पूर्वींपेक्षां यंत्रें अधिक उपयोगांत आणावीं असें वाटेल; शेतांचा आकार वाढून वाफेचा नांगर, कापण्याचें यंत्र, व गवत तयार करण्याचें यंत्र यांचा फैलाव होईल; ज्यांना शेतकीच्या यंत्रांची चांगली माहिती असेल अशा लोकांसच ते ज्यास्त वेतन देऊन ठेवतील. जुन्या तऱ्हेचा शेतकरी फार हाल भोगून नाहींसा होईल किंवा कामांतून जाईल. ह्या शेतखप्यास देशांतर करण्याची अक्कल नसते, तो इतका मंदड असतो कीं, शेतांत आणलेल्या यंत्रांची माहिती त्यास लवकर होत नाहीं, किंवा तो शहरांत राहून एखादा धंदा करण्यास ही असमर्थ असतो. कसबी व ज्यास्त वेतन घेणारे शेतांतील मजूर यांच्यापासून जो फायदा होतो त्यांत, एवढेंच न्यून आहे कीं, जुन्या शेतखप्यास फार विपत्ति सोसावी लागते. मक्तेदारास नफा

कमी पडून रोजमुरे वाढल्यास आपला तोटा भरून काढण्यास त्यास दुसरा एकमार्ग असूं शकेल तो असा कीं रोजमुरे वाढल्यानें सारा द्यावा लागतो तो कदाचित् कमी होईल आणि असें झालें असतां, एकदम कामावरून दूर केल्यामुळें शेतखण्यांना जितकें दुःख होईल, त्यापेक्षां यांत पुष्कळ कमी होईल.[1]

**वेतनाच्या दरावर फलद्रूपपणाच्या वृद्धीचा परिणाम.** ज्या गोष्टीनें श्रमाचा फलद्रूपपणा वाढतो, तींच गोष्ट वेतन वाढविण्यास कारण होते. जमीन, श्रम, आणि भांडवल यांच्या संयोगानें अधिक उत्पन्न झाल्यास, जमीनदारास अधिक सारा, मजुरास अधिक वेतन, आणि भांडवलवाल्यास अधिक नफा वांटणीस येईल. विद्येच्या योगानें किंवा तसल्याच दुसऱ्या कांहीं साधनाच्या योगानें मजूरदार अधिक समजुतीनें व प्रामाणिकपणानें काम करील आणि त्यामुळें श्रमाचा फलद्रूपपणा वाढेल, तो सामानाचा व हत्यारांचा चांगला उपयोग करील, अशामुळें देखरेखीचा व कारखान्यांत बंदोबस्त ठेवण्याचा श्रम वांचवील, अशा रीतीनें वेतन वाढवितां येईल, कारण धनच अधिक उत्पन्न होईल ! तसेंच मूळखर्च कमी होईल आणि तपासनिसचा पगार वांचेल.

मजूर लोकांना त्यांच्या श्रमाच्या अधिक फलद्रूपपणाचें फळ मिळावें, ह्मणून जे जे बेत योजिले आहेत, त्या सर्वांचें तत्व हें आहे कीं श्रम करणाऱ्याचा श्रम जसा फलद्रूप होईल तशी त्यास

---

१ हें लिहिल्यापासून इंग्लंदांत चोहोंकडे सारे उतरले आहेत, आणि शेतकरी लोकांच्या स्थितींत पुष्कळ सुधारणा झाली आहे. आतां असें चिन्ह दिसूं लागलें आहे कीं, ही सुधारणा जशी पाहिजे तशीच होत आहे, म्हणजे एकीकडे सारे कमी होऊन दुसरीकडे रोजमुरे व श्रमाचा फलद्रूपपणा हीं वाढत आहेत.

अधिक द्रव्यप्राप्ति प्रत्यक्ष करून दिली, ह्मणजे तो ज्यास्त उत्साहानें, व हुशारीनें काम करील आणि सामानाचा नाश होऊं देणार नाहीं. यामुळें त्याचें काम अधिक मोलाचें होईल; हें वाढलेलें मोल मजूर व त्यांचे धनी यांनीं ठरविलें असेल त्याप्रमाणें पुढें परस्परांत वांटून घ्यावें. नफ्याची अशी वांटणी ज्या कारखान्यांत झाली आहे त्यांपैकीं कांहींचें वर्णन खंड तीन भाग ४ यांत होईल.

**देशकालाच्या मानानें वेतनाच्या दरांत नेहमीं फेरबदल होतो.** श्रमाचें वेतन नियमित करणारीं साधारण कारणें वर सांगितलीं; परंतु स्थानिक व अल्पकाळ टिकणारीं कांहीं कारणें वेतनाच्या दरांत फेरबदल करीत असतात हें विसरू नये. मालाची साधारण किंमत, माल उत्पन्न करणाऱ्याचा नेहमींचा नफा व चालीचें वेतन यांच्या आकारा इतकी असते. परंतु ही किंमत जशी सदोदित या आकाराहून कमज्यास्त होत असते त्याप्रमाणेंच विशिष्ट प्रकारच्या श्रमाची किंमत, साधारणपणें श्रमाची अपेक्षा आणि श्रम करणाऱ्यांची संख्या यांच्याप्रमाणांत असून वेळोवेळीं या सरासरी मानाहून कमीज्यास्त होत असते.

**भारी किंमती, वेतन अधिक करतात काय?** केव्हां केव्हां लोक असें बोलतांना आढळतें कीं भारी किंमतीच्या योगानें वेतन वाढतें. जर वेतनफंड व वेतन घेणारे लोक यांच्यांतील प्रमाण आहे तसेंच राहील, तर कोणत्याही गोष्टीपासून कामकरी लोकांच्या स्थितींत कायमचा परिणाम होणें नाहीं, हें ज्यांना माहित आहे त्यांसच वरील वाक्याचा अर्थ बरोबर समजेल. ही गोष्ट ध्यानांत ठेवून ज्यांच्या संबंधानें, भारी किंमती अधिक वेतन करितात, व हलक्या किंमती कमी वेतन

करितात असें बोलण्यांत येतें; अशा कांहीं गोष्टींच्या शोधास लागूं. किंमतीच्या भारीपणाचा परिणाम वेतनावर कांहींच घडत नाहीं, अशीं पुष्कळ उदाहरणें सांपडतील. ज्या जिनसांचा पुरवठा वाढवितां येतो, त्यांची किंमत मूळखर्चावर अवलंबून असते. मूळखर्चाचे घटकावयव श्रम, अभोग, आणि धोका हे आहेत. मिळेल तितका अधिक फायदा मिळवावा अशा हेतूनेंच या गोष्टींच्या खर्चांत कोणी पडतो ह्मणून तयार झालेल्या जिन्नसांच्या किंमतींत चालीचा नफा व वेतन हीं आलीं पाहिजेत. जिन्नस तयार करण्यास जर श्रम, अभोग, व धोका यांची गरज असेल तर त्याची किंमत वाढविली पाहिजे; किंवा कोणत्याही कारणावरून जिनसाच्या उत्पादकास विशेष फायदा होण्यासारखें असेल, तरी देखील किंमत वाढली पाहिजे. पहिल्या उदाहरणांत जेथें आपण कल्पना केली कीं, जिन्नस तयार करण्यास श्रम, अभोग व धोका यांची गरज होती तेथें भांडवलाचा नफा, किंवा श्रमाचें वेतन न वाढतां किंमत वाढलीच पाहिजे. जिनसाची किंमत सरकारदेण्यानें ही वाढेल, याठिकाणीं त्यामानानें वेतन वाढणार नाहीं. तथापि अशीं कांहीं उदाहरणें दाखवितां येतील कीं किंमती वाढल्यानें तावत्काल रोजमुरे वाढतात. कल्पना करा कीं, सुती कापडाची फार चणचण आहे. अपेक्षा व पुरवठा यांचें समीकरण कांहीं वेळ सुती कापडाची किंमत चढवून करावें लागेल. न जाणो किंमती चढल्यामुळें कारखानदारास नेहमींपेक्षां ज्यास्त नफा येईल, आणि या गोष्टीमुळें सुती कापडाचा पुरवठा वाढेल; याकरितां नवें भांडवल पाहिजे. कदाचित कारखानदार नव्या गिरण्या काढतील, आणि यंत्रें उभारण्यांत भांडवल खर्चें करितील; हीं यंत्रें चालविण्यास अधिक मजूर लाग-

तील; श्रमाच्या ह्या वाढलेल्या अपेक्षेमुळें रोजमुरे वाढतील. याठिकाणीं भारी किंमतीमुळें वेतन भारी झालें. परंतु ह्या भारी किंमती व हें भारी वेतन हीं दुसरे कारखानदार व मजूर यांच्या नजरेस आल्याशिवाय राहणार नाहींत; ते चढाओढ करतील व हे भारी नफे, व हें भारी वेतन यांचे आपण वांटेकरी व्हावें असें त्यांस वाटेल. दुसऱ्या भांडवलवाल्यांनीं चढाओढ केल्यामुळें माल पुष्कळ तयार होईल, व दुसऱ्या मजुरांनीं चढाओढ केल्यामुळें श्रमाचा पुरवठा वाढेल. पुरवठा वाढला ह्मणजे सुती कापडाची किंमत पूर्वींच्या थरा जवळ जवळ येईल; किंमत इतकी देखील उतरेल कीं, किंमती चढण्यापूर्वीं धंद्यांत साधारणपणें जो नफा, व जें वेतन मिळत होतें, तितकें मिळणार नाहीं. या प्रत्येक गोष्टींत किंमत उतरल्याच्यामानानें वेतन आणि नफा हीं कमी झालींच पाहिजेत. वेतन कसें उतरतें तें पहा:—धनोत्पादनता कमी होते; कारखानदारास भारी नफा मिळेनासा होतो; नेहमींच्या मानाहून त्यास नफा कमी देखील पडत असतो. ह्मणून ते पुरवठा कमी करण्यास झटतील; ते आपले कारखाने वाढविणार नाहींत. मजूर लोकांस निम्मावेळ कामावर ठेवतील. अशा प्रसंगीं श्रमाचा रोजमुऱ्यावर काय परिणाम होईल? आपण कल्पना केली कीं, पूर्वी पुरवठा वाढला तेव्हां भारी वेतन मिळालें, यामुळें धंद्यास तेजी येऊन त्यांत नवे लोक शिरले. यास्तव जेव्हां व्यापारास मंदी असते, आणि कारखानदार माल कमी तयार करण्यास पाहत असतात, तेव्हां रोजगार मागणारे लोक फार असतात. अशी स्थिति होते तेव्हां वेतन कमी झालेंच पाहिजे यांत संशय नाहीं. कामकरी वेतन कमी झाल्यामुळें जर कुरकुर करतील, व कमी वेतन घेऊन काम करण्याचें नाकारतील, तर साधारण रीतीचा नफा

पडत नसल्यास गिरण्या बंद करण्यांत कारखानदाराचें हित आहे; असें झालें ह्मणजे हजारों मजुरांस मुळींच रिकामें रहावें लागेल. भारी किंमतीचा वेतनावर जो परिणाम होतो, तो थोडावेळ टिकणारा असतो, हें उघड करून दाखविण्यास घेतलेलें उदाहरण कदाचित् परमावधीचें असेल. परंतु जेथें जेथें कामकरी लोकांत चढाओढ फार असते, तेथें तेथें असाधारणपणें वेनत वाढल्यास श्रमाचा पुरवठा लागलाच होतो, व वेतन पूर्व स्थितीवर येऊं लागतें. मागें एका खंडांत अपेक्षा व पुरवठा यांची उपपत्ति सांगितली आहे, तिचें हें एक उदाहरण आहे. जेव्हां श्रमाची अपेक्षा पुरवठ्याहून अधिक असते, तेव्हां श्रमाची किंमत वाढून अपेक्षा व पुरवठा हीं सारखीं होतात. वेतन भारी झालें ह्मणजे श्रमाचा पुरवठा अधिक होऊं लागतो, आणि शेवटीं वेतन कमी होऊन त्यांचें साम्य होतें. भारी किंमतीचा वेतनावर परिणाम कसा होतो, या संबंधानें दगडी कोळशाच्या व्यापारांतील एक उदाहरण घेऊं. सन १८७२–७५ वर्षांत कोळशांची किंमत वाढून खाणींत काम करणाऱ्या मजुरांचें वेतनही वाढलें. ह्यावेळीं खाणींतील मजुरांचा फार फायदा झाला; जणु काय त्या व्यापाराचा त्यांस मक्ताच दिला होता असे ते दर सांगूं लागले. धंद्याबाहेरील लोकांस कामाची माहिती नसल्यामुळें चढाओढ करून वेतन कमी करणें कठिण होतें; त्यांना हा फायदा होता ह्मणून त्यांनीं दरआठवड्यास एका मनुष्यानें अमुकच काम करावें असें ठरवून कोळशांचा पुरवठा नियमित ठेवून किंमत उतरूं दिली नाहीं. अशा रीतीनें त्यांनीं मिळालेल्या संधीचा फायदा चांगला करून घेतला.

**जेथें चढाओढ पुष्कळ चालते, तेथें व्यापारास मंदी आल्यामुळें वेतनावर जो परिणाम होतो, तो फार वेळ टिकणारा नसतो.** वेतन जेव्हां सरासरीहून कमी असतें, व व्यापारास मंदी असते, तेव्हां याच गोष्टी वेतन आणि नफा यांस पूर्व स्थितीवर आणण्यास कारण होतात. कारखानदार आपल्यास तोटा करून माल तयार करणार नाहींत, व हुशार कारागीर, दुसरीकडे वेतन मिळवितां येईल, त्याहून कमी घेऊन त्याच धंद्यांत खपत राहणार नाहींत. ह्मणून मंदी आलेल्या धंद्यांत भांडवल व श्रम यांचा पुरवठा कमी होतो; माल कमी तयार झाल्यामुळें किंमती चढतात, आणि वेतन पूर्वींच्या थरावर येऊन बसतें.

**लोकांस धर्मार्थ साह्य करणें तें अर्थशास्त्राच्या नियमांविरुद्ध न करितां त्या शास्त्राचे नियम पूर्ण अमलांत यावे अशा रीतीनें करावें.** असें वारंवार घडतें कीं, जेव्हां एखाद्या धंद्यास मंदी येऊन त्यांत नफा व वेतन हीं थोडीं मिळूं लागतात, तेव्हां कांहीं काल मजूर लोकांस मोठें दुःख सोसावें लागतें, कारण पुष्कळ लोकांस घरीं स्वस्थ बसण्याची पाळी येते. जेथें चढाओढ फार असते, व ती बंद करण्याचा प्रयत्न सुरू नसतो, तेथें अशा प्रसंगीं पुष्कळ कामकरी लोक दुसऱ्या धंद्यांत रोजगार पाहतात, व बहुधा दुसऱ्या स्थळीं जातात; अशा रीतीनें खासगी किंवा सरकारी धर्मादायाचें कारण न लागतां त्यांच्या दुःखाचें निवारण होतें. परंतु खासगी दानधर्म, व गरीब लोकांस मदत करण्याकरितां केलेल्या सरकारी व्यवस्था यांच्या योगानें मजुरास असें उत्तेजन मिळतें कीं, आपण दुसऱ्या कामांत शिरूं नये, व जेथें व्यापारास मंदी आली आहे त्याच जाग्यांत राहवें, दुसऱ्या ठिकाणीं जाऊन नवीन कामाच्या शोधास

लागूं नये. अशा मदतीमुळें बेथनलग्रीन येथील हातानें कापड विणणारे साळी यांनीं पुष्कळ वर्षे गिरण्यांशीं व्यर्थ टक्कर सुरू ठेविली, व वेतन उतरल्यामुळें फार हाल भोगले. त्या गरीब लोकांस साहाय्य करण्याचा उत्तम मार्ग हा होता कीं, तुमच्या धंद्यांत जी उलाढाल झाली ही आतां चिरकाळ राहणारी आहे, अशी त्यांची समजूत घालावयाची होती. अशा रीतीनें त्यांचें मन वळवून मग मदत करणें ती त्यांना नवीन धंदा शिकण्यास, किंवा स्थलांतर करण्यास येण्यासाठीं करावयाची होती.

याचप्रमाणें ऐर्लंदाच्या पश्चिम भागांतील कुणब्यांस उत्तम प्रकारची मदत करणें ह्मणजे, ते आहेत त्याच ठिकाणीं त्यांचा जीव जगेल इतके बटाटे व पीठ त्यांना पोंचविणें ही नव्हे, तर श्रम सफळ होतील अशा सुपीक जमिनीकडे जाण्यास त्यांना साह्य करणें होय.

मजुरांस चढाओढ करण्यास पूर्ण मोकळीक असली ह्मणजे, फार वाढलेले रोजमुरे उतरूं लागतात, व ते फार कमी असले ह्मणजे वाढूं लागतात. मालाचा भाव ठरण्यास चढाओढ कारण होते, परंतु भिन्नस्थलांच्या मजुरीचा भाव सारखा करण्यांत चढाओढीचा व्यापार फार हळू चालतो. उदाहरणार्थ लंडन शहरांत व इंग्लंडांतील दूरच्या प्रांतांत धान्याच्या किंमतींत ते नेण्याच्या खर्चाहून अधिक फरक कधीं पडावयाचा नाहीं. चढाओढीचा जोर श्रमाच्या किंमतीवर इतक्या जलदीनें बसत नाहीं. मजुरास जरी माहित असलें कीं, दुसऱ्या गांवीं गेल्यास आपणास दरआठवड्यास दोन शिलिंग अधिक वेतन मिळेल, तरी त्यास असा विचार करावयाचा असतो कीं, आपण, आपलें कुटुंब व सामानसुमान हीं सर्व नेण्याचा खर्च भागेल कीं

नाहीं. आणखी असें कीं सर्व आयुष्य ज्या ठिकाणीं घालविलें ती जागा व लहानपणचे मित्र एकाएकीं सोडवत नाहींत.

**शेतांत खपणाऱ्या मजुरांमध्यें, कालपर्यंत, चढाओढ चालू नव्हती.** वर सांगितलेले विचार शेतकऱ्याच्या मनांत फार प्रबल होते. तें कोठें नुकतेच बदलत आहेत. त्यांपैकीं बहुतेक लोक साधेभोळे असून त्यांनीं आपलें गांव सोडून परकें ठिकाण कधीं पाहिलें नव्हतें. साधारण माहितीच्या गृहस्थास आफ्रिकेंतील मध्यभाग ज्याप्रमाणें वाटतो, तसा त्यांना पन्नास कोसांवरचा गांव दुर्गम व गैरमाहितीचा असा वाटे. यास्तव जिनसाच्या किंमतीपेक्षां श्रमाच्या किंमतीवर चढाओढीची क्रिया कमी असते, ह्मणून पुष्कळ खेड्यापाड्यांत तिचा कांहींच परिणाम दृष्टिगोचर नव्हता. मागें सांगितल्याप्रमाणें ही वस्तुस्थिति बदलत चालली आहे. स्वस्त आगगाड्या व स्वस्त पत्रें पोंचविणारी डांक यांच्या योगानें इंग्लंडांतील सर्व ठिकाणें जवळ झालीं आहेत, आणि इतर धंदेवाल्यांप्रमाणें शेतखपे लोक कमी वेतनाचीं ठिकाणें सोडून अधिक वेतन मिळेल तिकडे जात आहेत.

शेतखप्यांनीं कित्येकवेळां संप केल्याचा परिणाम असा झाला आहे कीं, त्यांच्यांत स्थलांतर व देशांतर करण्याचा प्रघात वाढला. ज्यास्त वेतनाकरितां चळवळ सर्व देशभर पसरेल यांत संशय नाहीं, व आपली स्थिति सुधारण्यास कांहीं मार्ग आहे, असें शेतकऱ्यांस वाटूं लागलें ह्मणजे ते स्थलांतर व देशान्तर स्वाभाविकपणें अधिक करूं लागतील.

**भिन्न रोजगारांत भिन्न वेतन मिळण्याचीं आडमस्मिथनें दिलेलीं पांच कारणें.** श्रमकरणारांच्या सर्व वर्गांत जर सारखी चढाओढ सुरू असेल, तर एकाच प्रकारच्या का-

मास भिन्न ठिकाणीं अधिकउणें वेतन राहणार नाहीं. परंतु रोजगारांत वेतनाचा कमज्यास्तपणा कायम सारखा असतो. निरनिराळ्या धंद्यांत निरनिराळे रोजमुरे असण्याचीं पांच कारणें आडमस्मिथनें सांगितलीं आहेत तीं:—

१ लें. स्वतः धंद्याचा बरेवाईटपणा.

२ रें. तो शिकण्याचा सुलभपणा आणि स्वस्तपणा किंवा कठिणपणा आणि खर्च.

३ रें. धंद्याची शाश्वती किंवा अनियमितपणा.

४ थें. धंदा करणाऱ्यांचा विश्वासूपणा.

५ वें. धंद्यांत यश मिळण्याचा संभव किंवा असंभव.

वरील पांच कारणांत आणखी एक कारण मिळविलें पाहिजे तें हें कीं, श्रम करणाऱ्यांच्या वर्गांच्या ज्या खालच्या वरच्या पायऱ्या असतात, त्यांत एका पायरीवर जन्मलेल्या मनुष्यांस बहुधा दुसऱ्या पायरीच्या धंद्यांत शिरण्याची सोय नसते, ह्मणून त्यांला आपल्या बरोबरीच्या वर्गांतच धंदा शोधावा लागतो. उदाहरणार्थ शेतांत कष्ट करणाऱ्या मजुराच्या मुलास मुत्सद्याचा किंवा धर्माध्यक्षाचा धंदा पसंत करणें अथवा तो पेढीवाल्याचा कारकून होणेंसुद्धां दुर्घट आहे.

धंद्याच्या बरेवाईटपणापासून मजुराचें वेतन कसें कमजास्त होतें, हें खाणीच्या उद्योगांत स्पष्ट दिसून येतें. जमिनीच्या पृष्ठभागाखालीं काम करणाऱ्या लोकांस अधिक वेतन मिळतें, तसें धातूची माती फोडणें, गाळणें, किंवा धुणें, वगैरे जमिनीवर कामें करणारांस मिळत नाहीं, कारण हीं कामें अधिक सुखदायक असतात. फार धोक्याच्या किंवा शरीरास इजा होणाऱ्या धंद्यांत मजूर लोक कदापि शिरणार नाहींत. पण त्यांच्या जोखमाबद्दल त्यांस वेतन अधिक मिळाल्यास ते त्या

धंद्यांत शिरतील. खाणींत खपणाऱ्या मजुरांचें वेतन त्यांच्या शेजारच्या दुसरा रोजगार करणाऱ्या मजुरांहून इतकें अधिक असतें कीं, विलक्षण धोक्याच्या धंद्यांत आपले प्राण घालण्यास त्यांनीं राजी व्हावें. इतर गोष्टी सारख्या आहेत असें मानल्यास जितक्या अधिक धोक्याची खाण तितकें वेतन अधिक असतें.

धंद्याच्या बरेवाईटपणांत तो लोकांत जसा प्रतिष्ठित किंवा निंद्य मानला जात असेल त्याचाही समावेश होतो. लष्करी कामगार किंवा पाद्री लोक यांचें वेतन त्यांच्या चाकरीच्या मानानें बहुधा फारच कमी असतें. परंतु पुष्कळ लोक धर्मखात्यांत किंवा लष्करांत शिरतात, त्याचें कारण असें कीं, हे धंदे करणाऱ्या लोकांची प्रतिष्ठा मोठी असते. त्यांच्या जाग्याची मोठी प्रतिष्ठा हीच त्यांच्या कमी वेतनाची भरपाई होय. तसेंच दुसऱ्यापक्षीं लोकांत ज्यापासून तिरस्कार व अप्रीति उत्पन्न होते, असा धंदा करण्याची भरपाई जास्त वेतनानें होते. कोणीही खुषीनें मांगाचें काम पत्करणार नाहीं; परंतु त्यांत बराच मोठा पगार मिळतोसें दिसल्यास त्याचें मन वळेल. श्रीमंत लोक आपल्या कारकुनापेक्षां आचाऱ्यास ज्यास्त पगार देतात असें केव्हां केव्हां आढळतें. याचें कारण कांहीं अंशीं असें समजलें पाहिजे कीं, कारकुनीच्या धंद्यांत जितकी प्रतिष्ठा मानतात, तितकी आचाऱ्याच्या धंद्यांत मानीत नाहींत, आचाऱ्याचा धंदा उलटा कमी अब्रूचा मानतात.

आडमस्मिथनें जीं कारणें काढलीं आहेत त्यांपैकीं बहुधा दुसऱ्या कारणामुळेंच आचाऱ्याला पगार जास्त मिळतो हें उघड आहे. कोणताही धंदा शिकण्याचे कामीं जे कमीजास्त श्रम पडतात किंवा अधिकउणा खर्च लागतो, त्यामा-

नावरच जर वेतनाचा दर अवलंबून असतो, तर कारकुनापेक्षां आचाऱ्याला जास्त वेतन मिळणें अयोग्य नाहीं. साधारण प्रतीचें शिक्षण मिळालेला गृहस्थ केव्हांही कारकुनाचें काम करील. परंतु उत्तम स्वयंपाक करतां येण्यास पांच वर्षांहून कमी पुरणार नाहींत व प्रायः स्वयंपाकाची कला पूर्ण अवगत करून घेण्यास त्यास जन्मभर खटपट केली पाहिजे. सोयर सारख्या गृहस्थाचें काम कारकुनाच्या कामाशीं ताडून पाहिलें तर पहिलें काम चोख होण्यास केवढी योग्यता पाहिजे ! परंतु कारकुनीच्या कामांत निपुण होणें फार सुलभ असून थोड्या खर्चाचें आहे.

पुष्कळ धंदे असे आहेत कीं, त्यांत निपुणता येण्यास फार दिवस खपलें पाहिजे; आणि कांहीं असेही आहेत कीं, ते वहिवाटलेल्या मनुष्यांप्रमाणेंच नवख्या माणसास ही करितां येतात. या तफावतीवरून त्यामानानें वेतनाच्या दरांत तफावत पडते. जहाज चालविणारा किंवा कांच फुंकणारा यांच्या धंद्यास लागणारें कसब मिळविण्यास कित्येक वर्षें घालवावीं लागतात. धंदा शिकण्याची मुदत लांब असल्यास निम्मी मुदत संपेपर्यंत त्यांस कांहींच मिळत नाहीं, ह्मणून धंदा शिकण्यास त्यांस बराच खर्च येतो. या खर्चाबद्दल व त्यांत निपुणता मिळविण्यास ज्या अडचणी सोसाव्या लागतात, त्याबद्दल त्यास ज्यास्त वेतन पुढें मिळतें, तसें ज्या कारागिरास त्रास किंवा खर्च पडला नाहीं त्यास मिळत नाहीं. झाडूच्या किंवा नकला काढणाऱ्या कारकुनाच्या धंद्यांत तयार होणें सुलभ असून खर्चाचें नाहीं. झाडूनें फक्त एक केरसुणी घेतली ह्मणजे झालें, व कारकुनानें लिहिण्या वाचण्याचें ज्ञान करून घेतलें ह्मणजे झालें. यास्तव कसबी शिल्प्यापेक्षां ह्या धंद्यांत रोजमुरे फार

कमी असतात. जे धंदे पूर्ण अवगत करून घेण्यास पुष्कळ सराव व स्वाभाविक देणगी लागते त्यांचें वेतन ठरविण्यांत दुःसाध्यपणाचा भाग फार महत्त्वाचा असतो. उत्तम गाणाऱ्या स्त्रिया पुष्कळ द्रव्य मिळवितात, याचें कारण गायन कलेंत प्रवीण होण्यास खर्च फार लागतो हें नव्हे. मध्यम प्रकारच्या गाणारणीनें गायन शिकण्यांत तितकेच श्रम व तितकाच खर्च केला असेल. परंतु उत्तम गाणारणींस पुष्कळ पैसा मिळण्याचें कारण असें कीं, त्यांना ती एक प्रकारची स्वाभाविक देणगी असते. उत्तम प्रकारच्या गायनाची सर्वत्र अपेक्षा असते, ती त्यांच्या खेरीज दुसऱ्या कोणाकडून तृप्त होत नाहीं. हीच गोष्ट कांहीं उत्कृष्ट प्रकारच्या हस्तकौशल्याचे कामास लागू आहे; उदाहरणार्थ घड्याळें करण्याच्या कामांतील कांहीं नाजुक भाग थोड्यांसच साधतात.

धंद्यांतील वेतनाचा दर त्याच्या शाश्वतीवर किंवा अशाश्वतीवर अवलंबून असतो. ज्या धंद्यांत सरासरीनें वर्षांतून नऊ महिनेच काम असतें, त्यांत ज्यास्त वेतन मिळाल्या खेरीज कोणी शिरणार नाहीं. सातूंचें उंबलें करण्याचें काम उष्ण हवेंत चालत नाहीं; पुष्कळ बांधकामें बरसातींत बंद असतात; गोद्यांमध्यें काम करणाऱ्या मजुरांस वारंवार घरीं बसावें लागतें. ह्मणून उंबलें करणारे, गंवडी, आणि गोद्यांतील मजूर यांचें काम एकसारखें चालत असतें तर त्यांस जी मजुरी मिळती त्याहून अधिक द्यावी लागते.

कामकऱ्यावर ज्यामानानें कमज्यास्त भरंवसा टाकावा लागतो, त्यामानानें त्याच्या वेतनांत फरक पडतो. प्रामाणिकपणाची आवश्यकता जितकी अधिक तितकें वेतन अधिक असतें. पेढीवाले, पगार वांटणारे, जवाहिऱ्यांचे मदतनीस, एंजिन चाल-

विणारे, रेल्वे रक्षक, पोलीस अंमलदार व पोष्ट खात्यांतील लोक यांची वर्तणूक अशी असली पाहिजे कीं त्यांच्यावर बिनधोक विश्वास टाकण्यास हरकत नाहीं. संथपणा व प्रामाणिकपणा या संबंधानें वरिष्ठांची खात्री होईपर्यंत अशा जाग्यावर नव्या लोकांची नेमणूक करीत नाहींत. आपण विश्वासू आहोंत, अशी त्यांनीं खात्री करून दिली ह्मणजे त्यांच्या जाग्याच्या जबाबदारीचा मोबदला ह्मणून त्यांस ज्यास्त वेतन मिळणें वाजवी आहे.

बहुतेक धंद्यांत शिकणारास खचीत यश येतें; कोणी शेतकऱ्याचा किंवा शिंप्याचा धंदा पत्करल्यास त्यांत त्याला यश येईल किंवा नाहीं असा संशय नसतो. असा संशय उंचप्रकारच्या धंद्यांत असतो; परंतु अशीं कांहीं कामें आहेत कीं, त्यांचें वेतन त्यांत यश येण्याचा संभव किंवा असंभव यावर अवलंबून असतें. ज्या मनुष्यास देशांतर करावयाचें आहे, त्यास परक्या ठिकाणीं जाऊन नवीन मार्ग स्वीकारण्यांत कसें यश येईल याची मोठी धास्ती असते. त्याठिकाणीं त्यास काम मिळेल किंवा नाहीं याची शंका असते, परंतु त्याची एवढी खात्री असते कीं, स्वदेशीं आपणास जितकें वेतन मिळतें त्याहून, काम मिळाल्यास तेथें अधिक मिळेल.

निरनिराळ्या धंद्यांत निरनिराळें वेतन मिळण्याचीं जीं पांच कारणें आडमस्मिथनें दिलीं आहेत, त्यांचें कार्य अशारीतीनें होतें कीं निरनिराळ्या धंद्यांत त्यांच्या योगें चढाओढ मर्यादित होते. उदाहरणार्थ धंदा त्रासदायक असला ह्मणजे त्यांत शिरणारे लोक कमी असतात; धंदा मनस्वी दुःखद असला तर वेतन कितीही मोठें असलें तरी तो करण्यास फारच थोडे लोक तयार होतील; ह्या थोड्या लोकांस स्वाभाविक मक्ताच मिळाला असें मानतां येईल; पुन्हा मांगाचें उदाहरण येथें लागू पडतें. त-

सेंच धंदा शिकण्यास कठीण, किंवा खर्चाचा असल्यामुळें जें अधिक वेतन मिळावयाचें तें केवळ त्यांत शिकणाऱ्या लोकांची संख्या कमी असते एवढ्यामुळेंच होय. ह्मणून शिक्षणाचा प्रसार जसजसा होईल तसतसें कारकुनाचें वेतन उतरेल; कारण जोंवर लिहिण्या वाचण्याचें ज्ञान थोड्या लोकांस होतें, तोंपर्यंत त्यांचें वेतन भारी होतें; परंतु विद्याप्रसार चोहोंकडे झाला ह्मणजे हा त्यांचा फायदा बुडेल. विश्वासूपणा व नेमस्तपणा यांचें असेंच आहे. जोंपर्यंत हे गुण दुर्मिळ आहेत तोंपर्यंत ते ज्यालोकांत आहेत त्यांचें वेतन अधिक राहील, हे गुण साधारण झाल्यास त्यांना भारी वेतन मिळणार नाहीं. भिन्न धंद्यांत भिन्न वेतन मिळण्याचीं आडमस्मिथनें दिलेलीं पांच कारणें बरोबर समजण्यास हे विचार लक्षांत ठेवणें अवश्य आहे; कारण धंद्याचा अमंगळपणा किंवा जोखीम यांच्या योगेंच वेतन अधिक मिळतें हें जर खरें असेल, तर भंगी, कोळशाच्या खाणींतला मजूर, एंजिनचालविणारा, कोळशेविक्या आणि हरकाम्या यांचें वेतन राजाचा प्रधान किंवा उत्तम कलावंतीण यांच्याहून अधिक असावें. निरनिराळ्या धंद्यांत कमज्यास्त वेतन मिळण्याचीं आडमस्मिथनें जीं पांच कारणें दाखविलीं आहेत, त्यांचें कार्य कसें घडतें. या गोष्टीचा विचार करतांना धंद्यास जीं कारणें लागू पडतात त्यामुळें त्यांत चढाओढ किती मर्यादित होते हें पाहिलें पाहिजे.

## २ ऱ्याभागावर प्रश्न. श्रमाचें वेतन.

१. वेतन ह्मणजे काय? वेतन मुख्यत्वेंकरून सांप्रदायानें किंवा चढाओढीनें ठरतें?

२. वेतनाचा साधारण दर कशावरून ठरतो?

३. ह्मणून कष्ट करणाऱ्या लोकांची स्थिति कोणत्या एकाच गोष्टीनें सुधरेल?

४. इंग्लंडांतील वेतनफंड कोणत्या कारणानें फार वाढला आहे ?

५. वेतनफंडाच्या या वृद्धीपासून मजुरांच्या स्थितींत त्या मानानें सुधारणा कां झाली नाहीं ?

६. धान्याचा कायदा रद्द केल्यापासून मजुरांच्या स्थितीवर मुख्य परिणाम काय झाला याचें वर्णन करा.

७. मालथसच्या लोकसंख्येवरील निबंधाचे मुख्य मुद्दे कोणते आहेत ?

८. लोकसंख्येस न वाढूं देणारीं कोणतीं कारणें त्यानें दाखविलीं आहेत ?

९. देशोन्नति जशी वाढत जाईल तसें यांपैकीं कोणतें कारण अधिक प्रबळ होतें ?

१०. लोकवृद्धीमुळें मजुरांची स्थिति कोणत्या दोनप्रकारांनीं खराब होते ?

११. लोकवृद्धि अधिक न होण्यास देशांतर हा उपाय अपुरा कसा ?

१२. नफ्याच्या सरासरी दराचा परिणाम वेतनफंडावर कसा होतो त्याचें वर्णन करा.

१३. धन्यास सरासरीहून कमी नफा पडत असल्यास रोजमुरे वाढण्यांत मजुरांचें एकंदरींत हित आहे काय ?

१४. श्रमाचा फलद्रूपपणा वाढल्यास वेतनफंडावर कोणता परिणाम घडतो ?

१५. श्रमाच्या किंमतींत फेरफार होतो काय ?

१६. भारी किंमतीच्या योगानें रोजमुरे भारी होतात काय ? उदाहरणें द्या.

१७. चढाओढ, फार कमी रोजमुरे वाढविते, व अतिशय जास्त रोजमुरे कमी करते, हें कसें तें स्पष्ट करून दाखवा.

१८. जिनसांच्या किंमतीपेक्षां श्रमाच्या वेतनावर चढाओढीचा व्यापार फार हळू कां घडतो ?

१९. श्रम करणारांच्या निरनिराळ्या वर्गांत चढाओढ मर्यादित कशी होते तें दाखवा.

२०. चढाओढीनें शेतांत खपणाऱ्या मजुरांची स्थिति बरी झाली आहे काय ?

२१. आडमस्मिथनें सांगितलेलीं जीं पांच कारणें भिन्न धंद्यांतील रोजमुऱ्यांचे दर भिन्न करतात तीं सांगा.

२२. ह्या पांच कारणांचा वेतनावर कसा परिणाम होतो त्याचीं उदाहरणें द्या.

२३. भिन्न धंद्यांत वेतनाचा दर भिन्न असण्याचीं पांच कारणें आडमस्मिथनें दिलीं आहेत, या कारणांच्या मुळाशीं कोणतें एक तत्त्व प्रधान आहे ?

---

१. डेलीन्यूज नांवाच्या पत्रांत सन १८७१ सालीं जुलै महिन्याच्या एका अंकांत लिहिलें होतें कीं:—"या वर्षीच्या खानेसुमारीच्या संबंधाचा अधिकाऱ्यानें जो पहिला रिपोर्ट केला आहे, त्यावरून राष्ट्राची वृद्धि व भरभराट हीं चांगलीं दिसून येतात. लोकसंख्या अदमासाच्या बाहेर वाढली आहे. गेल्या एप्रिल महिन्यांत इंग्लंद व वेल्स देशांत दहावर्षांमागच्यापेक्षां २८३७८८४ लोक अधिक भरले. इंग्लंडच्या इतिहासांत दहावर्षांत इतकी वृद्धि कधीं झालेली आढळांत नाहीं." वरील लेखावर टीका करा व हें ध्यानांत असूं द्या कीं, वर दर्शविलेल्या काळांत लंडन शहरांत भीक घालण्याचा खर्च शेंकडा १३०

वाढला; आणि सन १८६६ व ६९ यांचे दरम्यान इंग्लंद व वेल्स देशांत मिळून अन्नवस्त्र देऊन पोसलेल्या भिकाऱ्यांचा खर्च शेंकडा १७ वाढला व कोरडी भीक घालण्याचा खर्च शेंकडा १०½ प्रमाणें वाढला.

२. जो धंदा मोडकळीस येतो, त्यांतील मजुरांनीं धर्मादायावर निर्वाह करणें हितावह होईल, किंवा जेथें त्यांच्या श्रमाची अपेक्षा असेल, अशा ठिकाणीं स्थलांतर करण्यास त्यांस मदत मिळाली तर तें हितावह होईल ?

३. सन १८७० सालीं नवंबर महिन्यांत एका प्रत्याहिक पत्रांत हा मजकूर होता. "दगडी कोळसे व लोखंड यांच्या व्यापारास आलेली मंदी जाऊन तेजी येऊं लागल्यामुळें, या धंद्यांतले लोक पूर्वक्रमास अनुसरून पुन्हा मुली देऊन घेऊन लग्नें लावूं लागले आहेत" याचा परिणाम कोळसे व लोखंड या जिनसांच्या व्यापारांत गुंतलेल्या मजुरांवर काय होईल ?

४. एक पक्षी पिंजऱ्यांत चांगला राहतो, ह्मणून त्यांत वीस पक्षी सुखानें राहतील असें ह्मणणें सयुक्तिक होईल काय ?

५. विलायतेस घरीं मुलींस शिकविण्याकरितां स्त्रीशिक्षक ठेवतात त्यांचें वेतन पुरुष शिक्षकांपेक्षां कमी कां असतें, याचीं जीं कारणें गेल्या भागांतील प्रतिपादनावरून तुह्मास सुचतील तीं द्या.

---

## भाग ३.

### भांडवलाचा नफा.

**धन उत्पन्न करण्यांत भांडवल साह्य करतें त्याचें जें बक्षीस तो नफा होय.** मागें एका खंडांत भांडवलाची व्याख्या अशी केली आहे कीं, जें धन नवीन धनोत्पादनास

साह्य करण्यासाठीं राखून ठेविलेलें असतें त्यास भाडवल ह्मणावें. ह्मणून भांडवल हें संग्रहाचें फळ होय; परंतु त्यापासून कार्य होण्यास तें अंशतः किंवा सबंध खर्चिलें पाहिजे. धनाचे मालक नवीन उत्पादनाकरितां त्याचा व्यय करूं देणार नाहींत हें उघड आहे, परंतु उत्पन्नाचा वांटा त्यांस देऊं केल्यास ते कबूल होतील. या वांट्यास नफा ह्मणतात. धनोत्पत्तीस साह्य केल्याबद्दल भांडवलास बक्षीस देणें अन्यायाचें आहे असें कांहीं लोकांस वाटतें. सावकार ह्मणजे लोकांच्या माना मुरगळणारे असे त्यांना वाटतात, व त्यांना जें व्याज मिळतें तें लोकांपासून चोरी करून घेतल्यासारखें त्यांस वाटतें. असे समज फ्रान्स देशांत एका वेळीं फार प्रबळ होते; त्यांचा वेडेपणा बास्तियात साहेबानें लहान लहान पुस्तकें लिहून उघड केला आहे; त्यांत त्यानें पुष्कळ उदाहरणें देऊन, भांडवलाच्या नफ्याचें खरें स्वरूप स्पष्ट करून दाखवून असें सिद्ध केलें आहे कीं, नफा घेणें फायदेशीर आहे, व तो चिरकाल कां रहावा हेंही समजावून दिलें आहे. त्याचें एक उदाहरण संक्षिप्तरीतीनें पुढें दिलें आहे. पूर्वी एका खेड्यांत एक गरीब सुतार रहात होता, तो रात्रंदिवस खपत असे. एकेदिवशीं जेम्स आपल्याशीं विचार करूं लागला कीं, "माझी तासणी, करवत, आणि हातोडा यांच्या योगानें मी ज्या वस्तु तयार करतों, त्या अगदीं ओबडधोबड असतात, व त्यांस योग्य तें वेतन मला मिळतें. मला जर रंधा मिळाला तर गिऱ्हाइकांस मी ज्यास्त खुष करीन व ते मला अधिक द्रव्य देतील. बरें, कांहीं चिंता नाहीं, मी स्वतःच रंधा तयार करणार" दहा दिवस गेले नाहींत तों जेम्स याजपाशीं एक शानदार रंधा तयार झाला, व आपण तयार केला ह्मणून जेम्स याला तो अधिक मोलाचा वाटे. त्याचा उपयोग

केल्यापासून आपल्यास जो नफा होईल त्याचें चिंतन करीत असतां, शेजारच्या खेड्यांतून वुइलियम नांवाचा सुतार त्याजकडे आला. वुइलियमनें तो रंधा पाहून त्याची तारीफ केली, व त्याच्या उपयोगापासून जो फायदा होणार तो त्यास दिसूं लागला. तो जेम्सला ह्मणाला: 'तुह्मी माझें एक काम केलें पाहिजे; एक वर्षभर मला हा रंधा द्या.' जेम्स स्वाभाविकपणें बोलला. "वुइलियम असें कसें ह्मणतोस ? बरें. हें जर मीं तुझें काम केलें तर त्याबद्दली तूं माझें काय काम करशील ?"

वु० कांहीं नाहीं. उसनवार घेतलेल्या जिनसाबद्दल कांहीं देत नाहींत हें तुह्मास माहित नाहीं काय ?

जे० मला तें कांहीं माहित नाहीं; मला एक माहित आहे कीं, मीं तुला माझा रंधा उसनवार दिल्यास तो तुला दिल्याप्रमाणें होणार, पण खरेंच पुसशील तर तो तुला देण्याकरितां मीं केला नाहीं.

वु० बरें तर, तुह्मी माझें काम करा; त्याबद्दल मी तुमचें काय काम करूं ?

जे० अगोदर असें पहा कीं, एका वर्षांत रंधा कामांतून जाईल. ह्मणून तूं मला त्यासारखा एक नवा द्यावास.

वु० तें अगदीं वाजवी आहे. तुमचें ह्मणणें मला मान्य आहे. मला वाटतें एवढ्यानें तुह्मी खुषी आहांत, व तुमचें आणखी कांहीं बोलणें नसेल.

जे० माझें ह्मणणें निराळेंच आहे. मीं रंधा माझ्याकरतां केला, तुझ्याकरतां नाहीं. त्यापासून मला कांहीं फायदा व्हावा ह्मणून तो मीं केला. माझें काम चांगलें व्हावें व माझी स्थिति बरी व्हावी ह्मणून मीं तो केला; तूं एक वर्षानें तो मला परत केलास तर तितके दिवस त्याचा फायदा तुलाच होणार. मला

कांहीं तरी मिळाल्याखेरीज मीं तुझें काम कां करावें ? ह्मणून तुला जर रंधा पाहिजे असेल, तर मघां कबूल केल्याप्रमाणें तो परत द्यावयाचा तो देऊन माझा फायदा बुडाला त्याचा मोबदला ह्मणून तूं मला एक नवी फळी द्यावीस.

या अटी मान्य झाल्या, परंतु चमत्कार असा झाला कीं, वर्षानंतर जेव्हां रंधा जेम्सच्या ताब्यांत आला, तेव्हां त्यानें तो पुन्हा भाड्यानें लावला; पुन्हा घेतला व पुन्हा दिला असें चालविलें. हल्लीं तो त्याच्या मुलापाशीं आहे, तो अद्याप त्यावर भाडें मिळवितो. या लहान गोष्टीचें तात्पर्य काढूं. रंधा हा सर्व भांडवलाचें चिन्ह होय, व फळी हीं सर्व व्याजाचें चिन्ह होय. ह्मणून जिन्नस घेणारानें मालकास फळी देणें हें जर स्वाभाविक असून न्यायाचें मानलें, तर आपण असें अनुमान करावें कीं, भांडवलास व्याज यावें हें स्वाभाविक व न्यायाचें आहे. यापासून असेंही अनुमान निघतें कीं, व्याज देण्यांत उसनवार घेणाराचें नुकसान नाहीं. रंध्यासंबंधानें जेम्स व बुइलियम यांत जो करार झाला तो त्यांनीं आपखुषीनें केला. जिन्नस उसनवार नेणारास त्यांत फायदा वाटत होता ह्मणूनच तो त्या करारास कबूल झाला. त्याचा त्यांत फायदा आहे ह्मणून तो उसनवार घेतो.

भांडवलाच्या नफ्याचे तीन घटकावयव आहेत. कर्जाऊ रकम घेण्याकरितां ऋणको सावकारास जें व्याज देतो, तें भांडवलाच्या नफ्याचा एक अंश आहे. भांडवलाच्या नफ्याचे तीन भाग असतात. भांडवलाचें व्याज, जोखमाचा मोबदला, व देखरेखीचें वेतन. अमुक स्थळीं व अमुक काळीं व्याजाचा दर काय आहे हें पाहणें असल्यास त्याच स्थळीं व त्याच काळीं, ज्या कर्जास धोका नाहीं किंवा देखरेखीचे श्रम नाहींत त्याचें

व्याज काय आहे तें पहावें. इंग्लडांत सरकारी कर्जाची अशी स्थिति आहे. जे लोक सरकारास कर्ज देतात, त्यांना तें बुडण्याची भीति नसून त्या संबंधानें कांहीं दगदग नसते. सरकारास दिलेल्या कर्जावर शेंकडा ३ इतकें व्याज मिळतें, ह्मणून इंग्लंडांत व्याजाचा दर शेंकडा ३ असें ह्मणावें. त्या देशांत कांहीं कर्जावर जर याहून ज्यास्त व्याज दिलें, तर असें समजलें पाहिजे कीं, ऋणकोवर धनकोचा पूर्ण विश्वास नाहीं, ह्मणून जोखमाच्या मोबदल्याबद्दल अधिक व्याज द्यावें लागतें. भांडवलाचा नफा जर व्याजापेक्षां अधिक नसता तर धंद्यांत शिरण्याचें काम व जोखीम कोणींच पत्करलें नसतें. व्यापारांत पैसा घालण्यापासून जर शेंकडा ३ इतकाच नफा होता, तर व्यापाऱ्यांनीं व दुकानदारांनीं आपलें भांडवल धंद्यांतून काढून त्याऐवजीं सरकारी रोखे विकत घेतले असते. ज्या व्यवसायांत धोका मोठा असतो, व ज्यांत देखरेखीचा खर्च फार येतो, त्यांत नफा विशेष असतो. ह्या दोन गोष्टी जशा कमजास्त असतील तसा फायदा निरनिराळ्या धंद्यांत अधिकउणा मिळतो. उदाहरणार्थ कापड विकणाऱ्यापेक्षां खाटक्यास नफा अधिक मिळतो, कारण त्याचा देखरेखीचा श्रम त्रासदायक असतो, आणि त्याचा माल लवकर नासण्याचें जोखीमही त्यास विशेष असतें.

रानटी मुलखांत मालमत्तेचें रक्षण चांगलें होत नाहीं, ह्मणून तेथें भांडवलाच्या नफ्यांत धोक्याच्या मोबदल्याचा अंश विशेष असतो. एशिया खंडाच्या कांहीं भागांतील लोकस्थितीविषयीं बोलत असतां, मिल्लसाहेब ह्मणतो कीं ह्या भिकार अमलाखालीं जे कोणी कर्ज देतात, त्यांस तें परत येणार नाहीं अशी नेहमीं भीति असते, हिंदुस्थानांतील बहुतेक नेटीव

संस्थानांत पैसा सरकारास देणें झाला तरी त्याचें व्याज कमींत कमी इतकें असतें कीं, सावकारास कांहीं वर्षे नुसतें व्याज मिळालें ह्मणजे त्याची बरीच भरपाई व्हावी. जो मनुष्य आपली सर्व मालमत्ता उडवून कर्ज मागायास जातो, त्यानें फार मोठें व्याज देऊं केल्याखेरीज त्याला कोणी पैसा देणार नाहीं हें सर्वांस माहित आहे. सावकार लोक त्याजपाशीं शें-कडा ६० किंवा ७० पर्यंत व्याज मागतात, कारण त्यांना माहित असतें कीं आपला पैसा अगदींच बुडण्याची भीति आहे. पैसा जर परत आला तर त्यांचा नफा इतका मोठा असतो कीं वारंवार त्याचें जें नुकसान होत असतें तें भरून येतें. कांहीं वर्षांमागें वर्तमानपत्रांत केंब्रीज येथील एका विद्यार्थ्याची हकीकत छापली होती. शेंकडा ७५ प्रमाणें व्याज ठरवून त्यानें कर्ज काढलें होतें. विद्यार्थ्याच्या बापानें मुलाचें कर्ज फेडण्याचें नाकारलें. त्याची तक्रार अशी होती कीं, मुलगा कर्ज काढतेवेळीं वयांत नव्हता. ही तक्रार मान्य होऊन निवाडा बापासारखा झाला. परंतु सावकारास एका ठिकाणीं बूड लागली ह्मणून त्याचें विशेष नुकसान होत नाहीं, कारण वरील दरानें व्याज देणारे पुष्कळ तरुण गृहस्थ त्यास सांपडतात. सावकाराचा नफा बुडीच्या धोक्यानें वाढतो इतकेंच नसून त्याचा धंदा अब्रूचा नसल्यामुळें ही तो वाढतो; कारण अब्रूदार गृहस्थ अशा कामांत पडणार नाहींत, व ज्यांना स्वतः अब्रूची चाड असो किंवा नसो, परंतु ज्यांना लोकांत चांगलें ह्मणवून घेणें आहे तेही पडणार नाहींत.

एकाच देशीं व एकाच काळीं सर्व व्यापारांत व्याजाचा दर सारखाच असतो. जोखीम आणि बेअब्रू यांचा आणि देखरेखीच्या वेतनाचा मोबदला नफ्यांतून वजा केल्यास भांडवला-

वरचें निवळ व्याजच राहतें, हें व्याज त्याच देशीं व त्याच काळीं सर्व व्यापारांत एकसारखें असतें. शेतकरी, उदमी, आणि शिल्पी यांच्या भांडवलावरील व्याज एकास्थळीं व एकाच काळीं सारखें होऊं पाहतें. या लोकांच्या 'फायद्यांतील फरक; केवळ त्यांचें जोखीम, बेअब्रू व देखरेखीचें वेतन अशा संबंधाचा असतो. यास्तव निरनिराळ्या व्यापारांत नफा सारखा होतो हें खरें नव्हे; कारण कांहीं धंद्यांत जोखीम मोठें असून कायमचें असतें, व त्या जोखमाचा मोबदला मिळाला पाहिजे; कांहीं धंद्यांत देखरेखीचा भाग विशेष असतो; आणि विशिष्ट प्रकारच्या श्रमास अधिकउणें वेतन कसें मिळतें हें मागल्या भागांत सांगितलें आहे. ह्मणून वेगवेगळ्या धंद्यांत नफ्याच्या दरांत स्वाभाविक व कायमची तफावत नेहमीं राहिलीच पाहिजे. एकास्थळीं व एकाच वेळीं भांडवलाचें व्याज मात्र वेगवेगळ्या व्यापारांत सारखेंच असतें.

**धन आणि लोकसंख्या हीं वाढत गेलीं ह्मणजे व्याजाच्या दरांत ज्या कारणांमुळें उतार होतो त्यांचें स्पष्टीकरण.** धन आणि लोकसंख्या यांच्या वृद्धीनें व्याजाचा दर कसा उतरतो या कारणांचा आपण आतां विचार करूं. येथें रिकार्डोच्या साऱ्याच्या तत्त्वासंबंधानें एक मनोरंजक उदाहरण दिलें पाहिजे. श्रम आणि भांडवल यांस जें बक्षीस द्यावयाचें, तें शेवटीं त्यांच्या फलद्रूपपणावर अवलंबून असलें पाहिजे. ह्मणजे असें ह्मणावयाचें कीं, ज्या गोष्टीच्या योगानें तितकाच श्रम व तितकेंच भांडवल घालून अधिक उत्पन्न होतें, त्याच गोष्टीमुळें, इतर गोष्टी आहेत तशाच राहिल्या असें मानून, त्या मानानें वेतन आणि व्याज हीं वाढलीं पाहिजेत. दुसऱ्यापक्षीं ज्या गोष्टीमुळें विवक्षित श्रम आणि भां-

डवल यांपासून कमी उत्पन्न होतें, तीच गोष्ट वेतन व भांडवल यांची रक्कम कमी करते. जर कोणा मनुष्यास गव्हांच्या एका पोत्याचा खप असून, तो आपला श्रम व भांडवल यांच्या योगें दीड पोतें गहूं उत्पन्न करील तर त्यास शेंकडा ५० नफा पडला. पण त्यास जर कमपीक जमिनीची लागवड करणें भाग पडलें, व त्याचें उत्पन्न सव्वापोतें गहूं झाले तर स्वतःस एका पोत्याचा खप असल्यामुळें त्याचा फायदा शेंकडा २५ च झाला. लागवडीची मर्यादा जसजशी उतरते, ह्मणजे वाढलेल्या लोकसंख्येस अन्न पुरविण्याकरितां जसजशी कमपीक जमीन लागवडींत आणावी लागते, तसतशीं वेतन व नफा हीं कमी पडतात व सारे चढतात; कारण जमिनीचा सारा ह्मणजे जीस सारा येत नाहीं अशा निकृष्ट जमिनीपेक्षां हिचा जो अधिक उत्पादकपणा असतो तो. रिकार्डोच्या तत्वावरून असें दिसतें कीं, लोकसंख्या जशी वाढते तशी अन्नाची अपेक्षा वाढून कमपीक जमिनी, किंवा अडचणीच्या ठिकाणच्या जमिनी लागवडींत आणाव्या लागतात. ह्मणून पाहिजे तितकें अन्न उत्पन्न करण्यास खर्च अधिक लागतो; ह्मणजे दुसऱ्या शब्दांनीं असें ह्मणतां येईल कीं, विवक्षित श्रम व भांडवल घालून उत्पन्न कमी होतें, ह्मणून वेतन व व्याज हीं उतरतात.

**जमिनीचें उत्पन्न उत्तरोत्तर कमी होतें त्याविषयींचा नियम.** पूर्वी लागवडींत असलेल्या जमिनींतच अधिक अन्न उत्पन्न करणें झाल्यास असाच परिणाम होतो. शेती बरीच वाढली ह्मणजे, नवीन शास्त्रीय शोध कांहीं झाले नाहींत असें मानिलें तर, एका शेतांत पूर्वीपेक्षां श्रम व भांडवल हीं दुप्पट घालून दुप्पट पीक काढतां येत नाहीं; "हेंच दुसऱ्या शब्दांनीं असें ह्मणावयाचें कीं, अधिक पीक काढण्यास पूर्वीच्या प्रमाणाहून अधिक

श्रम व भांडवल हीं घालावीं लागतात." जमिनींत दर खेपेस जें भांडवल घालावें त्यावर कमीकमी उत्पन्न होत जातें. असें न होतें तर सर्व जगाची सांपत्तिक स्थिति बदलून जाती. एका राष्ट्रास पुरे इतकें उत्पन्न एका शेतांतून काढतां येतें तर प्रजावृद्धि अतिशय होऊन शेवटीं ती खुंटण्यास लोकांना उभें राहण्यास जाग्याची कमताई एवढेंच कारण राहातें.

नफा आणि रोजमुरे हे कां उतरूं लागतात, व जुन्या देशापेक्षां नवीन देशांत ते कां अधिक असतात, हें कमी होणाऱ्या उत्पादकपणाच्या नियमावरून कळून येईल.

हें असेंच आहे, हें पुढील उदाहरणावरून सिद्ध होईल. आस्ट्रेलियापेक्षां इंग्लंडांत वेतन आणि व्याज हीं बरीच कमी आहेत. इंग्लंडांत लागवडीची मर्यादा फार उतरली आहे; तेथें जमिनीची मशागत विशेष काळजीनें करितात, तशी आस्ट्रेलियांत करीत नाहींत. शेतींत तितकेंच भांडवल व तितकाच श्रम खर्चून इंग्लंडापेक्षां आस्ट्रेलियांत उत्पन्न जास्त येतें. ह्मणून इंग्लंडापेक्षां आस्ट्रेलियांत श्रम आणि भांडवल यांचें फल अधिक असतें. या गोष्टीवरून असें सिद्ध होतें कीं, श्रमाच्या वेतनावर नफा अवलंबून नसून त्याच्या फलद्रूपपणावर असतो, ह्मणजे श्रमाचें वेतन व त्याचा उत्पादकपणा याच्या प्रमाणावर तो अवलंबून असतो. आस्ट्रेलियांत इंग्लंडापेक्षां वेतन अधिक असतें. परंतु मजुरीचा खर्च कमी असतो, कारण इंग्लंडापेक्षां आस्ट्रेलियांत श्रम विशेष फलद्रूप होतो. इंग्लंडापेक्षां आस्ट्रेलियांत नफा पुष्कळ असून व्याजाचा दरही चढ आहे. या गोष्टीवरून आमच्या ह्मणण्याचा खरेपणा स्पष्ट होईल.

**भारी किंमती पुष्कळ नफ्याचें दर्शक नव्हत.** किंमती भारी असल्या ह्मणजे नफा नेहमीं पुष्कळच असतो असें

समजणें चुकीचें आहे. हें खरें आहे कीं एखाद्या जिनसाची अपेक्षा एकदम वाढल्यास कांहीं वेळ त्याची किंमत इतकी वाढते कीं, त्यांच्या उत्पादकास साधारण नफा व वेतन यांहून अधिक मिळतें. परंतु वारंवार सांगण्यांत आलें आहे कीं, भांडवल आणि श्रम यांच्या चढाओढीमुळें वेतन आणि नफा कमी होतात; जेथें चढाओढ पूर्ण असते तेथें किंमतीस सतत नियमित करणारें कारण मूळखर्च होय. गेल्या भागांत सांगितलें कीं, भारी किंमतीमुळें भारी वेतन होत नाहीं; चालू गोष्टीस तेंच कारण लागू आहे. उदाहरणार्थ सुती कापडाची किंमत घ्या. मूळखर्चाचे घटकावयव तीन आहेत:—श्रम, अभोग आणि जोखीम, वस्तूचा खर्च सरकारी करानेंही वाढूं शकेल. या घटकावयावांपैकीं कोणताही वाढल्यास मूळखर्च वाढेल, व यामुळें जिनसाची किंमत चढूं लागेल. उदाहरणार्थ नेहमींचा कापसाचा पुरवठा कांहीं कारणानें एकदम बंद होऊन कापूस पिकविण्याचा श्रम फार वाढला; किंवा कच्च्या मालावर किंवा तयार झालेल्या कापडावर अधिक कर बसला; तर या ठिकाणीं भांडवलाचा नफा न वाढतां किंमती चढतील; खरें ह्मटलें तर मूळ खर्चाच्या बाकीच्या घटकावयवांचा खर्च वाढल्यास भांडवलाचा नफा कमीच होऊं लागेल, ह्मणून भारी किंमती नफ्याचा दर कमी करतील. अमेरिकेंत लढाई सुरू असतां कच्चा कापूस पैदा करण्यास इतकी अडचण व खर्च पडत होता कीं त्यामुळें कापसाच्या मालाची किंमत मनस्वी वाढली; याचवेळीं कारखानदारांचें फार नुकसान झालें, आणि रोजमुरे इतके कमी झाले कीं कापसाच्या प्रसिद्ध दुष्काळास सुरवात झाली. भारी किंमतीमुळें नफा भारी होत नाहीं हें दुसऱ्या एका विचारावरून दिसून येईल. तें असें:—नफ्याचा दर हा एका प्रमाणाचा दर्शक

आहे, आणि प्रमाण एकाच पदावरून ठरत नाहीं, परंतु एका पदार्शी दुसऱ्याचा जो संबंध त्यावर तें अवलंबून असतें. वास्तविकपणें, मूळखर्चाचे जे इतर घटकावयव आहेत त्यांच्या खर्चावर व्याजाचा दर अवलंबून असतो, आणि ज्याअर्थी यापैकीं महत्वाचा घटकावयव श्रम होय, त्याअर्थी वर सांगितल्याप्रमाणें व्याजाचा दर मजुरीच्या खर्चावर अवलंबून असतो असें ह्मणणें बरोबर आहे. भांडवल आणि श्रम यांच्या साह्यानें जो जिन्नस तयार होतो, त्याच्या किंमतीमध्यें नफा आणि वेतन यांचा समावेश झाला पाहिजे असें मागें कित्येकवेळां सांगितलें आहे. ह्मणून श्रमास वेतनरूपानें या किंमतीचा अंश अधिक द्यावा लागल्यास भांडवलवाल्यास नफा कमी पडेल. भांडवल आणि श्रम यांच्या साह्यानें जें उत्पन्न होतें, त्याच्या मोलाचा अधिकउणा अंश जसा वेतनाकडे जाईल तसा भांडवलवाल्यास मजुरीचा खर्च पडतो.

**मजुरीचा खर्च कशावर अवलंबून असतो?** भांडवलवाल्यास मजुरीचा खर्च पडतो तो कशावर अवलंबून असतो हें येथें बरोबर ठरविणें इष्ट आहे. मिल्ल साहेब ह्मणतो कीं मजुरीचा खर्च नेहमीं फिरत असणाऱ्या अशा तीन गोष्टींवर अवलंबून असतो. याचा अर्थ असा कीं, भांडवलवाल्याच्या मजुरीच्या खर्चाशीं तीन गोष्टींचा संबंध असतो, व त्या तिन्हीही गोष्टी बदलणाऱ्या असतात. त्या गोष्टी येणेप्रमाणें.

१. श्रमाचा फलद्रूपपणा.

२. श्रमाचें वेतन (ह्मणजे श्रमाचें खरें फल).

३. श्रमाच्या खऱ्या फलांत जे पदार्थ येतात, ते उत्पन्न करावयास किंवा खरेदी करावयास, अधिकउणा येणारा खर्च.

श्रमाचा फलद्रूपपणा वाढून जर श्रमाचें वेतन व अवश्य

पदार्थांचा खर्च हीं फिरलीं नाहींत, तर भांडवलवाल्यास मजुरीचा खर्च कमी पडेल; श्रमाचा फलद्रूपपणा न वाढतां रोजमुरे वाढले, तर भांडवलवाल्याचा मजुरीचा खर्च वाढेल. मजुरांच्या खऱ्या बक्षिसांत ज्या पदार्थांचा समावेश होतो, त्यांस जर खर्च कमी पडूं लागला, व त्याच्या गरजा वाढल्या नाहींत तर वेतन कमी होऊन भांडवलवाल्यास मजुरीचा खर्च कमी पडेल.

विवक्षित श्रम व अभोग यांच्या योगानें उत्पन्न झालेल्या एकंदर धनाचा जो अंश श्रमास मिळतो त्यावर नफ्याचा दर अवलंबून असतो; आणि विचाराअंतीं असें आढळून येईल कीं, नफ्याच्या साधारण दरांत जो जो फरक होतो, तो वर सांगितलेल्या तीन गोष्टींपैकीं एक किंवा अधिक गोष्टींत फरक होऊनच झाला पाहिजे.

**एक उदाहरण.** आस्ट्रेलियासारख्या देशांत श्रमाचा फलद्रूपपणा मोठा असतो, कारण तेथें सुपीक जमीन विपूल आहे; व याच कारणामुळें निर्वाहास लागणारे अवश्य पदार्थ तेथें फार थोड्या खर्चानें मिळतात. नफ्याचा दर वाढण्यास व वेतन अधिक होण्यास या गोष्टी पुरे आहेत.

रोजमुरे वाढून जर धन्याचा नफा सरासरीपेक्षां कमी होत असेल तर त्यापासून कामकरी लोकांचें एकंदरींत हित नाहीं. मागच्या भागांत वेतन व नफा यांचा संबंध दाखवितांना सांगितलें आहे कीं, कोणत्याही विशिष्ट धंद्यांत वेतन वाढून कारखानदारास नफा नेहमींपेक्षां जर कमी होईल, तर त्या वाढीपासून मजुरांचें चिरकाळ हित होत नाहीं. परंतु कोणी असें ह्मणेल कीं, जर ग्रेटब्रिटन सारख्या राष्ट्रांतील सर्व मजुरांनीं एकत्र होऊन अधिक वेतन मागण्याचा कट केला, तर भांडवल व श्रम यांनीं उत्पन्न केलेल्या धनाचा अधिक अंश त्यांना मिळवितां येईल,

आणि देशांतील चालू नफ्याचा दर कमी होईल. अशा मागणीस सर्व प्रकारच्या मजुरांची पूर्ण एकी होण्यास असंख्य अडचणी आहेत. परंतु हें एकीकडे ठेवून कल्पना करूं कीं; अधिक वेतनाकरितां सर्व विलायतभर चोहोंकडे ओरड सुरू झाली, मागणें मान्य झालें, नफा कमी झाला, आणि व्याजाचा दर शेंकडा ३ होता तो २ झाला. व्याजाचा दर उतरला ह्मणजे दोन प्रकारांनीं भांडवल कमी होतें, आणि शेवटीं वेतनही कमी होतें. व्यापाराचा दर जसा अधिक तसें संचय करण्यास अधिक उत्तेजन असतें. व्याजाचा दर शेंकडा ३ चा २ झाला ह्मणजे पुष्कळ लोक भांडवलांत भर न घालतां आपलें धन चैनींत उडवितील. मनाचा संमय करून जो धनसंचय करावयाचा त्याचें फल केवळ १० पौंडांवर २ पौंडच आलें, तर संचय करावा असें वाटण्यास पुष्कळ लोकांस एवढें फल पुरें होणार नाहीं. ह्मणून भांडवलाचा पुरवठा कमी होईल. दुसऱ्यापक्षीं पुष्कळ लोक ह्मणूं लागतील कीं "आमच्या भांडवलावर शेंकडा २ व्याज येतें, एवढ्यांत आमचा निर्वाह होत नाहीं; ज्याअर्थी येथें आह्मांस याहून अधिक मिळत नाहीं, त्याअर्थीं आह्मी तें परदेशीं कोणत्यातरी उद्योगांत घालूं, हिंदुस्थानांत चहाची बाग करण्यांत, अमेरिकेंत आगगाडी बांधण्यांत, किंवा पेरू देशांतील खाणींच्या उद्योगांत घालूं." यामुळें पुष्कळ भांडवल बाहेर जातें, व संग्रहास उत्तेजन नसल्यामुळें नवीन जमत नाहीं. अशा गोष्टीनें देशांतील पुष्कळ भांडवल हळू हळू कमी होईल. एकंदर भांडवल व फिरतें भांडवल यांच्यामध्यें सर्वदा कांहीं प्रमाण असतें. मागें पहिल्या खंडांत सांगितलेंच आहे कीं, स्थिर भांडवल व फिरतें भांडवल असे भांडवलाचे दोन भाग आहेत. ह्मणून जर देशाचें भांडवल कमी झालें तर त्याचे हे दोन्ही भाग बहुधा कमी

होतील. फिरत्या भांडवलाचें मुख्य काम मजुरांचें पोषण करणें ह्मणजे श्रमाचें वेतन देणें होय. ह्मणून फिरत्या भांडवलाची कमताई झाली ह्मणजे श्रमाचें वेतन कमी झालें पाहिजे, तेव्हां असें दिसून येतें कीं, ज्या गोष्टीमुळें देशांत व्याजाचा दर कमी होतो, त्यामुळेंच भांडवल जमण्यास प्रतिबंध होतो, व भांडवल परदेशीं जाऊं लागतें. यामुळें देशाचें भांडवल कमी होऊन फिरतें भांडवल ही कमी पडतें, आणि रोजमुरे हलके होतात.

मजुरांनीं वेतन अधिक मागितल्यामुळें व्याजाचा दर जर बेताबाहेर उतरला, तर पुढें फिरतें भांडवल कमी झाल्यावर त्यांचे जे हाल होतील ते फार दुःसह होतील. कांहीं कालपर्यंत त्यांनीं जें अधिक वेतन मिळविलें त्यामुळें प्रजावृद्धि बरीच झाली असेल. ह्मणून जेव्हां वेतन उतरतें तेव्हां मजुर लोक शुद्धीवर येतात आणि त्यांना वाटतें कीं, आपली संख्या वाढली व निर्वाहाचें साधन कमी झालें. जशी दोहों आंगानें धार असलेली तरवार दोहोंकडून कापते तसें त्यांच्यावर दुर्दैव कोसळतें. लंडनच्या पूर्वभागांतील मजुर लोक कांहीं वर्षांमागें अशा दुहेरी दुःखावस्थेंत पडले होते. बहुतेक ठिकाणांपेक्षां लंडन शहरीं मजुरांस खर्च अधिक येतो; घरभाडें आणि सर्पण हीं महाग असतात, व जिनसांचे दरही फार जास्त असतात; ह्मणून लंडनांतील मजुरांचें वेतन ग्लासगोसारख्या ठिकाणांहून अधिक असणें अवश्य आहे. याचा परिणाम असा झाला आहे कीं, लंडनच्या पूर्व बाजूचा गलबतें बांधण्याचा जो मुख्य धंदा तो भांडवलवाल्यांस तोटा सोसून कांहीं काल चालवावा लागला; यास्तव त्या धंद्यानें हळू हळू ग्लासगोसारख्या बंदरांची वाट धरली, कारण लंडनपेक्षां तेथें मजुरीचा खर्च कमी येऊन गलबतास लागणारें सामान स्वस्त मिळतें. लंडनच्या मजुरांस

जेव्हां वेतन चढ मिळत होतें, तेव्हां त्यांची संख्या वाढली, आणि नंतर व्यापारास जेव्हां मंदी आली तेव्हां त्यांची विपत्ति दुणावली.

भांडवल परदेशीं पाठविल्यानें चढाओढीचा प्रदेश वाढतो. भांडवल परदेशीं पाठविण्याचा परिणाम नफ्यावर मुख्यत्वेंकरून असा होतो कीं, चढाओढीचें क्षेत्र वाढतें. मागें सांगितलें आहे कीं, कोणत्याही धंद्यांत विशेष फायदा होऊं लागला ह्मणजे दुसरे भांडवलवाले चढाओढ करून तो नफा पूर्वीच्या स्थितीवर आणतात. एकाच देशांत दोन धंद्यांसंबंधानें ही गोष्ट जर खरी आहे, तर ती दोन देशांसही लागू आहे, पण कांहीं कमी अंशानें आहे. चढाओढ देशादेशांत इतकी जोरानें चालत नसते, कारण पुष्कळ प्रसंगीं परदेशीं भांडवल पाठविण्यांत मोठें नुकसान व गैरसोय असते. पहा लंडनच्या दुकानदाराचा खर्च इतका भारी असेल असें मानतां येईल कीं देखरेखीचें वेतन व जोखमाचा मोबदला वजा केल्यास भांडवलावर व्याज कायतें शेंकडा २ च पडेल. आस्ट्रेलियामध्यें व्याजाचा दर शेंकडा १० आहे, हें त्यास चांगलें माहित असून त्याचा उपयोग काय? तेथें जाऊन राहून उद्योग सुरू करण्यास मोठ्या अडचणी असतात. त्या देशांत कोणत्या व्यापारांत भांडवल घातल्यास फायदा होईल याविषयीं खात्रीलायक माहिती मिळण्याची पंचाईत असते. त्याच्या प्रवासाची लांबी, देशांतर करण्याचा निश्चय केल्यास लागणारा खर्च व इतर किरकोळ गोष्टी, ह्या, त्याची स्वदेश सोडून जाण्याची व परदेशीं भांडवल घालण्याची इच्छा दाबून टाकण्यास पुरे होतात. इतके दिवस भांडवल बाहेर जाण्यास ज्या अडचणी येत त्या आतां कमी होत आल्या आहेत. ज्ञानाचा प्रसार जसा अधिक

होत जाईल, आणि दळणवळण व प्रवास करण्याचीं साधनें सुलभ होत जातील तसें भांडवल हळू हळू परदेशीं अधिक जाऊं लागेल. युरोप खंडांत पुष्कळ ठिकाणीं इंग्लिश लोकांनीं पदरचें भांडवल घालून कारखाने काढले आहेत. नाटिंघम शहरांतील पायमोजे विकणाऱ्या कंपनीची एक शाखा साक्सनींत आहे. त्यांचे इंग्लंडांतले मजूर ज्यास्त वेतन मागण्याकरितां जर संप करतील, व साक्सनीपेक्षां नाटिंघमच्या कारखान्यांत नफा कमी पडूं लागेल, तर ती कंपनी इंग्लंडांतील कारखाना बंद करून साक्सनींत अधिक पायमोजे काढूं लागेल यांत संशय नाहीं. ह्मणजे असें ह्मणावयाचें कीं, इंग्लंडाहून स्थिर व फिरतें भांडवल साक्सनीस जाईल. कारखानदारानें परदेशीं कारखाना घालावयाचा असा प्रकार शंभर वर्षांमागें पाहण्यांत नव्हता, परंतु तो हळू हळू फैलावेल असा संभव आहे. असें झालें ह्मणजे शेवटीं भिन्न देशांतील नफा एकसारखा होईल.

येथपर्यंत संपत्तीच्या वांटणीचे जे तीन प्रकार आहेत त्यांचें विवेचन झालें; तथापि व्यापाऱ्यांच्या श्रेणी, संप व तुटीचा व्यापार यांचा परिणाम वेतन व नफा यांच्यावर काय होतो, हें सांगितल्याखेरीज हें खंड समाप्त करतां येत नाहीं. या गोष्टी पुढील भागांत सांगितल्या आहेत.

### ३ ऱ्या भागावर प्रश्न. भांडवलाचा नफा.

१. भांडवलाच्या नफ्याचें खरें स्वरूप कोणतें ?

२. एक उदाहरण घेऊन दाखवा कीं नफा घेणें न्यायाचें आहे व तो सतत घेतला पाहिजे.

३. भांडवलाच्या नफ्यांत कोणत्या तीन गोष्टी असतात ?

४. भांडवलावरचें व्याज ह्मणजे काय आणि अमुक एका वेळीं कोणत्याही देशांतील व्याजाचा दर कशावरून समजावा ?

५. निरनिराळ्या धंद्यांत नफ्याचा दर कां बदलतो ?

६. मालमत्तेचें संरक्षण बरोबर नसल्यास नफ्यावर कसा परिणाम होतो तो सांगा.

७. एकाच देशीं एकाच काळीं व्याजाचा दर कमज्यास्त असतो काय ?

८. लोकवृद्धि अधिक होईल तसा व्याजाचा दर कां उतरतो ?

९. एक उदाहरण घेऊन दाखवा कीं लागवडीची मर्यादा उतरली ह्मणजे व्याजाचा दर कमी होतो.

१०. लोक केव्हां केव्हां असें बोलतात कीं, नफा रोजमुऱ्यांच्या दरावर अवलंबून असतो; असें ह्मणणें कां बरोबर नाहीं तें व्यक्त करून दाखवा, आणि तें बरोबर नसेल तर मग खरोखर नफा कशावर अवलंबून असतो तें सांगा.

११. भारी किंमती सर्व काळ व मोठ्या नफ्याचें दर्शक आहे काय ?

१२. किंमती चढल्या असून नफ्याचा दर केव्हां केव्हां उतरतो हें उदाहरण घेऊन स्पष्ट करा.

१३. भांडवलवाल्याचा मजुरीचा खर्च कोणत्या तीन चंचल गोष्टींवर अवलंबून असतो ?

१४. देशांत व्याजाचा दर उतरला तर राष्ट्राचें भांडवल कोणत्या दोन प्रकारांनीं कमी होऊं लागतें ?

१५. तें कमी होण्याचा परिणाम मजुरांच्या स्थितीवर काय घडतो ?

१६. ह्मणून भांडवल परदेशीं गेल्याचा परिणाम नफ्यावर काय होतो ?

१७. एकाच देशांत भिन्न धंद्यांत जशी चढाओढ असते, त्याहून तिची क्रिया भिन्न देशांत सावकाश कां असते ?

१८. भांडवल परदेशीं अधिक जाण्याचें चिन्ह कां दिसत आहे ?

१. सरकारी कर्जरोख्यावर व्यापार करणाऱ्यास जमीन लागवड करणाऱ्यापेक्षां अधिक नफा मिळतो असें कां होतें ?

२. व्याजबट्टा घेणें निर्दय आहे काय ? व्याजाचा दर ठरविण्याकरितां केलेल्या कायद्यापासून कांहीं हित झालें काय ?

३. इंग्लंडांतील भांडवल परदेशीं गेल्यानें त्या देशाच्या नफ्याच्या दरावर काय परिणाम होतो ?

४. कल्पना करा कीं, जगांतील सर्व मजूर लोकांनीं कट केला, व त्यांनीं आपलें वेतन इतकें वाढवून घेतलें कीं, भांडवलास नफा कांहींच उरला नाहीं; तर या गोष्टीचा परिणाम लोकसंख्येवर काय होईल, व एकंदर समाजाच्या सुखावरही काय होईल ?

५. नफ्याचा दर मोठा असला ह्मणजे केव्हां केव्हां तो देशाच्या चांगल्या स्थितीचा सूचक असतो, व केव्हां केव्हां त्याच्या उलटही स्थिति तो दर्शवितो. हें संयुक्त संस्थानें व मेक्सिको यांचें उदाहरण घेऊन व्यक्त करून दाखवा.

---

## भाग ४.

## व्यापारांच्या श्रेणी, संप आणि जुटीनें व्यापार करणाऱ्या मंडळ्या.

**व्यापाऱ्यांच्या श्रेणीचें काम.** एकाच धंद्यांत असलेल्या कारागिरांनीं जो कट केला असतो त्यास व्यापाऱ्यांची श्रेणी ह्मणतात. या मंडळीचें काम दोन प्रकारचें असतें; ह्मणजे कटांतील लोकांस अडचणीच्या प्रसंगीं मदत करणें, व कामकरी लोकांचे हक्क संभाळून त्यांना अधिक वेतन, कमी तास

काम, वगैरे फायदे करून देणें. अडचणींच्या वेळीं कामकरी लोकांस साह्य होतें, हा श्रेणीपासून मोठा फायदा आहे. मंडळीच्या नियमाप्रमाणें श्रेणीच्या प्रत्येक सभासदास दर आठवड्यास श्रेणीच्या फंडास कांहीं रकम द्यावी लागते. दुखणें आलें किंवा काम न मिळालें तर या फंडांतून त्यास साह्य होतें, व तो मरण पावल्यास त्याचे कुटुंबासही कांहीं मिळतें. व्यापाऱ्यांची श्रेणी ही एकाअर्थी विमा उत्तरणारी मंडळीच होय. श्रेणीपासून कामकरी लोकांस इतकें साह्य होतें कीं, सुतारांच्या व शिल्प्यांच्या प्रसिद्ध मंडळ्या आहेत, त्यांमधील लोकांनीं गांवखात्यांतून धर्मादायाचा स्वीकार केल्याचें ऐकण्यांत नाहीं.

व्यापाऱ्यांच्या श्रेणीचें दुसरें काम ह्मटलें ह्मणजे, कामकरी लोकांस होईल तितकें अधिक वेतन मिळवून देऊन त्यांचें हित करावयाचें. लोकांत श्रेण्यांची प्रसिद्धि या संबंधानेंच फार आहे, व त्यामुळेंच भांडवलवाल्यांस त्या फार अप्रिय आहेत. कारण काम पाडण्याकडेच श्रेणीचा संबंध असतो असें जरी नाहीं, तरी कांहीं प्रकारच्या कटाखेरीज संपाचें काम तडीस जात नाहीं.

**संप.** संपापासून कारखानदार व मजुर यांचें वारंवार नुकसान होतें खरें, परंतु आपले हक्क राखण्याकरितां कामकरी लोकांस एकी करण्याचा हक्क नाहीं असें ह्मणतां येणार नाहीं. संप ह्मणजे काय असतें याचा शोध करूं. ज्यांना श्रमाची गरज आहे त्यांनीं देऊं केलेल्या किंमतीस आपला श्रम विकण्यास श्रमाचे मालक नाकारतात याहून संपांत अधिकउणें कांहीं नाहीं. गिऱ्हाइकानें देऊं केलेल्या किंमतीस दाणेवाल्यानें किंवा दुसऱ्या उदम्यानें आपला माल विकण्याचें नाकारल्यास त्यानें अपराध केला असें कोणी ह्मणणार नाहीं. गिऱ्हाईक ह्मणेल त्या किंमतीस दुकानदारानें आपला माल देत नाहीं ह्मणणें जर न्यायाचें

होईल, तर मजुरानेंही असेंच करणें गैर होणार नाहीं; आणि धन्यानें देऊं केलेल्या वेतनावर रहात नाहीं ह्मणणें हें जर एका मजुराच्या ठिकाणीं वाजवी होईल, तर दहा, शंभर किंवा हजार लोकांनीं असेंच करणें गैरवाजवी होणार नाहीं. वेतन ज्यास्त मिळविण्याकरितां, किंवा तें कमी न होऊं देण्याकरितां मजुरांनीं संप करणें हें शहाणपणाचें किंवा मूर्खपणाचें असो, परंतु नीतीच्या दृष्टीनें त्यांस दोष देतां येत नाहीं. जर कोणी मनुष्य दुसऱ्याच्या स्वातंत्र्याचा भंग करित नाहीं, तर त्यास पाहिजे तें करण्याची मोकळीक आहे. श्रेणी करणाऱ्यांनीं हा नीतीचा नियम जर पाळला असता तर त्यांच्या शत्रूंस एकी करण्याच्या हक्काविरुद्ध कांहीं बोलण्यास जागा न राहाती. समाजांतील सर्व लोकांकडून या नियमाचें उल्लंघन वारंवार होतें, व मजूर आपल्या वागणुकींत इतर लोकांपेक्षां श्रेष्ठ नाहींत. प्राचीनकाळीं, व मुख्यत्वेंकरून जेव्हां व्यापाऱ्यांची एकी मोडण्याकरितां सरकारानें कायदा करून वेडेपणाचा व अन्यायाचा यत्न चालविला, त्यावेळीं श्रेणींतील लोकांनीं कांहीं लोकांस कटांत आणण्याकरितां, त्यांच्यावर जुलूम व जबरदस्ती केली असें घडलें आहे. सदोदित त्रास देणें, माराहाण करणें व जीव देखील घेणें, अशा साधनांचा उपयोग श्रेणींतील लोकांनीं, कटांत न शिरणाऱ्या कामकऱ्यांची चढाओढ बंद करण्याकरितां केला आहे. हा प्रकार निंद्य असून त्याची लोकांत निर्भर्त्सनाही पुष्कळ झाली; परंतु प्रसंगानुसार श्रेणींतील लोकांच्या हातून जुलूम घडला एवढ्यावरून त्यांचा एकत्र होण्याचा हक्क बुडाला काय? व्यापाऱ्यांच्या श्रेणीचा पक्ष घेणारे जे शहाणे लोक आहेत त्यांचें ह्मणणें हेंच आहे. या हक्कानें श्रेणींतील लोकांस जें सामर्थ्य आलें त्याचा कांहीं लोकांनीं दुरुपयोग केला ह्मणून

सर्वांचा हक्क बुडविणें योग्य होणार नाहीं. वर्गावर्गांस अनुलक्षून केलेले अन्यायाचे कायदे मोडण्याकरितां जे सद्गृहस्थ झटत असतात, त्यांना ही गोष्ट अभिनंदनीय वाटेल कीं, व्यापाऱ्यांच्या श्रेण्या कायदेशीर ठरल्यापासून, श्रेणीच्या हिताकरितां ह्मणून, कटांतील लोकांच्या हातून इतर लोकांवर जुलूम झाल्याचें क्वचित् ऐकण्यांत येतें. कटाबाहेरील लोकांचीं हत्यारें दडवून ठेवणें, किंवा त्यांचा नाश करणें, हा प्रकार हल्लीं अगदीं मोडत चालला आहे.

व्यापाऱ्यांच्या श्रेणीपासून एक मोठा उपयोग होतो, तो हा कीं, जे मजूर वेतना संबंधानें बोली करतात त्यांना भांडवलवाल्याशीं बरोबरीच्या नात्यानें वागतां येतें. वेळ पडल्यास बरेच दिवस काम केल्याशिवाय राहतां यावें इतका संचय मजूर लोकांजवळ नसतो; ह्मणून ज्या मजुरास श्रेणीचें पाठबळ नाहीं, तो मालकापाशीं वेतनासंबंधानें भांडण्यास असमर्थ असतो. अशा स्थितींतल्या मजुरास कामाशिवाय राहाणें ह्मणजे उपाशीं मरणें, किंवा गांवखात्यांतील धर्मादायावर पोट भरणें असें होतें; मालकास नुकसान कायतें पैक्याचेंच होणार. मजुराच्या जिवावर किंवा स्वातंत्र्यावर प्रसंग असतो व मालकाच्या पैशावर प्रसंग असतो. श्रेणीच्या योगानें ही असमता नाहींशी होते, कारण जेव्हां संप करावयाचें ठरतें तेव्हां काम पडलें राहील तोंपर्यंत कटांतील लोकांस श्रेणीकडून पोटास मिळतें. व्यापाऱ्यांच्या श्रेणी, व साह्यकारी मंडळ्या, व दारिद्र्याचे मदतीचा कायदा याचें कार्य असें होतें कीं, जेव्हां व्यापारास मंदी असते व मजुरास काम मिळत नाहीं, तेव्हां फ्रान्स देशाप्रमाणें इंग्लंडांत अनर्थ होत नाहींत. वर सांगितलेल्या गोष्टीमुळें इंग्लंडांत उपाशीं मरण्याच्या भीतीपासून कामकरी लोकांचें रक्षण होतें. लोकांत भयंकर दंगे होण्यास प्रायः ही भीति कारण असते.

कामकरी लोकांमध्यें परस्परांस साह्य करण्याकरितां निरनिराळ्या प्रकारच्या मंडळ्या पूर्वींपासून आहेत. परंतु व्यापाऱ्यांच्या श्रेणीस लोकांत अधिक प्रसिद्धि मिळण्याचें कारण हेंच कीं त्यांचा संबंध संपाशीं आहे. सरकारी कागदपत्रावरून असें समजतें कीं, मजुरास साह्य करणाऱ्या मंडळ्यांत व व्यापाऱ्यांच्या श्रेणींत इंग्लंड व वेल्स या देशांमध्यें सन १८८४ च्या आरंभीं ६०००००० लोक होते, व त्यांचे फंड अदमासे ६८०००००० पौंड होते. १८८० पासून २८२३१३ लोक मंडळ्यांत आले, व फंडांत सुमारें ११०००००० पौंड वाढले.

**अधिक वेतन मिळविण्याकरितां श्रेणींतील लोक जीं साधनें योजितात त्यांपैकीं कांहीं पुढें दाखविलीं आहेत.** श्रेणीचा मुख्य उद्देश त्यामधील लोकांस मिळेल तितकें अधिक वेतन मिळविण्याचा असतो असें ह्मणतात. श्रेणींतील लोकांवर जरी असा आरोप आहे कीं, ते अर्थशास्त्राचें प्रत्येक तत्व झुगारून देतात, तथापि संपत्तिशास्त्राचें एक तत्व त्यांना चांगलें माहित असतें कीं, वेतनांत खर्च होते ती रकम, व ज्या लोकांत ती वांटून दिली जाते त्यांची संख्या, यांच्या प्रमाणावर वेतनाचा दर अवलंबून असतो. आतां हें खरें आहे कीं, ते लोक हें तत्व सर्व मजुरवर्गास लावीत नाहींत, परंतु ज्या धंद्यांत ते गुंतलेले असतात तेवढ्यास मात्र ते लागू करतात. यास्तव व्यापाऱ्यांच्या श्रेणीचे नियम बहुधा असे असतात कीं, आपल्या धंद्यांत अधिक लोक येऊं नयेत, किंवा त्यांत स्त्रियांचा प्रवेश होऊं नये. उदाहरणार्थ गलबतें बांधणाऱ्या कारागिराचा प्रवेश श्रेणींत होण्यास त्यानें कोणापाशीं तरी काम शिकायास सात वर्षें राहिलें पाहिजे. सात वर्षांचा दाखला पाहिल्याशिवाय कारखानदारानें कोणास कामावर ठेविलें तर श्रेणींतील

लोक त्याचें काम पाडतील. तसेंच टोप्याकरावयाचे कारखान्यांत असा नियम आहे कीं, कसबी कारागिरानें आपल्याशीं एका वेळीं दोहोंपेक्षां अधिक उमेदवार धंदा शिकायास ठेवूं नयेत. हुशार गंवडी आपला एक मनुष्य हाताखालीं घेतल्या खेरीज कामास हात लावणार नाहीं. यामुळें गंवड्यांची संख्या मर्यादित रहाते.

**व्यापाऱ्यांच्या श्रेणीचे प्रतिबंधक नियम व विद्वान् लोकांच्या धंद्यांतील चाली यांची तुलना.** व्यापाऱ्यांच्या श्रेणीचे वर सांगितलेले नियम व डाक्तर आणि वकील लोक यांच्या धंद्यांतील नियम यामध्यें अगदीं साम्य असतें हा मोठा चमत्कार आहे. गलबतें बांधणाऱ्या ज्या मनुष्यापाशीं सात वर्षें शिकल्याचा दाखला नाहीं तो ज्या कारखान्यांत काम करीत असेल तेथें दाखला असलेला कारागीर काम करणार नाहीं. ज्यास योग्य मंडळीकडून परवानगी मिळाली नाहीं त्याशीं सल्ला करण्यास कोणी डाक्तर बसणार नाहीं. सन १८७८ सालपर्यंत इंग्लंडांतील परवाना देणाऱ्या सर्व मंडळ्यांनीं स्त्रियांस प्रतिबंध केला होता, व यामुळें वैद्यकीच्या धंद्यांत चढाओढ मर्यादित झाली होती. परंतु शेवटीं लंडन युनिवर्सिटींतील सर्व पदव्या धारण करण्यांत स्त्रियांचा प्रवेश झाला. पुष्कळ पदव्याधारी डाक्तरांनीं आपल्याकडून होईल तितका मोड घातला, परंतु त्यांचें कांहीं चाललें नाहीं. याचप्रमाणें चिनीमातीच्या भांड्यांवर चित्रें काढण्याच्या कामांत व सतरंज्या विणण्याचे कामांत व दुसऱ्या कांहीं धंद्यांत काम करणाऱ्या लोकांनीं बायकांस कामांत घेतलें ह्मणून वारंवार संप केले; त्यांचा उद्देश हाच कीं धंद्यांत येणाऱ्या मनुष्याची संख्या कमी व्हावी. टोप्या करणारानें एका वेळीं दोहोंहून अधिक उमेदवार हाता-

खालीं घेऊं नयेत. सॉलिसिटरानें आपल्यापाशीं काम शिकण्यास दोहोंहून अधिक उमेदवार एका वेळीं ठेवूं नयेत. कसबी गंवडी हाताखालीं एक मनुष्य घेतल्या खेरीज काम करणार नाहीं. राणीचा बालिस्टर एका तरुण बालिस्टरास मदतीस घेतल्याशिवाय कोर्टांत पाय घालणार नाहीं. हें जें चमत्कारिक साम्य येथें दाखविलें आहे तें व्यापाऱ्यांच्या श्रेणीचा चांगलेपणा दाखविण्याकरितां नव्हे, परंतु एवढेंच दाखविण्याकरितां कीं, आपल्या धंद्याचें हित साधण्याकरितां विद्वानांनीं व अविद्वानांनीं एकाच साधनाचा उपयोग केला आहे. उभयतांच्या मतें हे नियम विशेषेंकरून आपणास, व साधारणपणें सर्व समाजास हितकारक आहेत यांत संशय नाहीं. पण एका वर्गाचे नियम जर अन्यायाचे ह्मणणें असेल तर दुसऱ्याचेही ह्मटले पाहिजेत.

**कामकरी लोकांप्रमाणेंच त्यांच्या धन्यामध्यें कट असतात.** पुष्कळ धंद्यांत व व्यापारांत कट असतात त्यांचीं नांवें निराळीं आहेत. श्रेणीचे कांहीं द्वेष्टे एक गोष्ट अगदीं विसरतात, ती ही कीं, मजुराप्रमाणें त्यांच्या धन्यांतही कट असतात. उदाहरणार्थ लोखंडाच्या कारखानदारांच्या त्रैमासिक सभा असतात. पुढील तीन महिन्यांत कोणत्या कामावरच्या मजुरास किती वेतन द्यावयाचें हें तेथें ठरवितात. जेव्हां ते वेतन कमी करण्याचा निश्चय करितात तेव्हां सर्व प्रांतांत वेतन एकदम कमी करितात. मजूरलोक देखील वेतन ज्यास्त मागण्यासाठीं एक दिवस नेमून संप करतात.

**व्यापाऱ्यांच्या कटाच्या पोटीं वैरभाव गर्भित होतो; हें वैमनस्य सुरू राहील तोंपर्यंत संप व वेतन पाडणें हे प्रकार चालूं राहतील.** कामकऱ्यांच्या श्रेणी जशा न्यायास अनुसरून आहेत तशाच त्यांच्या धन्यांच्याही आहेत. त्यांत

जें वैमनस्य दृष्टीस पडतें त्याबद्दल आपणास वाईट वाटणें वाजवी आहे, व त्यापासून फार दुःख व पैशाचें नुकसान हीं खचित होतात, परंतु जोंपर्यंत विरोध आहे तोंपर्यंत एकी करण्याच्या हक्कावर उठण्यांत कांहीं फायदा नाहीं. धनी व त्यांचे मजुर यांमध्यें जर वैमनस्य नसतें, तर व्यापाऱ्यांच्या श्रेणी व भांडवलवाल्यांच्या मंडळ्या हल्लीं दिसतात अशा झाल्याच नसत्या. संप नेहमी होतात व त्यापासून फार दुःख होतें असें ज्यांना वाईट वाटत असेल, त्यांनीं धनी व कामकरी यांच्यांतील हितविरोध कमी करण्यास झटावें; ह्मणजे संप व वेतन पाडणें हीं जीं त्या वैमनस्याचीं बाह्य चिन्हें आहेत तीं बंद होतील. वेतन पाडणें हा कारखानदारांचा संपच होय. मजुरलोक कामाचे तास कमी करण्याकरितां, किंवा वेतन वाढविण्याकरितां, मागणी करतात, ती मागणी धन्यास कबूल नसते. त्यांचें मागणें फार जोराचें झालें ह्मणजे प्रांतांतील सर्व कारखानदार आपल्या कारखान्यांतील सर्व लोकांस रजा देतात. कारखान्याचे दरवाजे बंद होतात; माल तयार होत नाहीं; मग कोणता तरी पक्ष हरतो किंवा उभयतांमध्यें कांहीं तोडजोड होते.

**मिळून काम करणें, सरकत आणि नफा वांटून घेणें.** भांडवल व श्रम यांतील चालू असलेला विरोध दूर करण्याकरितां पुष्कळ व्यवस्था प्रतिपादन केल्या आहेत. त्यांचा मुख्य रोंख असा आहे कीं, धनी आणि मजूर यांस आपलें उभयतांचें हित एकच आहे असें वाटावें. या सर्व व्यवस्थांचें मुख्यतत्व असें आहे कीं, कामकरीलोक जो धंदा करीत असतात त्यांची चांगली चाल होण्यांत त्यांना प्रत्यक्ष द्रव्यप्राप्ति असावी; ही द्रव्यप्राप्ति त्यांना अशारीतीनें करून द्यावयाची कीं, त्यांच्या उद्योगास जितकें भांडवल लागतें तितकें सर्व किंवा

त्याचा बराच भाग मजुरांचा असावा. धंद्यास लागणारें सर्व भांडवल मजुरांनीं घातलें ह्मणजे सहोद्योगाचा शुद्ध प्रकार झाला आणि भांडवल व श्रम यांतील विरोध अर्थात नाहींसा झाला. कामकरीलोक धंद्यांत जेव्हां भांडवलाचा कांहीं अंशच घालितात, तेव्हां ते आपल्या धन्याचे भागीदार होतात, व या व्यापारास सरकत ह्मणतात. भांडवल आणि श्रम यांमध्यें आणखी एका तऱ्हेनें ऐक्य करितां येतें, याठिकाणीं मजुरास भांडवलवाला व्हावें लागत नाहीं. कारखानदार व मजूर यांचें असें ठरलें असतें कीं, ज्या धंद्यांत ते उभयतां खपत आहेत, त्यांत अमुक नफा पडून वर जें येईल तें भांडवल व श्रम यांमध्यें ठरीव प्रमाणानें वांटून घ्यावयाचें. नफ्याच्या वांटणींत विशेष असें आहे कीं, मजुरास इमानानें काम करण्यास उत्तेजन येऊन, व हत्यारें आणि सामानसुमान यांची काळजी चांगली घेतली जाऊन, यापासून जो अधिक नफा होतो त्याची पुढें वांटणी करावयाची सेडले टेलर साहेबानें नफ्याच्या वांटणी संबंधानें एक पुस्तक लिहिलें आहे. त्यांत तो असे ह्मणतो कीं, नफ्याच्या वांटणीविषयीं एक महत्त्वाची गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे, ती ही कीं, नफ्याची वांटणी ही कारखानदाराच्या खिशांतून द्रव्य काढून तें मजुरास देण्याची युक्ति नसून, त्यांना कामकरण्याची आस्था अधिक होऊन त्यांनीं अधिक धन उत्पन्न करावें, व हें अधिक धन सर्वांनीं वांटून घ्यावें, असा तिचा मूळ उद्देश आहे. सहोद्योग, सरकत आणि नफ्याची वांटणी यांच्या योगानें यशस्वी झालेले कारखाने फ्रान्स देशांत पुष्कळ आहेत. इंग्लंडापेक्षां फ्रान्सदेशांत उद्योगाच्या नवीन पद्धति विशेष भरभराटीस येतात. पारीस आणि आर्लियन्स कंपनीनें आपल्या भांडवलावर शेकडा ८ प्रमाणें व्याज आका-

रून बाकीचा नफा मजुरांत वांटून दिला. सन १८४४ पासून १८८२ पर्यंत ३९ वर्षांत २५८३३७८ पौंड नफ्याची रकम मजुरांत वांटली गेली. पारीसशहरांत बानमार्ची ह्मणून एक प्रसिद्ध दुकान आहे. त्या दुकानाच्या मालकानें आपल्या हाताखालीं ३००० लोक ठेवून, नफ्याची वांटणी व सरकत यांचा उपयोग करून बहुत फायदा करून घेतला. हल्लीं त्या दुकानाचें पूर्वस्वरूप जाऊन ती जुटीनें व्यापार करणारी मंडळीच बनली आहे. तिचें भांडवल ८००००० पौंड आहे. या रकमेपैकीं कामकऱ्यांचे ३००००० पौंड आहेत, व मूळच्या मालकाच्या विधवेच्या नांवचे ५००००० पौंड आहेत. गाईस शहरीं गाडीननांवाचा लोखंडाचा कारखानदार आहे. त्यानें सन १८८० पासून आपल्या धंद्यांत नफा वांटून घेण्याची रीति सुरू केली आहे. त्यांत त्यास पूर्ण यश आलें. कांहीं वर्षांमागें त्यानें आपल्या हाताखालच्या लोकांत एक प्रकारचा घरगुती सहोद्योग सुरू केला. त्याचा वृत्तांत नीलसाहेबानें एका पुस्तकांत दिला आहे. पारीसशहरांत मेसनलिक्लेअर नांवाची घरें रंगविण्याचें कामकरणारी एक मंडळी आहे. नफ्याची वांटणी केल्यापासून जे चांगले परिणाम होतात त्याचें एक उत्कृष्ट उदाहरण ही मंडळी आहे. ही मंडळी लिक्लेअर साहेबानें स्थापन केली. लिक्लेअर हा चांभाराचा मुलगा असून बाविसाव्या वर्षी तो रोजीं तीन शिलिंग मजुरी मिळवून होता. अशा गरीबींतून लवकरच निघून तो मोठ्या कारखान्याचा मालक झाला. ही गोष्ट मोठी असाधारण आहे असें नाहीं; परंतु लिक्लेअर हा विलक्षण माणूस होता; आपण स्वकष्टानें मोठी संपत्ति मिळविली होती तिचा उपभोग करूनच तो तृप्त नव्हता. त्यानें अशी युक्ति योजली कीं, आपल्या सर्व मजुरांस आपले भागी-

दार करावें. तो आपल्या चरित्रांत असें ह्मणतो कीं, मी स्वतः-स असा प्रश्न केला कीं माझ्या हाताखालचा मनुष्य रोज खपतो तितकाच वेळ खपून ज्यास्त आस्थेनें काम करून एक तासाची मजुरी ह्मणजे ६ पेन्स मिळवील काय? व दुसरें असें कीं त्याच्या स्वाधीन केलेल्या सामानाचा नासधूस न करून, व आपल्या हत्यारांची ज्यास्त काळजी घेऊन दररोज अडीच पेन्स वांचवील काय? या प्रश्नाचें उत्तर जर होय असें येईल तर आपणास दरसाल ३००० पौंड नफा होईल असें त्यानें ताडलें. त्याच्या कारखान्यांत ३०० लोक होते व वर्षांतून कामाचे दिवस ही ३०० च होते. प्रथम त्यानें सन १८४१ त नफ्याची वांटणी केली, आणि त्याच्या युक्तीमुळें मजुरांचा कामकरण्याचा उत्साह व प्रामाणिकपणा जसा वाढूं लागला तशी वांटणीची रकम दरसाल वाढत गेली. त्यानें पुढें सांगितल्याप्रमाणें तजवीज केली. लिक्लेअरच्या कामकरीलोकांची परस्परांस साह्यकरणारी एक मंडळी होती. त्या मंडळीचें भांडवल वाढत गेलें तसें ते लिक्लेअरच्या खारखान्यांत घातलें. तेव्हां ती मंडळी त्याची भागीदार झाली, व मंडळींतील लोकांस फायद्याचा वांटा मिळाला. आरंपासून ह्या धंद्याची चलती झाली; व लिक्लेअरनें त्याची स्थापना अशी शहाणपणानें केली होती कीं, तो १८७२ रांत मरण पावल्यावर त्याच्या भरभराटीस अडथळा आला नाहीं. लिक्लेअरच्या मरणकाळीं मंडळीची मिळकत सुमारें ८०००० पौंडांची होती. पुढें दहावर्षांनीं सन १८८२ त ती १२५५८० पौंड झाली. सन १८४५ पासून सन १८८२ पर्यंत मजुरांस वांटून दिलेला नफा ११७००० पौंड झाला. सन १८८२ त जी वांटणी झाली त्या वेळीं मंडळींत लोक ९९८ होते. सहोद्योगाचे तत्वाचा उपयोग गुरडानसाहेबानें शेत-

कीकडे केला आहे. सुमारें ५० वर्षांमागें गुरडाननें मजुरांच्या एका मंडळीस दोन शेतें दिलीं; मंडळीस लागलें तें भांडवल त्यानें पुरविलें; मंडळीनें तें कांहीं वर्षांत फेडण्याचें कबूल केलें. शेतीच्या व्यापारास आलिकडे आलेली मंदी येईपर्यंत या मंडळीस पूर्ण यश आलें. सारा कांहीं कमी होऊन जर उत्पन्न वाढलें तर दोन्ही शेतें फायदेशीर होतील, व मंडळी जुटीनें काम करावयाचें तत्व सोडणार नाहीं अशी अशा आहे. गुरडानचें भांडवल फिटून पुष्कळ दिवस झाले व शेतकऱ्यांच्या स्थितींतही बरीच सुधारणा दिसत आहे. शेतकऱ्यांनीं आपल्या लोकांमधून एक व्यवस्थापक कमेटी नेमली आहे, व शेतांत जे कष्ट करतात त्यांना रीतीप्रमाणें वेतन मिळून, सालअखेर ज्यांचे हिस्से आहेत त्यांना नफा वांटून देतात.

**इंग्लंडांतील सरकत.** इंग्लंडांत मिळून काम करण्याचीं तत्वें कोठें कोठें प्रचारांत आहेत. त्यांत सरकतीनें व्यापार करणारी एक प्रसिद्ध मंडळी आहे. पूर्वीं या मंडळींतील प्रमुख गृहस्थ दगडी कोळशांच्या खाणीचे मालक होते, परंतु त्यांचे व काम कऱ्यांचे वारंवार तंटे होऊन त्यांचें फार नुकसान झालें, व शेवटीं त्रासून ते धंदा सोडून देण्याच्या बेतास आले. पुढें त्यांनीं मनांत आणलें कीं, भांडवल व श्रम यांची एकवार सरकत करून पहावी. ह्मणून त्यांनीं आपल्या धंद्याचें स्वरूप बदलून त्याची जुटीनें व्यापार करणारी मंडळी बनविली. मंडळीचें भांडवल १३५००० पौंडांचें करून दर एक भाग १५ पौंडांचा असे ९००० भाग केले. मूळच्या मालकांनीं ६००० भाग आपल्याकडे ठेवले, आणि बाकीचे ३००० भाग घेईल त्यास देऊं केले. खाणींतील कामकऱ्यास हे भाग घेण्यास मोकळीक होती. हे भाग लवकर खपून

गेले. आणि व्यापारांत ज्याचा एक भाग होता तो सुद्धा भागीदार झाला. कंपनी चालविणारे व्यवस्थापक नेमिले होते त्यांपैकीं एकाची निवड मजुरांकडून होत असे. भांडवलाचा नफा शेंकडा १० वर आला असतां असें ठरविलें होतें कीं, उरलेली रक्कम मजुर लोकांस देणगी दाखल वांटून द्यावी. प्रत्येक कामकऱ्यास ही देणगी गेल्या वर्षांत त्यानें जी मजुरी मिळविली असेल त्याप्रमाणानें मिळावयाची. ही व्यवस्था दह्या वर्षे सुरळीतपणें चालली; ज्यावेळीं भोंवतालाच्या प्रांतांत भांडवलवाले व मजूर यांच्यामध्यें फार तंटे बखेडे होत, वारंवार संप होऊन भारी नुकसान होई, त्यावेळीं या मंडळीची चलती असून धनी आणि नोकर यांच्यांत एकोपा व स्नेह असे. हा धंदा कठीण प्रसंगीं व व्यापारास मंदी असतां भरभराटींत असून, दुर्दैवानें असें झालें कीं, ज्यावेळीं दगडी कोळशाच्या व्यापारास फार तेजी आली आणि नफे व रोजमुरे एकदम भारी चढले. तेव्हां नफ्याच्या वाटणीचें तत्व डळमळूं लागलें. सन १८७१ व १८७२ या दोन वर्षांत कोळशाच्या व्यापाराची मनस्वी चलती झाली. वेतन व नफा हीं दुप्पट झालीं. अशी स्थिति झाल्यावर वाढलेला नफा कसा वांटून घ्यावयाचा यासंबंधानें मंडळींत तंटा सुरू झाला; १८७२ रांत व्यवस्थापकांनीं ठरविलें कीं, भांडवलास पूर्वीप्रमाणें शेकडा १० नफा न देतां शेकडा १५ घ्यावा. एवढ्यानें देखील तंट्यास सुरवात झाली नाहीं, परंतु पुढें व्यापारास मंदी आली तेव्हां आसपासच्या कोळशाच्या मालकांनीं व या मंडळींतील पूर्वीच्या मालकांनीं रोजमुरे कमी करण्याचें जाहीर केलें. त्याबरोबर मजुरांनीं संप केला व ह्या संपांत वरच्या मंडळींतील मजूरही होते. मंडळीची सभा दुसऱ्या वेळीं झाली तेव्हां बहुतेक भागीदारांनीं

संप बंद होत नाहींत हें कारण दाखवून नफ्याची वांटणी करण्याचें तत्व नापसंत केलें, व व्यवस्थापकांनीं जाहीर केलें कीं इत:पर नफा वांटून देण्यांत येणार नाहीं. नफ्याची वांटणी झाली तितक्या मुदतींत मजुरांस देगण्या दाखल ३४००० पौंड वांटले. दुर्दैवाचे प्रसंग येऊन हा प्रकार बंद झाला याबद्दल फार वाईट वाटतें.

मेथले येथील नफा वांटण्याची रीति जरी बंद झाली आहे; तरी कारागीर लोकांचे कंपनींत भाग आहेत हें विसरूं नये. या तऱ्हेची सरकत पुष्कळ कारखान्यांत चालू आहे.

**पंचाईत.** कांहीं धंद्यांत व मुख्यत्वेंकरून कलाबतू आणि पायमोजे विणण्याच्या कारखान्यांत पंचाईत स्थापन केली आहे. त्यामुळें संप बंद झाले आहेत. धनी आणि मजूर यांणीं सारखे पंच नेमावयाचे. हे पंच महिन्यांतून एकवेळ जमतात व धनी आणि मजूर यांच्या तंट्याचा इनसाफ करतात. तंटा उपस्थित झाल्यास या पंचांपासून पुष्कळ हित होतें. आणि धनी व मजूर यांवर पंचांचें सारखेंच वजन असल्यामुळें तंटे सुलभ रीतीनें मिटतात. परंतु हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, पंच लोकांचें लक्ष्य संप बंद करण्याकडे असतें, परंतु ह्या रोगाचें जें मूळ ह्मणजे वैमनस्य त्याकडे ते लक्ष पोंचवीत नाहींत. ह्मणून संपावर या उपायाचा चांगला गुण येईल असें सांगवत नाहीं.

**मिळून व्यापार करणाऱ्या कोठ्या.** मिळून व्यापार करणाऱ्या मंडळ्या व मिळून व्यापार करणाऱ्या कोठ्या यांत अर्थाचा घोटाळा होण्याचा संभव आहे. मिळून व्यापार करण्याचें खरें स्वरूप हें कीं, त्यांत भांडवल व श्रम यांचा संयोग होतो. परंतु सिविलसर्वीस स्टोर्स व आर्मीस्टोर्स या कोठ्यांत भांडवल आणि श्रम यांचा संयोग अवश्य नसतो. ह्या जुटीनें

व्यापार करणाऱ्या मंडळ्या असतात, त्यांचे भागीदार कोठ्या चालविण्यांत श्रम करीत नाहींत. मिळून व्यापार करणाऱ्या कोठ्यांपासून फायदा होतो तो भांडवल व श्रम यांच्या संयोगाचा नव्हे, तर तो, रोखठोकीच्या व्यापाराचा व माल उत्पन्न करणारा व त्याचा उपभोग करणारा यांच्यामध्यें निकटसंबंध उत्पन्न करून दोन तीन मध्यस्थ व्यापाऱ्यांचा नफा वांटणीस आणून किंमती कमी केल्याचा होय. कोठींतील एकोपा, भांडवल व श्रम यांचा नव्हे; मालाचा खप करणारा व वांटणी करणारा यांचा होय. साधारण दुकानापेक्षां व्यापाराच्या कोठींत माल स्वस्त विकला जातो, उधारी नसल्यामुळें पैका येणें रहात नाहीं, जाहिरातीचा खर्च नसतो, भपकेदार दुकान मांडावें लागत नाहीं, व विकलेला माल नेण्याचा खर्च कोठीच्या मालकास पडत नाहीं. व्यापारी कोठ्यांच्या तत्वावर सर्व व्यापारी लोक धंदा कां चालवीत नाहींत, यास कांहीं कारण दिसत नाहीं. याचें कारण असें असावें कीं, कोणतीही नवीन गोष्ट ह्मणजे वाईट असा पुष्कळ लोकांचा ग्रह झालेला असतो फार जुनाट आणि प्रसिद्ध अशी कोठी राचडेल येथील कामकरी लोकांची आहे. तेथें व्यापार अगदीं रोखीचा असतो, व साधारण किरकोळ विक्रीच्या दरानें जिन्नस विकतात; तिमाही हिशेब करून नफा पुढील रीतीनें वांटून देतात; भागीदारांच्या भांडवलावर व्याज शेंकडा ५ आकारून उरेल त्याची वांटणी विकत घेणाऱ्यांमध्यें होते. खरेदी करणारानें जितका माल कोठींतून घेतला त्या मानानें त्यास नफ्याचा अंश मिळतो. मजूर लोकांनीं राचडेल पायोनियर सोसैटीची स्थापना १८४४ त केली. त्यावेळीं त्यांचें भांडवल काय तें एक चहाची पेटी व कांहीं साखर इतकें खरेदी करण्यापुरतें होतें. सन १८८२ सालीं

त्यांनीं २७४००० पौंडांचा व्यापार केला. ह्मणून चांगल्या रीतीनें चालविल्यास अशा कोठ्यांपासून बहुत फायदा होतो यांत संशय नाहीं.

व्यापारी कोठ्यांपासून गिऱ्हाइकास फायदा निःसंशय होतो. सबब असें वाटतें कीं, त्या कोठ्यांस यश येण्यास कारण जो रोखीचा व्यापार त्याचा दिवसेंदिवस इतर धंद्यांत प्रवेश होईल.

**४ थ्या भागावर प्रश्न.** व्यापाऱ्यांच्या श्रेणी, संप आणि मिळून व्यापार करणाऱ्या मंडळ्या.

१. व्यापाऱ्यांची श्रेणी ह्मणजे काय ?

२. व्यापाऱ्यांच्या श्रेणीचीं मुख्य दोन कामें कोणतीं ?

३. भांडवलवाल्यांच्या वर्गास श्रेणी नापसंत कां असतात ?

४. व्यापाऱ्यांच्या श्रेणी व संप यांचा काय संबंध असतो ?

५. संप ह्मणजे काय ?

६. कामकरी लोकांस संप करण्याचा हक्क नाहीं असें दाखवितां येईल काय ?

७. श्रेणीपासून कटांतील लोकांस मुख्य फायदा कोणता होतो ?

८. धंद्यांत मिळतें त्याहून अधिक वेतन मिळावें ह्मणून श्रेणींतील लोकांनीं कोणते नियम केले असतात ते सांगा.

९. श्रेणीचे नियम व डाक्तरी आणि वकिलीच्या धंद्यांतील चाली यांतील साम्य दाखवा.

१०. धन्यांनीं एकोपा केल्याचें एक उदाहरण द्या, व असें दाखवा कीं नोकरांस ज्याप्रमाणें आपलें हित राखण्यासाठीं एकीकरण्याचा हक्क आहे तसा त्यांच्या धन्यासही आहे.

११. संप व वेतन पाडणें यांचें खरें कारण काय आहे ?

१२. हें कारण कसें दूर करतां येईल.

१३. मिळून व्यापार करणें, सरकत, नफ्याची वांटणी यांचें वर्णन करा, व प्रत्येकाचीं उदाहरणें द्या.

१४. नफ्याच्या वांटणीपासून धन्याच्या पैक्याचें नुकसान होतें काय ?

१५. नफ्याच्या वांटणीचे विशेष फायदे कोणते ?

१६. मिळून व्यापारकरणारी कोठी ह्मणजे काय ? तिची व्यवस्था कोणत्या तत्वावर केली असते ?

१७. एरवींच्या दुकानापेक्षां कोठींत माल हलक्या किमतीस कसा मिळतो ?

१८. राचडेल पायोनियरच्या कोठीची संक्षिप्त माहिती द्या.

---

१. एकी केल्यापासून कामकरी लोकांस कोणते फायदे होतात यावर एक निबंध लिहा, आणि असें दाखवा कीं, धन्यापाशीं कबूली करून घेतांना फक्त एकीनेंच त्यांचें हित साधेल.

२. तुह्मी जर व्यापाऱ्यांच्या श्रेणीचे भागीदार असाल व संप करवयाचें ठरलें असलें, तर व्यापाराची चलती असतांना, किंवा मंदी असतांना संप करण्याचा तुह्मी सल्ला द्याल ?

३. व्यापारी कोठ्यांपासून किरकोळ माल विकणारे उदमी व इतर धंदेवाले यांचें नुकसान होत असलें ह्मणून, त्यापासून समाजाचें कांहीं नुकसान होतें असें तुह्मास वाटतें काय ? वाटत नसेल तर कां नाहीं ?

---

# खंड ४.

## परदेशीव्यापार, पत आणि सरकारचे कर.

या खंडांत परदेशीव्यापार, पत आणि पतीचा किंमतीशीं संबंध, व सरकारी कर असे भाग आहेत. कदाचित् कोणास

असें वाटेल कीं, परदेशीव्यापार व पत यांचें विवेचन, धनाची अदलाबदल या सदराखालीं घालावयाचें होतें. परंतु धनाच्या अदलाबदलीच्या सदराखालीं येणारे विषय अशा लहान ग्रंथांत वेगळे करण्यापासून पुष्कळ फायदे आहेत. ज्या कारणांवरून सारा, वेतन आणि नफा यांच्या रकमा ठरतात तीं कारणें बरोबर समजण्यास मोल आणि किंमत यांचा अर्थ, जिनसांच्या किंमती ज्यावरून ठरतात तीं कारणें; व पैक्याचें खरें स्वरूप, इतक्या गोष्टींचें ज्ञान असणें अवश्य आहे. दुसरें असें कीं, धनाच्या वांटणीचा विचार करण्यापूर्वीं परदेशीव्यापार व पत हे विषय घातले असते तर, नवीन शिकणारास कंटाळा येऊन त्यास घोंटाळ्यांत पाडल्यासारखें झालें असतें. ह्मणून हे विषय शेवटच्या चवथ्या खंडाकरितां राखून ठेवले.

---

## भाग १.

## परदेशीव्यापार.

**परदेशीव्यापार वाढला ह्मणजे श्रमविभाग खचीत वाढतो.** श्रमविभागापासून जो फायदा होतो तोच परदेशीव्यापारापासून विशेष होतो. देशांनीं एकमेकांत यथेच्छ व्यापार सुरू ठेवला तर त्याचा स्वाभाविक परिणाम असा होतो कीं, ज्या राष्ट्रास जे जिन्नस उत्पन्न करणें सोयीवार असेल तें राष्ट्र त्यांचेंच उत्पन्न वाढवितें, व जे जिन्नस तयार करण्यास तेथें चांगल्या सोयी नाहींत त्यांचें उत्पन्न कमी करतें. अशा प्रकारानें मूळखर्च उतरतो, आणि भांडवल व श्रम विशेष फलद्रूप होतात. यास उदाहरण घेऊं. मद्य तयार करण्यास फ्रान्स देशास स्वाभाविक सोयी मोठ्या आहेत; कारण त्या देशाची हवा व लोकांच्या रीतिभाती अशा आहेत कीं द्राक्षाची लागवड तेथें

चांगली होते. ह्मणून फ्रान्सासारख्या देशांत लोकांस पाहिजे त्याहून अधिक मद्य उत्पन्न होऊन, इंग्लंडासारखे जे देश द्राक्षाच्या लागवडीस गैरसोयीचे आहेत त्यांस पुरविण्या इतकें तें होतें. परदेशीव्यापारापासून फायदा हाच कीं, आपणास जे जिन्नस मुळींच उत्पन्न करतां आले नसते ते मिळतात, किंवा आपणास जिन्नस तयार करण्यास जें भांडवल व श्रम हीं लागलीं असतीं त्याहून कमी लागून जो माल आपण तयार करतों त्याच्या मोबदला ते जिन्नस मिळतात.

**संरक्षणापासून समाजाचें फार अकल्याण होतें.** चेशायर प्रांतांत व जर्मनींत कांहीं ठिकाणीं मिठाच्या खाणी अशा आहेत कीं, त्यामुळें इंग्लंड व जर्मनी यांस मीठ तयार करण्यास विशेष सोयी आहेत. संरक्षक कर जर नसतील तर बहुधा फ्रान्स देशास लागणारें सर्व मीठ इंग्लंड व जर्मनी हे देश पुरवितील. नारवुइच आणि ड्राईटवुइच येथें पिकणारें मीठ उत्तम प्रकारचें असून तें तयार करण्यास श्रम फार कमी लागतात. हें मीठ पुष्कळ स्वस्त पडतें, व तें अशा प्रतीचें असतें कीं, तसें पुष्कळ संस्कार करूनही फ्रान्सांत होत नाहीं. सारांश इंग्लिश मीठ फ्रेंच मिठापेक्षां चांगलें असून स्वस्त असतें, व व्यापार खुला असेल तर त्याचा खपही पुष्कळ होईल. परंतु फ्रान्सदेशाचा संरक्षणमतवादी ह्मणतो, "असें होऊं नये, फ्रान्सांत पुष्कळ लोक मीठ पिकविण्याचा धंदा करीत आहेत, व कांहीं कर न घेतां इंग्लिश मीठ, देशांत येऊं दिलें तर स्वदेशीव्यापाराची एक शाखा नाहींशी होईल. इंग्लिश मिठावर आपणांस मोठा कर बसविला पाहिजे. फ्रान्सांत पिकलेल्या मिठापेक्षां त्यास अधिक किंमत पाडावी ह्मणजे इंग्लिश मीठ देशांत येणार नाहीं, व देशांतील धंद्यास उत्तेजन येईल."

ह्मणून हें मत अमलांत आणून परदेशाच्या मिठावर जबर कर बसविला आहे, त्यामुळें त्यास खप नाहीं. या प्रकारानें फ्रान्सदेशाच्या मिठाच्या व्यापाराचें रक्षण खचीत होतें, ह्मणजे असें कीं, ज्यापासून विशेष धनलाभ नाहीं अशा धंद्यांत कांहीं भांडवल व श्रम हीं गुंतून राहातात. परंतु संरक्षणवादी एक गोष्ट विसरतात, ती ही कीं, संरक्षण काढून घेतल्यामुळें अनुत्पादक धंदा जर बंद पडला, तर त्यांत गुंतलेंले श्रम आणि भांडवल हीं तशींच पडून रहाणार नाहींत; त्यांना दुसरें काम मिळून सरकारचा आश्रय न घेतां त्याची योग्य भरपाई होईल. इंग्लंडच्या मीठवाल्यांनीं फ्रान्सच्या मीठवाल्यांहून मीठ स्वस्त विकलें तर फ्रेंच व्यापाऱ्यांचें कांहींवेळ नुकसान होईल; परंतु ह्याचा शेवटीं असा परिणाम होईल कीं, व्यापारांत फायदा होईनासा झाला ह्मणजे हळू हळू ते आपलें भांडवल व श्रम त्यांतून काढून दुसऱ्या एखाद्या फायदेशीर धंद्यांत घालतील, ह्मणून यांत नुकसान नसून इतकेंच होतें कीं, ज्या धंद्यांत फायदा होत नाहीं त्यांतून भांडवल व श्रम निघून ज्यांत ते अधिक फलद्रूप होतील अशा नवीन धंद्यांत पडतात. असें झालें ह्मणजे एकंदरींत धनवृद्धि होते व राष्ट्राचें भांडवल वाढतें.

भांडवल व श्रम एकाप्रकारच्या धंद्यांतून दुसऱ्याप्रकारच्या धंद्यांत कसे जातात याचें उदाहरण हल्लीं इंग्लंडांत शेतीच्या उद्योगांत दिसत आहे. अमेरिकेहून अन्नसामग्री पुष्कळ येऊं लागल्यामुळें इंग्लंडचे गहूं, चक्कादर्ही वगैरे पदार्थ खपेनातसे झाले आहेत. कोठें कोठें थोडे लोक खेरीज करून इंग्लंडांतील शेतकरी लोक सरकारापाशीं आश्रय मागत नाहींत; परंतु ते पहात असतात कीं, कोणत्या जिनसाची लागवड केल्यास आपणाशीं अमेरिकन लोक चढाओढ करणार नाहींत. येथून

पुढें कांहीं वर्षांत मोठमोठीं शेतें मोडून त्यांचे जागीं बगीचे होतील; कारण वर सांगितलेले टिकाऊ पदार्थ ज्याप्रमाणें बाहेरून आणवितां येतात, तसें फुलें, फळें, भाजीपाला हे जिन्नस आणवितां येत नाहींत. या दिशेकडे कांहीं चळवळ सुरू आहे; व ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, अगत्याचे पदार्थ लोकांस कमी खर्चानें मिळाले तर फुलें, फळें वगैरे चैनीचे पदार्थ घेण्यांत ते अधिक खर्च करतील.

**संरक्षणापासून जिनसाचा उपभोग करणाऱ्यांचें नुकसान.** आतां आश्रय दिलेल्या धंद्यांत तयार झालेल्या जिनसांचा उपभोग करणाऱ्या लोकांवर संरक्षणाचा परिणाम काय होतो तो पाहूं. संरक्षकलोक जिन्नस घेणाऱ्यांची काळजी मुळींच करीत नाहींत. जिन्नस उत्पन्न करणाऱ्यास आश्रय देण्यास ते तयार असतात, पण त्यांचा खप करणाऱ्याकडे ते दुर्लक्ष करतात. आणि हें ध्यानांत ठेवलें पाहिजे कीं, तो जिन्नस अगत्याचा असल्यास जिन्नस तयार करणारांचें काल्पनिक हित साधण्याकरितां ते त्यांचा उपयोग करणाऱ्यांचें हित पहात नाहींत. ह्मणजे ते थोड्या लोकांचे हिताकरितां सर्वांचें अनहित करतात असें ह्मटलें पाहिजे. मिठावरील संरक्षक जकातीपासून सर्व फ्रेंचलोकांवर काय परिणाम झाला आहे तो पाहूं. त्यांस हलक्याप्रतीचा माल पत्करावा लागतो. हें नुकसान किती होतें तें पैशाच्या रकमेनें सांगतां येत नाहीं, परंतु तें वास्तविक असून उघड आहे; कारण भोजनाचे वेळीं जाडेंभरडें मीठ घेण्याचें दुःख सोसावें लागून शेतकीच्या व कलाकौशल्याच्या कामास वाईट मीठ वापरावें लागतें. परंतु वाईट मिठाचा उपयोग करावा लागल्यापासून पैक्याचें नुकसान किती होतें, हें जरी बरोबर ठरवितां येत नाहीं, तरी मिठाची किंमत वाढल्यामुळें

दरसाल १७५००००००० शेर मीठ खपतें. सबब फ्रेंचलोकांस मिठासाठीं दरसाल ७५०००० पौंड दंड पडतो, व एक पेनीचा सुद्धां कोणाचा फायदा होत नाहीं; कारण हे ७५०००० पौंड, इंग्लिश मिठवाल्यांपेक्षां फ्रेंच मिठवाल्यांच्या स्वाभाविक गैरसोयीची आकारणी आहे. यास पुढील दृष्टांत चांगला शोभेल. एका ग्रहस्थाच्या घरालगत परंतु शेजाऱ्याच्या हद्दींत पाण्याचा सुंदर झरा आहे. शेजारी, प्रतिवर्षी ४० रुपये घेऊन यास पाहिजे तितकें पाणी घेऊं देण्यास कबूल आहे; परंतु आमच्या ग्रहस्थाचा एक खासगत झरा आहे ह्मणून तो शेजाऱ्याचें ह्मणणें मान्य करीत नाहीं. परंतु हा खासगत झरा एक मैल लांब असून त्याचें पाणी इतकें गोड नाहीं. वर्षास ४० रुपये देऊन शेजाऱ्याचें पाणी घ्यावयाचें नाहीं, ह्मणून त्याला दरआठवड्यास दीडरुपया ह्मणजे दरवर्षास ७८ रुपये देऊन घागरीनें पाणी आणण्यास एक गडी ठेवावा लागतो. सबब तो तीन प्रकारांनीं आपलें नुकसान करून घेतो. त्याला पाणी वाईट मिळतें; व तें कमी आणि त्याकरितां त्याला ३८ रुपये अधिक खर्चावे लागतात. आणि ह्या फाजील खर्चापासून कोणाचेंच हित होत नाहीं, ज्या गड्यास दरआठवड्यास १॥ रुपया मिळतो, त्याचासुद्धां फायदा होत नाहीं; पाणी नेण्याकरितां त्याला रोजीचे ४ आणे मिळतात ते तो दुसरीं शेंकडों कामें करून कोठेंही मिळवील, दररोज चार आणे हे त्याच्या मेहनतीस

अधिक नाहींत, ह्मणून हा त्याजवर कांहीं उपकार नव्हे, तो तितक्या मोलाचें काम करतो.

**वेतनावर संरक्षणाचा परिणाम.** आश्रय दिलेल्या जिनसाच्या किंमतीवर संरक्षणाचा परिणाम काय होतो तो आपण पाहिला. संरक्षणमतास अवलंबून राहणाऱ्या देशांत प्रायः असें घडतें कीं, आश्रय दिलेल्या जिनसांत मनुष्यास दररोज लागणारे असे अगत्याचे पदार्थ पुष्कळ असतात. असें जेथें असतें, तेथें संरक्षणाच्या योगानें श्रमाचें वेतन कमी होतें; श्रम करणाऱ्या मजुराचें वास्तविक बक्षीस कमी होतें, कारण मजुरीबद्दल त्याला जो पैसा मिळतो त्याच्या जिनसा थोड्या येतात. दुसऱ्यापक्षीं व्यापार खुला असला ह्मणजे, किंमती उतरून श्रमकाराचें वास्तविक बक्षीस वाढूं लागतें, आणि हजारों लोकांचें प्रत्यक्षहित होतें. अवश्य वस्तूंपैकीं एखादी स्वस्त झाली ह्मणजे दोहोंतून एक गोष्ट घडलीच पाहिजे, ह्मणजे मूळखर्च उतरला पाहिजे, किंवा मजुराचें वास्तविक बक्षीस तरी वाढलें पाहिजे. अगत्याच्या पदार्थांची किंमत उतरून वेतन कायम राहिल्यास मजुराचें वास्तविक बक्षीस वाढलें, कारण त्याच्या वेतनाच्या पैशानें अधिक जिन्नस खरेदी करितां येतात. दुसरें असें कीं, अगत्याचा पदार्थ स्वस्त झाला व त्या मानानें वेतन कमी झालें, तर मजुराचें वास्तविक बक्षीस कायम राहून मूळखर्च कमी होतो. ह्मणून हें उघड आहे कीं, कोणत्याही अगत्याच्या पदार्थांची किंमत उतरल्यापासून जो फायदा होतो तो सर्वसाधारण असतो. बाहेरच्या चढाओढीपासून माल उत्पन्नकरणाऱ्याचें संरक्षण करून त्याचा जो मानीव फायदा होतो तो यापुढें कांहींच नव्हे. मालाची किंमत उतरली ह्मणजे भांडवल वाढूं लागतें; कारण मालाचा उपयोग करणारांचा

खर्च कमी झाल्यामुळें त्यांना संचय करण्यास सवड सांपडते, व भांडवलाकडे अधिक धन लागतें. जिन्नस उत्पन्न करणाऱ्यास आश्रय देण्याकरितां झटून संरक्षक लोक सर्व समाजाचें जें नुकसान करतात तें खरोखर दिसतें त्याहून अधिक होतें. संरक्षणापासून वारंवार असे परिणाम होतात कीं, ते संरक्षकांच्या मनांत केव्हांच आले नसतील; उदाहरणार्थ ज्या देशांत संरक्षण चालू आहे तेथें त्यामुळें नवीन धंदे स्थापन होत नाहींत. पारीस येथील फिगारो वर्तमानपत्राचा नाताळचा सचित्र अंक पहिल्यानें १८८३ त निघाला. हा अंक लंडनमध्यें छापला. तेव्हां पारीसच्या वर्तमानपत्रांनीं ओरड केली कीं, तो पारीसमध्यें कां छापला नाहीं. फिगारोच्या चिटणिसानें कबूल केलें कीं, पारीसशहरांत तसा अंक काढतां आला असता; परंतु लंडनमध्यें ज्या छापखान्यास २०० पौंड पडतात त्यास पारीसशहरांत ६०० किंवा ७०० पौंड पडले असते. छापखान्याच्या खर्चांत असें अंतर असण्याचें कारण हेंच कीं, परदेशाच्या यंत्रांवर फ्रान्सदेशांत मोठी जकात आहे.

संरक्षणामुळें पुष्कळ विनाकारण खर्च होतो हा एक त्यांत मोठा दोष आहे. स्मर्नाशहराजवळ, इंग्लंडास पाठविण्याकरितां जेष्ठमध जमवून शिजवून बराच तयार होत असतो. परंतु तोच अमेरिकेस न्यावयाचा असल्यास झाडें जशींच्यातशींच न्यावीं लागतात. त्यांत शेंकडा ९० भार पाणी असतें. याचें कारण असें कीं, तयार केलेल्या ज्येष्ठमधावर अमेरिकेंत एवढा मोठा कर आहे कीं, तो तिकडे नेण्यांत फायदा नाहीं. अमेरिकेंत एक औंस जेष्ठमध नेण्यास बरोबर नऊ औंस, पाणी न्यावें लागतें. हें पाणी हजारों कोसांवरून नेऊन देशांत आणून

आटवितात. जेष्ठमधाचा उपयोग जे करतात त्यांना हें पाणी नेण्याचा खर्च द्यावा लागतो. हा खर्च व्यर्थ होय.

**स्वदेशांतील उद्योगांस उत्तेजन यावें ह्मणून सरकारांतून देणगी देतात तिच्या परिणामाचें उदाहरण.** हल्लीं उत्तम प्रकारची सफेत साखर इंग्लंडांत फारशी होत नाहीं; ती बहुतेक फ्रान्स देशांतून येते. याचें कारण इंग्लंडांत पूर्वी जी साखर होत होती त्याहून फ्रेंच साखर चांगली किंवा स्वस्त असते अशी गोष्ट नव्हे. परंतु ती स्वस्त विकते याचें कारण असें कीं, परदेशीं पाठविलेल्या सर्व साखरेस फ्रेंच सरकार देणगी देतें. या देणगीमुळें इंग्लिश व्यापाऱ्यांपेक्षां फ्रेंच व्यापाऱ्यांस साखर स्वस्त विकतां येते. ह्मणून क्लाईड नदीवर व ब्रिस्टल शहरीं जे मोठे साखरेचे कारखाने होते ते बंद पडले, व त्यांतील भांडवल व मजूर यांनीं दुसरा उद्योग पाहिला. फ्रेंच सरकारच्या देणगीनें इंग्लिश उद्योगास कायमचा धक्का कांहींच बसला नाहीं, परंतु त्या सरकारानें घरच्या उद्योगास आश्रय दिल्यानें इतकेंच झालें कीं, सर्व इंग्लिश राष्ट्रास साखर मूळखर्चाहून स्वस्त मिळण्याकरितां सर्व फ्रेंच राष्ट्रावर कर बसला.

**रेलवेची सुरवात करण्यासंबंधानें संरक्षक काय ह्मणतील?** आगगाडीचा प्रवास सुरू झाला त्यावेळीं टप्याच्या गाड्यांचे मालक, व गाडीवान यांनीं संरक्षणाची सबब चांगली लढविली असती. ते ह्मणते कीं, आगगाडीचे रस्ते केल्यास शेंकडों लोकांचें काम बंद होईल; गाड्यांचे मालक व रस्त्यावरील खाणावळवाले बुडतील, राष्ट्राचा स्वभाव खराब होईल, व थोड्याच दिवसांत घोड्यांची जात नाहींशी होईल. ह्या सर्व गोष्टींचा उच्चार झाला असेल परंतु तो व्यर्थ. सर्व समाजाच्या मानानें गाड्या हांकणारे, गाड्यांचे मालक व खाणावळ-

वरच्या होडीवाल्यांनी अर्ज केला होता कीं, लंडन शहरांतील बगीवाल्यांस फक्त दक्षिणोत्तर बाजूस भाडें करण्याची परवानगी असावी, ह्मणजे पूर्वपश्चिम ज्यांस जावयाचें असेल त्यांस होड्यांतूनच जाणें भाग पडेल.

**मेणबत्या करणारांचा अर्ज.** पुढील गोष्टींत बास्तियात साहेबानें संरक्षणाचा अप्रयोजकपणा चांगला दाखविला आहे.

## मेणबत्त्या करणारांचा अर्ज.

मेणबत्त्या, दिवे, मेणबत्तीचीं झाडें, रस्त्यांतील कंदील, दिवे, मालविण्याची झांकणें करणारे, व तेली, चरबीवाले, राळ व अलकोहाळ करणारे, आणि रोषनाई संबंधानें सर्व प्रकारचे जिन्नस तयार करणारे यांचा अर्ज खालीं लिहिल्याप्रमाणें:—

प्रतिनिधी मंडळांतील सभासदांचे हुजुरास. सभ्यगृहस्थहो, आमच्यावर एक प्रतिस्पर्धी उठला आहे, त्यापासून आह्मांस इतकें दुःख सोसावें लागत आहे कीं, तें आह्मांस सहन होत नाहीं. हा आमचा शत्रु प्रकाश उत्पन्न करण्याच्या कामांत आह्मांहून फार श्रेष्ठ असून तो इतक्या स्वल्प किमतीस आमच्या सर्व राष्ट्रास प्रकाशाचा पूर आणून देतो कीं त्याचें नवल वाटतें. तो दिसला कीं आमचा धंदा बंद पडला. ज्यांना प्रकाश पाहिजे ते त्यापासून घेतात, त्यामुळें आमचा व्यापार देशभर पसरला आहे तो एकदम बसून जातो. हा शत्रु सूर्याखेरीज दुसरा कोण असणार? याच्यापासून आह्मांस फार जाच होत आहे, व त्यास त्या लबाड अलबियन बेटानें आह्मांवर उठविला आहे असें आह्मांस

वाटतें; कारण त्या बेटाशीं तो जसा बेताबातानें वागतो तसा आह्मांबरोबर वागत नाहीं.

आमचा अर्ज असा आहे कीं, लोकांनीं आपल्या घराच्या खिडक्या, झरोकीं, साणीं, आंतील व बाहेरील दारें, पडदे, छावण्या, सारांश सर्व प्रकारचीं छिद्रें, चिरा वगैरे ज्यांज्यांमधून सूर्याचा प्रकाश घरांत आणितां येतो तीं सर्व बंद करावीं असा कायदा आपण करावा. कारण आमच्या सारखे कसबी कारखानदार जी देशाची सेवा करीत आहेत त्यावर पाणी पडत आहे. याकरितां देशानें कृतज्ञ होऊन आह्मांस प्रबळ शत्रूच्या हातीं देऊं नये.

आमचा अर्ज मान्य होण्याविषयींचीं कारणें खालीं दाखविलीं आहेत. पहिलें आपल्या हातून होईल तितक्या प्रकारांनीं स्वाभाविक उजेड बंद करून कृत्रिम प्रकाशाची अपेक्षा उत्पन्न केल्यास फ्रान्सदेशच्या कोणत्या ह्मणून कारखान्यास उत्तेजन येणार नाहीं ?

चरबीचा खप जर ज्यास्त झाला तर बैल आणि मेंढ्या वाढतील; यामुळें नवीन कुरणें होऊन मांस, लोंकर, कातडीं या जिनसांची वृद्धि होईल; आणि शेतीचें उत्पन्न वाढण्यास अवश्य जें खत तें विपुल होईल.

जर अधिक तेल खपलें तर भुइमूग, तीळ, करडे व नारळ यांची लागवड वाढेल. यांच्या पिकानें जमीनीचा जो कस कमी होईल तो भरून काढण्यास गुराढोरांची वृद्धि वेळेवर होणारी आहे.

आपल्या रानांतून राळेचीं झाडें होतील. मधमाशांचे थवेचेथवे चोहोंकडे पुष्परस गोळा करून पोळीं घालतील. शेतीसंबंधाच्या सर्व धंद्यांची भरभराट होईल.

हीच सूचना नौकागमनास लागू आहे. व्हेलमासे पकडण्याकरितां हजारो गलबतें जातील, आणि अल्पकाळांत आपलें आरमार असें तयार होईल कीं, कठीण प्रसंगीं तें फ्रान्स देशाचें नांव राखील, व अर्जदारांच्या स्वदेशाभिमानाची इच्छा तृप्त होईल.

आतां कलाकौशल्याच्या वस्तूंसंबंधानें तर आह्मीं काय लिहावें ? इतःपर मुलामे केलेल्या निरनिराळ्या धातूंच्या वस्तु, बिलोरी काम, वालशेड, झुंबरें दिवे वगैरे जिनसांनीं वखारी भरून जातील. त्यांशीं हल्लींच्या वखारी ताडून पाहिल्यास त्या केवळ दुकानांप्रमाणें भासतील.

समुद्रकिनाऱ्यावरील उंच ठिकाणचा रेसीनियर व दगडी कोळशांच्या खाणींतील कामाठी अधिक वेतन मिळवून सुखी होईल.

सभ्यगृहस्थहो, आपण दयाळु होऊन किंचित् लक्ष पुरवाल तर आपली खात्री होईल कीं, आमच्या अर्जास यश आल्यास दगडी कोळशांच्या श्रीमान् मालकापासून तहत गरीब आगकाड्याविक्यापर्यंत सर्व फ्रेंच लोकांची स्थिति सुधारेल. आपण जर असें ह्मणाल कीं, सूर्याचा प्रकाश हा आपणास सृष्टीची उदार देणगी आहे, व देणगी टाकून देणें ह्मणजे धनसंपादन करण्याच्या मिषानें त्यावरच लाथ मारणें होय, तर आमची हीच सूचना आहे कीं, आपण आपल्या नेहमीच्या पद्धतीचा नाश कराल, याविषयीं सावधगिरी ठेवावी. हें ध्यानांत असूंद्या कीं, आजपर्यंत आपण सतत परदेशी माल परत लावीत आलां आहांत, कारण स्वदेशांत तयार झालेल्या जिनसापेक्षां तो माल अंशतः फुकट मिळतो. इतर मक्तेदारांच्या मागण्या मान्य करण्यांत आपली अर्धीमुर्दी कळकळ दिसून येते, आणि आमच्या

मागण्यास इतरांपेक्षां अधिक सबळ आधार आहे, एवढ्यावरूनच आपण जर आमचें मागणें अमान्य कराल तर, +×+=−; या समीकरणाचा स्वीकार केल्यासारखें होईल; ह्मणजे असंबद्धपणाचा कळस होईल.

माल उत्पन्न करण्याचे कामांत सृष्टिक्रम आणि मनुष्याचा श्रम यांचा संयोग निरनिराळ्या प्रमाणानें होतो. हें प्रमाण जमीन व हवा यांवर अवलंबून असतें. सृष्टिक्रमाकडून जें काम होतें तें फुकटचें असतें; मनुष्यश्रमानें जें काम होतें त्याला मोल असतें, ह्मणून त्यास किंमत येते. नारिंगास पारीस शहरापेक्षां लिसबोन शहरीं निम्मी किंमत पडते, कारण दुसऱ्या शहरीं स्वाभाविक ह्मणजे फुकटची उष्णता मिळते, व पहिल्या शहरीं कृत्रिम उष्णता करावी लागते; ह्मणून, तिला खर्च येतो. जेव्हां आपणाकडे पोर्तुगालचें नारिंग येतें, तेव्हां असें मानतां येईल कीं, त्याचा कांहीं अंश फुकटचा व कांहीं श्रमाचा आहे; ह्मणजे पारीसच्या नारिंगाशीं ताडून पहातां तें आपणास निम्म्या किंमतीस मिळतें.

आतां हा जो फुकट (या शब्दाची माफी असावी) मिळणारा अर्धा भाग तोच बंद करावा असें आमचें ह्मणणें आहे. आपण ह्मणतां कीं आमच्या लोकांस सर्व मेहनत करावी लागते, व परदेशास सूर्याचें साह्य मिळाल्यानें त्याची अर्धी मेहनत वांचते, तेव्हां परदेशाशीं आपणास चढाओढ कशी करतां येईल ? परंतु हा अर्धा भाग फुकटचा आहे ह्मणून जर आपण परदेशची चढाओढ दूर करतां, तर ज्या ठिकाणीं सर्व भाग फुकटचा आहे तेथें आपण चढाओढीस सवड कां ठेवावी ? जी वस्तु अर्धी फुकट मिळते ती स्वदेशाच्या उद्योगास हानि करणारी आहे असें मानून ती आपण आंत येऊं देत नाहीं, हें

आपलें करणें जर योग्य आहे तर, जी वस्तु सर्वस्वी फुकट मिळते, ती देशाबाहेर घालविण्यास आपण अधिक आवेशानें झटावें. आणखी असें कीं, दगडी कोळसा, लोखंड, धान्य, चिटें वगैरे जिन्नस जेव्हां परदेशाहून येतात, आणि ते स्वतः तयार केल्यापेक्षां कमी श्रमानें ते आपल्यास मिळतात, तेव्हां त्यांतील फरक तेवढा आपल्यास फुकट पडल्यासारखा होतो. हा फरक जसा अधिकउणा असेल त्यामानानें आपल्यास मिळालेली देणगी लहान मोठी असणार. जर दाता ( सूर्य ) आपल्या ( प्रकाशरूप ) देणगीबद्दल कांहींच मागत नाहीं तर तो फरक मुळींच नाहींसा होऊन देणगी पूर्ण होते. आमचा प्रश्न असा आहे कीं, आपल्या देशास धन अनायासें मिळावें किंवा तें श्रमानें उत्पन्न करून त्याच्या वृद्धीपासून कांहीं तरी खोटे नाटे फायदे दाखवावे अशी आपली इच्छा आहे काय ? कोणतीही गोष्ट पत्करा परंतु ती शेवटास न्या. कारण जोंवर शून्याजवळजवळ येणाऱ्या किंमतीच्या जिनसा आपण देशांत येऊं देत नाहीं, तोंवर ज्या जिनसाची ह्मणजे सूर्यप्रकाशाची किंमत सर्व दिवसभर शून्यच आहे तो घरांत येऊं देणें हें युक्तीस जुळत नाहीं.

**अदलाबदल केलेल्या मालाचा खर्च त्या त्या देशांत वेगवेगळा असेल तेव्हांच परदेशीव्यापार दोहोंस फायदेशीर होईल.** येथपर्यंत खुल्या व्यापाराचीं साधारण मूलतत्वें व परदेशीव्यापारापासून राष्ट्रास होणारे फायदे सांगण्यांत आले. फ्रान्स व इंग्लंड अशा दोन देशांनीं मालाची अदलाबदल केल्याचा परिणाम काय होतो त्याचा आतां शोध करूं. पहिल्यानें हें ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं, एका जिनसाची बदल दुसऱ्या जिनसाशीं होण्यास त्या दोहोंचें सांबंधिक मोल दोन्ही

देशांत भिन्न असलें पाहिजे, तरच त्याची देवघेव करण्यांत नफा होईल. एकादेशांत दुसऱ्या देशापेक्षां दोन्ही जिन्नस स्वस्त असतील, परंतु त्यांचा सांबंधिक खर्च भिन्न असल्याखेरीज त्यांची अदलाबदल होणार नाहीं. उदाहरणार्थ हातमोजे व मद्य हे दोन्ही जिन्नस इंग्लंडापेक्षां फ्रान्सदेशांत स्वस्त असतील; ह्मणून मद्य घेण्याकरितां फ्रान्सांतून हातमोजे इंग्लंडाकडे जाणार नाहींत हें उघड दिसतें. परंतु कल्पना करा कीं फ्रान्सांत हातमोज्यांच्या चारजोड्यांचें मोल एक ग्यालन दारू बरोबर आहे, आणि इंग्लंडांत हातमोज्यांच्या चार जोड्यांस सव्वा ग्यालन दारू येते. याठिकाणीं फ्रेंच हातमोजेवाल्यास चार चार जोड्यांवर पाव ग्यालन दारू मिळेल, ह्मणून ही देवघेव दोहों देशांस फायदेशीर आहे. आतां हातमोजे व दारू यांचें सांबंधिक मोल देशांत सारखेंच असेल तर ह्या जिनसांची देवघेव होणार नाहीं. पायमोज्यांच्या चार जोड्यांस फ्रान्स व इंग्लंड या दोन्ही देशांत जर एक ग्यालन दारू मिळत असेल, तर फ्रान्स देशाचा हातमोजेवाला इंग्लिश दारूच्या व्यापाऱ्याबरोबर अदलाबदल करणार नाहीं. कारण, असें करण्यांत त्याला कांहीं मिळणार नाहीं. आतां हें सिद्ध झालें कीं, अदलाबदल करणाऱ्या देशांत जिनसांचा सांबंधिक खर्च भिन्न असला पाहिजे. परंतु हा भेद किती असला पाहिजे हें अद्यापि ठरलें नाहीं. हा भेद निदान इतका तरी पाहिजे कीं, जिन्नस एका देशाहून दुसऱ्या देशास नेण्याचा खर्च भागून माल रवाना करणारास कांहीं नफा झाला पाहिजे. कारण स्वदेशांत माल खपविण्यापेक्षां तो परदेशांत पाठविल्यानें त्यास ज्यास्त किंमत आल्याखेरीज कोणी व्यापारी तो रवाना करण्याचे श्रम व जोखीम घेणार नाहीं.

अदलाबदलीच्या अटी, अपेक्षा आणि पुरवठा यांच्या समीकरणानें ठरतात. जिनसांच्या सांबंधिक मोलांतील कमींत कमी फरक किती असावा हें सांगितलें; परंतु केव्हां केव्हां हा फरक, माल नेण्याचा खर्च व पाठविणाराचा साधारण नफा हे जाऊन अधिक होतो. उदाहरणार्थ कल्पना करा कीं, फ्रान्स देशांत एक टन दगडी कोळशास एक क्वारटर गहूं मिळतात, आणि याच वेळीं इंग्लंडांत एक टन कोळशास एक तृतीयांश क्वारटर गहूं येतात. आपण असें धरूं कीं, इंग्लंडांतील कोळशाचा व्यापारी स्वदेशांत एक टन कोळसा देऊन एक तृतीयांश क्वारटर गहूं मिळाल्यास खुष असतो; परंतु फ्रान्स देशांत आपल्या कोळशास तिप्पट गहूं मिळतील असें त्यानें ऐकलें ह्मणजे आपला माल तिकडे पाठविण्याचा तो निश्चय करतो. प्रश्न असा निघतो कीं, दोन तृतीयांश क्वारटर गहूं हा जो नफा होतो तो आमच्या व्यापाऱ्यास फ्रान्सदेशीं पाठविलेल्या प्रत्येक टनावर मिळेल काय ? या प्रश्नाचें उत्तर दुसऱ्या खंडांतील विवेचनावरून देतां येईल. तेथें सांगितलें आहे कीं, जिनसाची किंमत, अपेक्षा आणि पुरवठा यांच्या समीकरणानें ठरते. आपण असें धरलें आहे कीं, इंग्लिश व्यापारी फ्रान्स देशास कोळसे पाठवितो व त्यांच्या बदली गहूं घेतो; या देवघेवीनें इंग्लंडांत बाहेरील गव्हांचा पुरवठा वाढला, ह्मणून देशांतील गव्हांची अपेक्षा कमी झाली; ह्याच कारणामुळें फ्रान्सांत कोळशांची वृद्धि होऊन तेथील कोळशांची अपेक्षा कमी होते. दुसऱ्या खंडांत मोलाची उपपत्ति सांगतांना असें दाखविलें कीं, इतर गोष्टींत बदल न झाल्यास जिनसाची अपेक्षा वाढली ह्मणजे त्याची किंमत वाढते, आणि त्याची अपेक्षा कमी झाली ह्मणजे किंमत उतरते. ह्मणजे अपेक्षेशीं पुरवठा समान करून जिन-

साची किंमत ठरते असें ह्मणावयाचें. सबब हें उघड होतें कीं, इंग्लंड व फ्रान्स या देशांत कोळसे आणि गहूं यांची अदलाबदल होऊन दोन्ही देशांत या जिनसांची किंमत फिरते. इंग्लंडांत दगडी कोळशांची अपेक्षा वाढली ह्मणजे त्यांची किंमत वाढते, आणि गव्हांचा पुरवठा वाढला ह्मणजे त्यांची किंमत कमी होते, फ्रान्स देशांत याच्या उलट परिणाम होतो. तेथें कोळशांची किंमत उतरते व गव्हांची वाढते. आतां हें उघड आहे कीं, दोन्ही देशांतील देवघेव पूर्वींच्या कराराप्रमाणें होणार नाहीं. दोन्ही देशांत कोळशांच्या अदलाबदलीच्या सामर्थ्याचें अंतर $\frac{2}{3}$ राहणार नाहीं; इंग्लंडांत कोळशाचें अदलाबदलीचें मोल वाढून फ्रान्स देशांत कमी झालें असेल, व शेवटीं चढाओढ एकसारखी चालल्यास दोन्ही देशांत कोळसा आणि गहूं यांच्या किंमतींत इतकाच फरक राहील कीं, देशांतून माल नेण्याचा खर्च व पाठविणाराचा, धोक्याचा व श्रमाचा साधारण मोबदला हे भागावे. जिन्नस तयार करणारांत पूर्ण चढाओढ असल्यास त्याची किंमत शेवटीं मूळखर्चावर अवलंबून असते. बाहेरून आणलेल्या मालाच्या मूळखर्चांत तो आणण्याचा खर्च हा एक मुख्य भाग असतो. आयात आणि निर्यात मालावर जकात नसली ह्मणजे, भिन्न देशांत एकाच जिनसाच्या किंमतींत फरक असतो तो केवळ माल नेण्याचा खर्च होय. हें अधिक व्यक्त होण्यास अशीं दोन ठिकाणें घ्यावीं कीं, तेथें जिनसाची देवघेव करण्यास कायद्याचा कोणत्याही प्रकारचा प्रतिबंध नाहीं. उदाहरणार्थ लांकेशायरमध्यें कापसाचें कापड होतें, व लिंकनशायरमध्यें गहूं पिकतात. लिंकनशायर आणि लांकेशायर या परगण्यांत परकी मालाची देवघेव करण्यास मोकळीक नसल्यास गहूं आणि कापड यांच्या

सांबंधिक मोलांत पुष्कळ अंतर पडेल. परंतु लांकेशायर व लिंकनशायर येथें गहूं आणि कापड यांच्या किंमतींत इतकेंच अंतर आहे कीं, जिन्नस एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं नेण्याच्या खर्चाहून तें अधिक होणार नाहीं. राज्यक्रांतीच्या पूर्वी फ्रान्स देशांत संरक्षणमत इतकें प्रबळ होतें कीं, त्या देशांत एका प्रांतांतून दुसऱ्या प्रांतांत गहूं पाठवितां येत नसत. याचा परिणाम असा झाला कीं, ठिकठिकाणच्या किंमतींत फार तफावत असे; एकेठिकाणीं गहूं विपुल असून स्वस्त असत व दुसरीकडे पीक चांगलें आलें नसल्यास ते दुर्मिळ असून फारच महाग असत.

**बाहेर पाठविलेल्या मालाचा पुरवठा अपेक्षेशीं समान कसा होतो ?** बाहेर पाठविलेल्या जिनसांचा पुरवठा किंमत कमज्यास्त करून अपेक्षेशीं कोणत्या रीतीनें समान होतो, हें ठरविणें कठीण नाहीं. आपण वर असें घेतलें होतें कीं, इंग्लिश व्यापारी फ्रान्स देशास कोळसा पाठवून एका टनास एक क्वार्टर गहूं घेऊन पुष्कळ नफा काढतो. यावरून असें होईल कीं, त्यास पाठवितां येईल तितका कोळसा तो फ्रान्सास पाठवील; या व्यापारांत नफा फार होतो ह्मणून दुसरे व्यापारीही असेंच करतील. ह्या रीतीनें फ्रान्सांत कोळशाचा पुरवठा फार होतो, आणि तो खपावा ह्मणून कोळसा पाठविणाऱ्या व्यापाऱ्यास त्याची किंमत कमी करावी लागते; याच वेळीं इंग्लंडांत कोळशाचा पुरवठा कमी झाल्यामुळें तेथें त्याची किंमत चढते. ह्मणून परदेशीं कोळसा पाठविण्याची इच्छा दोन मार्गांनीं खुंटते. कोळशाचें मोल इंग्लंडांत वाढून फ्रान्सांत उतरतें; व्यापाऱ्यांस इंग्लंडापेक्षां फ्रान्स देशांत $\frac{2}{3}$ क्वार्टर गहूं मिळेनासे हो-

तात; कोळसे पाठवून देवघेव करण्यांत त्यांना एवढेंच मिळतें कीं, ते नेण्याचा खर्च भागून जोखमाचा कांहीं मोबदला मिळतो.

**परस्परानुवर्तन.** परदेशीव्यापारापासून देशास जो फायदा होतो त्यासंबंधानें लोकांत खोटा समज पुष्कळ आहे. कांहीं लोक ह्मणतात कीं दोन देशांत मालास मालाची अदलाबदल झाली पाहिजे; ह्मणजे कोणताही देश आपणाकडून तयार झालेले जिन्नस घेत नसला तर आपण त्याकडून कांहीं घेऊं नये. या तत्वास धरून राहणारेसुद्धां तें शेवटपर्यंत चालवीत नाहींत. चीन देशांतून आपण पुष्कळ चहा आणतों, त्याबदली चिनीलोक एकावेळीं कांहीं माल न घेतां मुख्यत्वेंकरून रुपेंच घेत; असें करण्यांत चिनीलोकांची चूक असेल पण त्यापासून आमचें नुकसान न होतां त्यांचेंच झालें. चिनीलोक आमच्यापासून शिल्पनिर्मित माल घेईपर्यंत आपण त्यांचा चहा घ्यावयाचा नव्हता असें, परस्परानुवर्तनाचा उपदेश करणारे ह्मणण्यास धजणार नाहींत.

**जेव्हां दोन देशांत व्यापार असतो, तेव्हां प्रत्येक देशाचा नफा आयात मालाच्या अपेक्षेशीं व्यस्त प्रमाणानें अधिकउणा असतो.** जेव्हां दोन देशांत मालाची देवघेव होते, तेव्हां परदेशाहून आणलेल्या मालाची गरज ज्या देशास कमी असते त्यास नफा फार होतो. जसें मागें सांगितलेल्या उदाहरणांत फ्रान्स देशांत कोळशाची अपेक्षा वाढली तर जे इंग्लिश व्यापारी बाहेरून कोळसे आणतात त्यांचा फायदा होईल; कोळशाचें मोल चढेल, आणि कोळसे आणविणारास मोबदला अधिक मिळेल. हें वाढलेलें मोल फार वेळ राहणार नाहीं, कारण पुरवठा वाढूं लागेल; मोल जर कायमचें

त्येक देशास आपलें भांडवल व श्रम विशेष फलद्रूप उद्योगांत घालतां येतात. असा प्रकार जितका घडेल त्याच्या मानानें भांडवल व श्रम यांचा खर्च कमी होऊन माल तयार होतो. यासंबंधानें मिल्ल साहेब ह्मणतो कीं, देशास व्यापारापासून काय फायदा होतो याविषयीं लोकांचा समज फार चुकीचा आहे. व्यापार हा राष्ट्राच्या धनाचें साधन असें बोलण्यांत येतें तेव्हां व्यापाऱ्यांनीं मिळविलेल्या मोठ्या संपत्तीकडे कल्पना धांवते, व ज्यांना जिनसाचा खप असतो त्यांची किंमत वांचते इकडे लक्ष पोंचत नाहीं. परंतु व्यापाऱ्यांस जेव्हां एखाद्या गोष्टीचा मक्ताच दिलेला नसतो, तेव्हां देशांतच भांडवलाचा उपयोग करून जी मिळकत होईल तितकीच त्यांची असते. व्यापार हा, माल स्वस्त करण्याचा एक मार्ग होय. या सर्व खटपटींत शेवटीं जिनसाचा उपभोग करणाऱ्याचा फायदा होतो. गिऱ्हाइकास कमी किंवा अधिक किंमतीस कसाही मिळाला तरी व्यापाऱ्याचा नफा कोठें जावयाचा नाहीं.

परदेश व्यापारापासून संपत्तिविषयक फायदे व्हावयाचे ते होऊन त्यापासून लोकांच्या नीतीवर व बुद्धीवर फार महत्त्वाचे परिणाम घडतात. व्यापाराच्या योगानें पृथ्वीवरील सर्व राष्ट्रांतील लोकांच्या परस्परांशीं भेटी होतात. व्यापार हा सुधारणा करणाऱ्या गोष्टींत श्रेष्ठ होय, व तो राष्ट्राराष्ट्रांत शांतता रहाण्यास मुख्य कारण होतो. त्याच्यायोगानें भिन्नभिन्न राष्ट्रांत दळणवळण पडून प्रत्येकास दुसऱ्याचे कायदे, संस्था आणि

परंतु प्रत्येक देशाचें कल्याण व भरभराट होण्यांत प्रत्येकाचें प्रत्यक्ष हित आहे.

खुल्या व्यापाराच्या शत्रूंचा एक मोठा मुद्दा आहे, तो हा कीं, जर कोणी राष्ट्र परदेशाशीं व्यापार करील तर बाहेर पाठविलेल्या मालाचें मोल चढेल व आयात मालाचें उतरेल. तत्वावरून, अनुमानावरून, व अनुभवावरून हें उघड होतें. निर्यात माल महाग होईल कारण त्याची अपेक्षा वाढते; आयात माल स्वस्त होईल कारण त्याचा पुरवठा वाढतो. अमेरिकेसारख्या देशाचा निर्यात माल मुख्यत्वेंकरून गहूं व दुसरें शेतीचें उत्पन्न असे अगत्याचे पदार्थ असतात, व त्याच्या मोबदला (संरक्षणमतवादी ह्मणतात कीं) दुर्मिळ मद्यें, मौल्यवान जर वगैरे चैनीच्या वस्तु देशांत येतात. आतां त्यांची तक्रार अशी कीं, परदेशव्यापारानें अवश्य जिनसांची किंमत वाढून चैनीच्या जिनसांची कमी होते ह्मणून तो व्यापार तोट्याचा होय. परंतु परदेशाशीं व्यापार करण्यापासून मुख्य फायदा हा होतो कीं, देशोदेशीं श्रमविभाग वाढून ज्या देशांत अमुक जिन्नस तयार करण्यास चांगल्या सोयी आहेत, त्याच देशांत ते होऊं लागतात ह्या गोष्टीस ही तक्रार मुळींच लागत नाहीं. अमेरिकेंत संरक्षणाचा परिणाम असा झाला आहे कीं, त्या देशास मोठ्या उत्पन्नाच्या उद्योगांतून कांहीं श्रम आणि भांडवल काढावें लागून कमी उत्पादक धंद्यांत घालावें लागलें. या तक्रारींतील हकीकत तरी अगदीं वास्तविक आहे असें ह्मणवत नाहीं. संयुक्त सं-

स्थानांत हल्लीं संरक्षणाची पद्धत सुरू आहे, आणि तेथल्या इतका जगांत कोणत्याही देशांत निर्वाहाचा खर्चही भारी नाहीं. परदेशी माल अगत्याचा असो किंवा चैनीचा असो त्यावर निर्दयपणानें जकात घेतात. कांहीं कांहीं जिनसांवर शेकडा १०० किंवा २०० इतका दंड आहे. परदेशी बूट व कापड चोपड यांवर जबर कर आहेत; असें असून युरोपखंडास धान्य व दुसरे खाण्याचे पदार्थ अधिकाधिक रवाना होत आहेत.

**अमेरिकेंतील संरक्षणाच्या परिणामाचा एक मासला.** मिस्तर वेल्स संयुक्त संस्थानांचे माजी रेविन्यू कमिशनर यांनीं सन १८७० सालीं एक रिपोर्ट प्रसिद्ध केला. तो खुल्या व्यापाराच्या प्रतिपक्ष्यांस अनुकूल नाहीं. वेल्स साहेबाचीं मतें फार वजनदार मानलीं पाहिजेत, कारण अधिकारावर जेव्हां त्याची नेमणूक झाली, तेव्हां तो संरक्षणमताचा पूर्ण अभिमानी होता, परंतु त्याच्या कारकीर्दींत त्याच्या अनुभवास ज्या गोष्टी आल्या त्यांवरून त्यास आपलीं मतें फिरवावीं लागलीं. त्याच्या रिपोर्टावरून असें दिसतें कीं, अमेरिकेंत जकाती भारी असून उद्योगावर त्यांचा मोठा बोजा पडला आहे. ह्या जकातीमुळें व्यापार कसा खालावतो हें पुढील उदाहरणावरून दिसतें. वेल्स साहेब ह्मणतो कीं, सन १८६९ त वायव्येकडील भागांतील एक हुशार गृहस्थ इंग्लंडास गेला. वरील सरोवरावरून धान्य नेण्यास सोयीचें असें एक लोखंडी जहाज तिकडून करवून आणण्याचा त्याचा बेत होता. परदेशीं बांधलेलीं जहाजें अमेरिकेंत नोंदणीस घेत नाहींत. ह्मणून त्यानें असें मनांत आणलें कीं, जहाजाचे निरनिराळे भाग फक्त मासल्याकरितां स्वदेशीं न्यावे, आणि कसबी कारागीर तिकडे नेऊन चिकागो शहराजवळ लोखंडी जहाजें बांधण्याचा कारखाना घालावा. परंतु ज-

लोखंडी गलबतें बांधण्याचा कारखाना नाहीं. अमेरिकेंतील थोड्या लोखंडवाल्यांस आश्रय देण्याकरितां सर्व लोकांवर कर बसविला आहे. कमिशनरच्या मतें अशाच प्रकारामुळें अमेरिकेंत जहाजें बांधण्याचा उद्योग कमी झाला असावा. वेल्स साहेब ह्मणतो कीं, मजुरी व पगार यांच्या दराच्या मानानें अमेरिकेंत निर्वाहाचा खर्च वाढत आहे; व लोकांस सुखोपभोग कमी होत आहे. याबद्दल त्यांस इतकें वाईट वाटत नाहीं, पण त्यांचें संग्रह करण्याचें सामर्थ्य कमी झालें ह्मणून त्यांची कुरकुर आहे. श्रीमान् लोक अधिक श्रीमान् होत आहेत व दरिद्र्यांचें दारिद्र्य वाढत आहे. भांडवलाच्या लहान लहान रकमा जमविण्याचें बंद झालें आहे. आपल्या उद्योगावर स्वतः लादलेल्या ओझ्यापासून अमेरिका निभावली आहे, यास कारण, तिचें स्वतःचेंच सामर्थ्य असें ह्मटलें पाहिजे. वर सांगितलेल्या गोष्टीवरून दिसून येतें कीं, संयुक्त संस्थानांत संरक्षणमताचें प्राबल्य, निर्वाहास लागणारे अगत्याचे पदार्थ महाग होऊं नयेत ह्मणून नाहीं. अन्नसामग्रीकरितां परदेशावर अवलंबून रहाण्याची आवश्यकता इंग्लंडास आहे, ह्मणून त्या देशानें खुला व्यापार सुरू केला आहे. ही आवश्यकता अमेरिकेंत नाहीं. खुल्या व्यापारापासून होणारे फायदे एकाएकीं तेथें दृष्टोत्पत्तीस येत नाहींत.

**निर्यात आणि आयात माल नेहमीं समान होण्याचा झोंक असतो.** या झोंकाविषयीं मिल्ल साहेब ह्मणतो कीं एका

देशाचें उत्पन्न पाठवून दुसऱ्या देशाचें उत्पन्न आणतांना मोल इतकें आलें पाहिजे कीं, त्यांचा निर्यात आणि आयात माल सारख्या मोलाचा होईल. किंवा दुसरीकडे त्यानें ह्मटलें आहे कीं, दोन देशांत निर्यात आणि आयात मालाची एकंदरींत बरोबरी झाली पाहिजे. आयात मालाबद्दलचें देणें हें देशास फार महत्त्वाचें जरी ऋण आहे, तरी देशांत घातलेल्या परकी भांडवलाचें व्याज वगैरे दुसरीं देणीं त्यास पुष्कळ असतात. फ्रान्स व इंग्लंड या दोन देशांत मालाची देवघेव जरी एकसारखी नसली तरी फ्रान्स देशास इंग्लिश लोकांनीं लाखों रुपये कर्ज दिलें आहे, यासाठीं त्या देशांतून इंग्लंडास नेहमींचा साधारण माल किंवा मौल्यवान् धातु आल्या पाहिजेत. सबब आयात व निर्यात मालाची बरोबरी होऊन कर्जाकरितां ह्मणून फ्रान्सांतून कांहीं अधिक आलें पाहिजे. आणखी एका प्रकारानें एक देश दुसऱ्याचा ऋणी होईल. दोन देश जेव्हां आपल्या मालाची देवघेव करतात तेव्हां जो देश, माल नेण्याआणण्याचें काम करीत असेल त्यास त्या कामाचा मोबदला मिळावा हें उघड आहे. मोघम ह्मटलें ह्मणजे इंग्लंड देश जगाचा माल नेण्याआणण्याचा व्यापार करतो, ह्मणून ज्या देशाशीं इंग्लंडाचा व्यापार आहे त्याचा निर्यात व आयात माल नेण्याआणण्याबद्दल तो इंग्लंड देशाचा ऋणी आहे. ह्मणून, इंग्लंडचा आयात माल नेहमीं निर्यात मालाहून अधिक असतो. आणि इंग्लिश लोकांनीं परदेशांस जरी कर्ज दिलें नाहीं, तरी अशी स्थिति राहील. या गोष्टीची फोड बरोबर होण्याकरितां आपण अशी कल्पना करूं कीं, क्रोमर येथें राहणारा एक शेतकरी नारविचच्या दलालाकडे वीस पौंड किंमतीचे गहूं पाठवून त्याजपासून तितक्याच किंमतीचें लांकडी सामान मागवितो.

असें ठरलें कीं शेतकऱ्यानें गहूं आपल्या गाडींतून पाठवावे व सामान घेऊन गाडी परत न्यावी. या उदाहरणांत आपण असें धरूं कीं, गहूं आणि सामान नेण्याआणण्याचा खर्च शेतकऱ्यास २ पौंड येतो. ह्मणून तो दलालास ह्मणतो कीं, मला कांहीं मिळाल्याखेरीज हा खर्च व त्रास मी सोसणार नाहीं. मग कदाचित् दलाल त्याला एक पौंड किंमतीचें अधिक सामान देऊं करील. तो ह्मणतो कीं हें ठीक होईल, कारण, तुला २१ पौंड किंमतीचें सामान मिळेल, व तूं मला वीस पौंडांचे गहूं देऊन गाडीखर्च भागवावा; असें केलें ह्मणजे आपणा प्रत्येकास गाडीखर्च निम्मा येईल. परंतु शेतकरी ह्मणाला "तसें कसें होईल? माझे गहूं तुह्मास पोंचतील तेव्हां त्यांची किंमत २१ पौंड होणार, ह्मणून मला एक पौंड किंमतीचें सामान देऊन तें तुह्मीं आपल्या खर्चानें मजकडे पोंचतें केलें पाहिजे." शेतकरी जर काटेखोर असेल तर तो आपलें मागणें दलालास कबूल करावयास लावील, आणि आपल्या २० पौंडांच्या गव्हांस तो २२ पौंडांचें सामान काढील. ह्मणजे असें ह्मणावयाचें कीं, त्याचा आयात माल निर्यात मालापेक्षां शेंकडा १० नें वाढेल. याचप्रमाणें जो देश आयात व निर्यात मालाचें आणणें नेणें करतो, त्यास त्या कामाबद्दल आपल्या निर्यात मालावर अधिक मोलाचा आयात माल मिळतो. आज कित्येक वर्षेंपर्यंत इंग्लंडचा आयात माल, निर्यात मालापेक्षां १०००००००० पौंडांनीं अधिक झाला आहे. सन १८८१ पर्यंतच्या चार वर्षांत इंग्लंडचा आयात माल, निर्यात मालापेक्षां ११५०००००० पौंडांनीं अधिक झाला. या अधिक मालांत नेण्याआणण्याचा खर्च असून, इंग्लिश लोकांनीं परदेशांस दिलेल्या कर्जाचें कांहीं व्याज असेल असें समजलें पाहिजे. त्यापैकीं कांहीं भाग इं-

ग्लिश लोकांनीं परदेशांतील भांडवल परत घेतल्याचाही असेल. ह्मणून कोणत्याही देशाचा परदेशाशीं व्यापार समसमान होतो तें ठिकाण, जेथें निर्यात व आयात माल सारखा होतो तें नसून, जेथें कसाही निर्यात माल, त्या देशाचीं सर्व देणीं भागविण्यास पुरे असतो तें होय. प्रतिकारक गोष्टी जरी आड येत असल्या तरी पहिल्यानें सांगितलेला मुख्य सिद्धांत खोटा होत नाहीं कीं, देशाचा निर्यात आणि आयात माल समान होऊं पाहतो. ही त्याची प्रवृत्ति कशी होते, हें पुढील दृष्टांतावरून समजेल. अशी कल्पना करूं कीं, इंग्लंडचा बाहेरचा सर्व व्यापार फ्रान्स देशाशीं होतो, आणि अमुक एका वर्षांत इंग्लंडांतून फ्रान्सामध्यें गेलेल्या मालापेक्षां फ्रान्सांतून इंग्लंडांत माल अधिक गेला. या ठिकाणीं इंग्लंडानें फ्रान्साचें देणें आहे, व हें देणें फेडण्याकरितां इंग्लंडाहून फ्रान्सास पैसा पाठविला पाहिजे; या रीतीनें फ्रान्सांत पैशाचा पुरवठा अधिक होऊन इंग्लंडांत कमी होईल. खंड २ भाग ४ यांत दाखविलें कीं, पैशाचें मोल, इतर जिनसांप्रमाणेंच ह्मणजे अपेक्षा व पुरवठा यांचें समीकरण होऊन ठरतें. ह्मणून फ्रान्सांत नाण्याची वृद्धि झाल्यामुळें पैशाची किंमत उतरेल व किंमती चढतील; इकडे इंग्लंडांत नाणें बाहेर गेल्यामुळें पैशाची किंमत वाढून किंमती उतरतील. पैशाचें मोल बदलल्यापासून दोन्ही देशांवर काय परिणाम झाला याचा विचार आतां आपण करूं. फ्रान्स देशांत किंमती भारी येऊं लागल्यामुळें तिकडे इंग्लंडांतून माल अधिक जाईल. माल स्वदेशांत विकण्यापेक्षां फ्रान्साकडे पाठवावा असें इंग्लिश व्यापाऱ्यांस वाटेल, कारण आपल्या देशापेक्षां फ्रान्सांत त्यांना अधिक किंमत मिळेल याच कारणाकरितां फ्रेंच व्यापारी इंग्लंडास माल न पाठवितां स्वदेशांतच विकतील. या रीतीनें इं-

ग्लंडचा माल फ्रान्स देशाकडे अधिक जाईल, आणि फ्रान्सचा इंग्लंडास कमी येईल; मग इंग्लंडच्या आयात व निर्यात मालांत समता राहील.

**व्यापाराचें तराजूं, प्रतिकूल अदलाबदल, या शब्दांचे अर्थ.** व्यापारी मत जेव्हां प्रबळ होतें, तेव्हां एखाद्या देशाच्या निर्यात मालाचा कांहीं अंश नाणें किंवा मौल्यवान धातूचा असला, ह्मणजे त्या देशावर मोठें दुर्दैव आलें असें समजत. ज्या देशानें नाणें किंवा मौल्यवान धातु परदेशीं पाठविल्या त्या देशाचें तितकें नुकसान झालें असें खरोखर समजत. आयात मालाबद्दल एखाद्या राष्ट्रास सोनें किंवा रुपें देण्याचा प्रसंग आला, ह्मणजे व्यापाराचें तराजूं त्या त्या राष्ट्राच्या विरुद्ध आहे असें ह्मणत, व त्या राष्ट्रानें जी अदलाबदल केली ती प्रतिकूल असें ह्मणत. चालू शतकाच्या अनुभवानें हा समज चुकीचा ठरला असून, यांतील विचार घोटाळ्याचा असें सिद्ध झालें आहे. हल्लीं ज्या देशांत सोनें पिकतें, तेथून तें दुसऱ्या जिनसांप्रमाणें परदेशीं रवाना होतें; व आस्ट्रेलिया आणि क्यालिफोर्निया देशांची वृद्धि आणि भरभराट ही प्रसिद्ध आहे, परंतु ही भरभराट त्या देशांनीं आपलें सोनें देऊन परदेशाचा माल जसजसा घेतला तशी झाली आहे. एका देशानें सोनें व रुपें परदेशीं पाठविलें तर त्या देशाचा तितका तोटा झाला असें मानणें ह्मणजे प्रत्येक मनुष्य जो एक आण्याचा जिन्नस खरेदी करतो त्यानें ह्या देवघेवींत एक आणा गमावला असें मानणें होय.

देशादेशांतून मौल्यवान धातु नेण्याआणण्याचा त्रास वांचावा ह्मणून ज्या गोष्टीची योजना करितात तिची फोड पुढें पत या भागांत केली आहे.

## १ ल्या भागावर प्रश्न. परदेशीव्यापार.

१. परदेशीव्यापारापासून मोठा फायदा कोणता ?

२. ह्या फायद्याचीं उदाहरणें द्या.

३. संरक्षण ह्मणजे काय आणि संरक्षक परदेशीव्यापाराच्या आड येतात त्यास ते कोणती सबब दाखवितात ?

४. परदेशाशीं चढाओढ करण्यांत जे उद्योग टिकणार नाहींत त्यांचा आश्रय काढून घेतल्यास काय होईल ?

५. परदेशाची चढाओढ होऊं नये ह्मणून ज्या उद्योगास आश्रय द्यावयाचा, व आश्रयावांचून जो धंदा चाललाच नसता, त्यास आश्रय दिल्यानें राष्ट्राचा एकंदरींत नफा किंवा तोटा होतो ?

६. संरक्षक कोणत्या मोठ्या वर्गाकडे दुर्लक्ष करतात ?

७. निर्वाहास लागणाऱ्या अवश्य पदार्थांपैकीं एखादा स्वस्त झाल्यास वेतनावर काय परिणाम होतो तो सांगा.

८. मूळ खर्च कमी झाला तर भांडवलाचा संग्रह होण्यावर काय परिणाम होतो ?

९. रेलवेच्या प्रवासास संरक्षणमतवाद्याचे विचार लावून दाखवा.

१०. मेणबत्त्या करणारांच्या अर्जांतील मुद्दे संक्षिप्त रीतीनें सांगा.

११. कोणत्या प्रसंगीं दोन देशांस मालाची देवघेव फायदेशीर होईल ?

१२. अदलाबदल केलेल्या मालाच्या सांबंधिक मोलांत कमीत कमी किती फरक असला पाहिजे ?

१३. अवश्य फरक असला पाहिजे त्याहून अधिक झाला तर अदलाबदलीच्या अटी कशा ठरतात ?

१४. निर्यात आणि आयात मालाच्या किंमतींत परदेशी-व्यापारानें कसा फरक होतो ?

१५. परदेशीव्यापारास मुळींच प्रतिबंध नसला तरी कोणत्या गोष्टीमुळें भिन्न प्रांतांत कांहीं जिनसांची किंमत भिन्न राहील ?

१६. राज्यक्रांतीच्या पूर्वी फ्रान्सांत संरक्षणमत कोठपर्यंत पोंचलें होतें ?

१७. परकी मालाची अपेक्षा आणि त्याचा पुरवठा कसा होतो हें दाखवा.

१८. परस्परानुगमन कशास ह्मणतात ? कांहीं ठिकाणीं परस्परानुगमन घडणें कठीण असतें त्याचें एक उदाहरण द्या.

१९. ज्या दोन देशांत मालाची अदलाबदल होते त्या प्रत्येकास झालेल्या फायद्याची रक्कम कशावरून ठरते ?

२०. परदेशीव्यापारापासून मुख्यत्वेंकरून फायदा कोणास होतो ?

२१. संरक्षकांचा मोठा मुद्दा कोणता आहे ?

२२. या मुद्यांत परदेशीव्यापारापासून होणारा मुख्य फायदा कोणता लक्षांत आणलेला नाहीं ?

२३. या मुद्यास खऱ्या गोष्टींचा आधार आहे काय ?

२४. उदाहरण घेऊन असें दाखवा कीं, धंद्यास आश्रय देण्याकरितां ठेवलेल्या जकातीपासून उद्योगांचा ऱ्हास होतो.

२५. निर्वाहाचा खर्च वाढल्यामुळें संयुक्त संस्थानांच्या सर्व लोकांवर अमुक परिणाम होत आहे असें ह्मणण्यास काय आधार आहे तो सांगा.

२६. अमेरिकेच्या अगोदर इंग्लंडास परदेशी व्यापाराचे फायदे समजून आले याचें कारण काय असावें ?

२७. कोणत्याही देशाचा निर्यात आणि आयात माल समान

रहाण्याचा जो झोंक असतो त्याचें वर्णन करा; आणि यास प्रतिकारक कोणत्या गोष्टी असतात त्या सांगा.

२८. परदेशीं नाणें रवाना करणें व मौल्यवान धातु रवाना करणें यांत भेद काय ?

२९. व्यापाराचें तराजू ह्मणजे काय, आणि प्रतिकूळ अदलाबदल ह्मणजे काय ?

३०. जो देश परदेशास सोनें व रुपें पाठवितो त्यांच्या मोलाइतका त्याचा तोटा होतो असें मानणें अप्रयोजक आहे असें दाखवा.

---

१. इंग्लंडांत चहा, तंबाकू, दारू आणि दुसऱ्या कांहीं आयात मालावर जकाती आहेत; ह्या आश्रयाकरितां आहेत असें ह्मणतां येईल काय ?

२. एका खेडेगांवांत एकच हात असलेला चांभार आहे. बाहेर मिळतात त्यापेक्षां त्याचे जोडे वाईट असून महाग पडतात. आपल्या खेडेगांवच्या उद्योगास उत्तेजन येण्याकरितां खेड्याच्या अधिकाऱ्यांनीं जर बाहेरच्या जोड्यांवर कर बसविला तर हें संरक्षणमतास अनुसरून आहे कीं नाहीं ? याचे खेड्यांतील लोकांवर काय परिणाम होतील ते सांगा.

३. अमेरिकेमध्यें खुल्या व्यापाराच्या तर्फेचे लोक पश्चिमेकडील धान्य पिकविणाऱ्या प्रांतीं किंवा कारखाने असलेल्या प्रांतीं असावेत ते सांगा, व त्याबद्दल तुमचीं कारणें सांगा.

४. आस्ट्रेलियासारख्या देशास कलाकौशल्यापेक्षां शेती अधिक फायदेशीर कां असते ?

५. जेथें सोनें विपुल पिकतें त्या देशास परदेशचा माल विकत घेण्याचा अगदीं प्रतिबंध असला तर काय परिणाम होतील ते सांगा.

---

# भाग २.

## पत आणि तिचें किंमतीवर वजन.

**पतीची व्याख्या.** पत ह्मणजे कर्ज काढण्याचें सामर्थ्य. कोणामनुष्याची पत चांगली आहे, ह्मणजे घेतलेला पैसा देण्यास तो समर्थ आहे, ह्मणून त्यास हलक्या व्याजानें कर्ज मिळतें. मनुष्याची जर पत नाहीं, तर भारी व्याज दिल्याखेरीज त्याला पैसा मिळत नाहीं; कारण, त्याजकडून पैसा परत येईल कीं नाहीं याचा संशय असतो. एकाच देशांत एकाच वेळीं निरनिराळ्या मनुष्यांची पत पाहणें असल्यास ते दुसऱ्याकडून घेतलेल्या पैक्यास व्याज किती देतात हें पाहिलें ह्मणजे झालें. टैम्स वर्तमानपत्रांत जेव्हां असें लिहिलें असतें कीं, तीन महिन्यांच्या उत्तमाबिलाच्या व्याजाचा दर ३$\frac{3}{4}$ आहे, ह्मणजे त्याचा अर्थ असा कीं, ज्यांच्याकडून पैसा परत येईल अशी पक्की खात्री आहे त्यांना व्याज शेंकडा २$\frac{3}{4}$ पडतें. यांच्याहून ज्यांच्याविषयीं कमी खात्री असते ते अधिक व्याज देतात. ही गोष्ट राष्ट्रांना सर्वस्वी लागू नाहीं. फेड करण्याचे सामर्थ्याचा परिणाम व्यक्तीवर होतो तसा राष्ट्रावरही होतो. तुर्कीची पत फार वाईट आहे. तुर्कीसरकार पुष्कळ वर्षें आपल्या कर्जावर शेंकडा १२ प्रमाणें व्याज देत होतें. सन १८७५ सालीं तुर्कीसरकारानें आपलें दिवाळें जाहीर केलें तें असें कीं, सरकारास कर्ज दिलेल्या लोकांस फक्त निमें व्याज मिळेल व तें निमेही तयार नव्हतें. तुर्कीच्या कर्जरोख्याची किंमत हल्लीं इतकी झाली आहे कीं, तें कर्ज जर फिटलें तर त्या रोख्यावर शेंकडा ५० पौंडांवर मिळेल. सन १८८४ च्या मार्च महिन्याच्या २८ वे तारखेच्या टैम्सपत्रांत तुर्कीच्या १०० पौंडांच्या रोख्यावर ८ पौंड १० शिलिंग किंमत येते असें लिहिलें आहे. या

रोख्याचा व्याजाचा दर शेंकडा ५ आहे. या किंमतीवरून असें दिसतें कीं, तुर्कीसरकार व्याजाची फेड करील अशी सावकारास आशा नसते. स्पेनदेशच्या रोख्यास शेंकडा ७ व्याज येतें. गेल्या थोड्या वर्षांत स्पेनची पत वाढली आहे, कारण सन १८८० त त्याच रोख्यास शेंकडा १७ प्रमाणें मिळत. इंग्लिशफंडांत शेंकडा ३ हून कांहीं कमी मिळतें. परंतु पुष्कळ वेळां असें घडतें कीं, दोन देशांचें कर्ज फेडण्याचें सामर्थ्य सारखेंच असून तेथील व्याजाच्या दरांत बराच फरक असतो. वारंवार सांगण्यांत आलें आहे कीं, व्याजाचा दर मालमत्तेचा सुरक्षितपणा व कर्जदेणाराचें जोखीम यांच्या मानावर असतो, परंतु तो लागवडीच्या मर्यादेवरही अवलंबून असतो. या गोष्टीमुळेंच इंग्लंडांत व्याजाचा दर शेंकडा ३ हून कमी आहे, व अमेरिकेंत तो अधिक आहे, ह्मणून इंग्लंडाची पत अमेरिकेपेक्षां चांगली असें ह्मणणें योग्य होणार नाहीं. ह्या फरकाचें कारण अंशतः असें दाखवितां येईल कीं, ह्या दोन देशांतील लागवडीची मर्यादा निरनिराळी आहे. इंग्लंडांत जमीन गहाण देऊन शेंकडा ४ टक्के व्याजानें पैसा मिळतो, परंतु अमेरिकेंत जमीन गहाणावर सुद्धां ७ टक्यांहून कमी व्याजानें पैसा मिळत नाहीं. कोणताही देश आपल्या कर्जावर जें व्याज देतो त्याच्या दरावरून त्या देशाची पत बरोबर समजणार नाहीं. देशाचें जें कर्ज फेडण्याचें सामर्थ्य असेल त्याचा परिणाम व्याजाच्या दरावर पडतो हें जरी खरें आहे, तरी फेडण्याची ऐपत सारखी असून, लागवडीच्या मर्यादेचा उत्पादकपणा जसा कमज्यास्त असेल त्या मानानें भिन्न देशांत व्याजाचा दर भिन्न असतो.

**पत हीच भांडवल होय असें ह्मणणें निरर्थक आहे.** केव्हां केव्हां असें ह्मणतात कीं, पत ही भांडवल आहे. शब्दा-

च्या अर्थाचा थोडा विचार केल्यास असें ह्मणण्यांत कांहीं अर्थ नाहीं. पत ह्मणजे कर्ज काढण्याचें सामर्थ्य अशी व्याख्या वर केली आहे, व वारंवार सांगितलें आहे कीं, भांडवल ह्मणजे धनाचा जो अंश नवीन उत्पादनास साह्य करण्याकरितां राखून ठेविला असतो तो; त्याच्या योगानें मजुरांचें पोषण होतें, व कामास लागणारीं हत्यारें, सामान व आश्रय हीं मिळतात. आतां हें उघड आहे कीं, कर्ज काढण्याच्या सामर्थ्यानेंच ह्या गोष्टी होणाऱ्या नव्हत. पतीनें मजुरास अन्नवस्त्र मिळणार नाहीं, किंवा त्यांच्या उद्योगास लागणारीं हत्यारेंही मिळणार नाहींत. मनुष्यास शरीरसामर्थ्यानें गव्हांचें पोतें खांद्यावरून नेतां येतें, त्याचप्रमाणें कर्ज काढण्याचें सामर्थ्य चालविलें तर भांडवल मिळेल. परंतु त्या मनुष्याच्या शक्तीस गव्हांचें पोतें ह्मणणें हें जसें वेडेपणाचें होय तसेंच पतीस भांडवल ह्मणणेंही होय.

**पेढ्या.** पतीचा वास्तविक उपयोग असा आहे कीं, तिच्या योगानें देशांतील वाढलेलें धन भांडवलादाखल उपयोगास लावतां येतें. तिच्या योगानें धनाची योजना उत्पादक कामाकडे होते. पैसा मिळवून तो जवळ ठेवणारे लोक थोडे असतील; आपल्यास कारण असेल तितका पैका जवळ ठेवून बाकीचा सर्व पेढीवर ठेवतात, व तेथें त्याचा उपयोग उत्पादक कारणाकडे होतो. उदाहरणार्थ, कल्पना करा कीं, अची मिळकत १००० रुपयांची आहे. तो वर्षाची आपली सर्व मिळकत एका पेढीवर ठेवतो व लागतील तसे थोडे थोडे रुपये घेतो. इकडे पेढीवाला या ठेवीचा बराच अंश भांडवलादाखल उपयोगास लावतो, कारण, अनुभवाअंतीं असें ठरलें आहे कीं, पेढीवाल्यानें आपल्या जवळच्या पैक्यांतून तृतीयांशाहून अधिक पैका शिलक ठेवण्याचें कारण नाहीं. आ-

पेढीवर पैका ठेवणारे लोक खरोखर पेढीवाल्याचे सावकार होत. त्यांचा करार मात्र असा असतो कीं, आपण मागूं तेव्हां आपली सर्व ठेव किंवा तिचा कांहीं अंश आपणांस मिळाला पाहिजे. कांहीं पेढ्यांची चाल अशी असते कीं, ठेवी अमुक दिवस पेढीवर राहिल्यावर व्याज सुरू करावयाचें. पेढीवाल्यानें ठेवी ठेवणारांच्या पैशाचें रक्षण करून ते मागतील तेव्हां त्यांना सर्व ठेव किंवा तिचा कांहीं अंश दिला ह्मणजे त्यानें ठेवीचा योग्य मोबदला दिला असें मानतात. पेढीवाल्याची पत चांगली असल्याखेरीज लोक त्याजकडे आपला पैसा ठेवणार नाहींत.

**जुटीनें व्यापार करणाऱ्या मंडळ्या.** पतीच्या योगानें सांठविलेल्या धनाचा उपयोग उत्पादक रीतीनें होतो, त्याचा दुसरा प्रकार जुटीनें व्यापार करणाऱ्या मंडळ्या होत. रेलवेसारखीं प्रचंड कामें करण्यास इतकें भांडवल लागतें कीं, तें एका व्यक्तीच्या हातून क्वचितच देवलेल. ह्मणून अवश्य लागणारें भांडवल हजारों लोकांनीं वर्गणी करून जमविलेलें असतें. अवश्य लागणाऱ्या भांडवलाची रक्कम कंपनीचे उत्पादक ठरवितात; हें भांडवल १०००००० रुपये आहे असें आपण धरूं; मग असें ठरवितात कीं, २०००० भाग करून दर एका भागास ५०० रुपये बसवून हें भांडवल उभें करावयाचें. ह्मणून ज्या मनुष्यानें ५०० रुपये सांठविले असतील, व जो यांपैकीं एक भाग विकत घेईल तो कंपनीचा भागीदार होतो;

खरें ह्मटल्यास तो एका मोठ्या व्यापारांत वांटेकरी होतो; ह्या लहान भांडवलाचा उपयोग नवीन धन उत्पन्न करण्याकडे झाला. परंतु जुटीनें व्यापार करणाऱ्या मंडळ्या नसत्या तर ह्या भांडवलाचा बहुधा अनुत्पादक रीतीनें उपयोग झाला असता. हें उघड आहे कीं, जुटीनें व्यापार करणाऱ्या मंडळीस यश येण्यास तिचे उत्पादक व चालक हे प्रामाणिक असले पाहिजेत. त्यांच्यावर विश्वास टाकला, त्याचा त्यांनीं कित्येक वेळां दुरुपयोग केला आहे, परंतु त्या गोष्टीचा येथें विचार करण्याचें कारण नाहीं. त्यांची पत चांगली आहे असें वाटलें नसतें तर कंपन्या निघाल्याच नसत्या.

या उदाहरणावरून दिसून येईल कीं, पतीच्या योगानें व्यवहारदृष्ट्या देशाचें भांडवल वाढतें. कारण, तिच्या योगानें धन उत्पादक कामाकडे सुलभ रीतीनें लागतें. पण वर सांगितलेल्या प्रकाराखेरीज पतीचे अणखी प्रकार आहेत, त्यांच्या योगानें दुसरीं कामें होतात. त्यांच्या योगें धनाची अदलाबदल सुलभ होऊन जिनसांच्या किंमतींवर मोठे परिणाम घडतात. पतीचे हे प्रकार हुंड्या, ब्यांकनोटी, चेक आणि खातीं होत.

**हुंड्या.** मागच्या भागांत सांगितलें कीं, परदेशाशीं व्यापार करतांना सोन्यारुप्याचीं नाणीं नेहमी एका देशांतून दुसऱ्या देशांत न्यावीं लागत नाहींत. जे इंग्लिश व्यापारी फ्रान्स देशाहून माल आणतात त्यांना फ्रान्सास पैका पाठवावा लागल्यास फार अडचण पडून जोखिमही सोसावें लागेल, हें उघड आहे. वारंवार सोनेंरुपें इकडून तिकडे खेळविण्याची आवश्यकता पुढील प्रकारानें दूर होते. कल्पना करूं कीं, इंग्लिश व्यापारी **अ** हा, फ्रेंच व्यापारी **ब** यास १००० पौंड किंमतीचे दगडी कोळसे विकतो. आणि **क** हा फ्रेंच व्यापारी **ड** या

डांतून ) ककडे ( फ्रान्सांत ) रवाना केला पाहिजे होता. अ आणि ड हे दोघे इंग्लंडांतील व्यापारी आहेत, एक माल विकणारा व दुसरा खरेदी करणारा आहे. आतां अनें जर डपासून १००० पौंड घेतले, व तसेंच कनें बपासून फ्रान्सांत १००० पौंड घेतले तर आपलें काम होईल हें उघड आहे. हें काम असें होतें:—फ्रेंच व्यापारी बस असें लेखी वचन पाठवितो कीं, मी तुला १००० पौंड देईन. आणि ड हा इंग्लिश व्यापारी कस असेंच वचन १००० पौंड देईन असें पाठवितो. ह्या लेखी वचनास हुंड्या ह्मणतात. अची १००० पौंडांची हुंडी फ्रान्सावर काढलेली असते, आणि कची १००० पौंडांची हुंडी इंग्लंडावर काढलेली असते. त्यांनीं जर या हुंड्यांची अदलाबदल केली तर दोन्ही देणीं फिटलीं.

**कटमुदतीनें हुंडी देणें.** हुंड्यांची अदलाबदल बहुधा व्यापारी स्वतः करीत नाहींत; हुंड्या पटविणारे दलाल असतात ते हें काम करतात. हे लोक निरानिराळ्या देशावर काढलेल्या हुंड्या विकत घेतात. वरच्या उदाहरणांत अ आणि क हे स्वतः आपल्या हुंड्यांची अदलाबदल करणार नाहींत; लंडन शहरांतील हुंडीच्या दलालास अ आपली हुंडी विकत देईल व वर त्यास थोडें कमिशन देईल, आणि क आपली हुंडी पारीस येथें हुंड्यांच्या दलालास विकील. याप्रमाणें लंडनचा हुंड्यांचा व्यापारी १०००००० पौंड किंमतीच्या फ्रान्सावर काढलेल्या हुंड्या जमवील; तसेंच फ्रान्स देशांतील हुंड्यांचा

व्यापारी सुद्धां इंग्लंडावर काढलेल्या १०००००० पौंड किंमतीच्या हुंड्या जमवील. नंतर ते हुंड्यांची अदलाबदल करतील. या देशांतून त्या देशांत पैसा मुळींच जावयास नको. जणूं काय असें वाटेल कीं, दोन्ही देशांत मालास माल देण्याचीच वहिवाट आहे.

**हुंड्या पैशाचीं पुष्कळ कामें करतात, ह्मणून त्यांचा परिणाम साधारणपणें किंमतीवर घडतो.** देशांतल्या देशांत व परदेशीव्यापारांत हुंड्यांचा उपयोग पुष्कळ करतात. एक व्यापारी दुसऱ्यास रोख पैका क्वचित देतो; बहुधा हुंडीनें ह्मणजे अमुक वेळानें रकम देईन असें लेखी वचन देऊन देणें दिलें जातें. तीन महिन्यांचें बील ह्मणजे ज्यांत तीन महिने भरल्यावर रकम देण्याचें वचन असतें, तें. आतां हें बील पटेपर्यंत तें पैशाची पुष्कळ कामें करतें. जो मनुष्य बील घेतो त्याला कांहीं खरेदी करावयाचें असेल. आपण कल्पना करूं कीं बील १००० रुपयांचें आहे, आणि त्याचा हल्लींचा मालक अ यानें तें बपासून घेतलें. आतां अस डपासून १००० रुपयांचा माल खरेदी करणें आहे; तो माल घेतो, व बपासून घेतलेलें बील डस देतो, आणि त्याच्या पाठीवर आपली सही करतो. या सहीवरून असें समजावयाचें कीं, नेमिलेल्या वेळीं बनें १००० रुपये दिले नाहींत तर अ ते देईल. याचप्रमाणें बिलाची मुदत भरेपर्यंत तें देऊन पाहिजे तितके वेळां क्रय करितां येतो. जेव्हां तें एकाच्या हातून दुसऱ्याकडे जातें तेव्हां त्याच्या पाठीवर नवी सही करावी लागते, यामुळें मुदत संपण्याचे वेळीं असें होतें कीं, त्याची सर्व मागली बाजू सह्यांनीं भरून जाते. यावरून बील कांहीं वेळपर्यंत पैशाचें काम करतें हें उघड होतें. त्याची मुदत होईपर्यंत त्याच्या आंगीं सोन्यारु-

ण्याप्रमाणें माल खरेदी करण्याचें सामर्थ्य असतें. आतां मागें सांगण्यांत आलेंच आहे कीं, ज्या गोष्टीमुळें देशांत खेळणाऱ्या पैक्याची रकम वाढते, त्यामुळेंच इतर गोष्टी आहेत तशाच राहिल्यास जिनसांच्या किंमती वाढतील. कोणत्याही वस्तूचें मोल ह्मणजे जिन्नस मोबदला घेण्याचें सामर्थ्य, हें अपेक्षा आणि पुरवठा यांचें समीकरण होऊन ठरतें. पुरवठा वाढला तर मोल इतकें उतरतें कीं, वाढलेल्या पुरवठ्या इतकी अपेक्षा व्हावी. ही गोष्ट इतर जिनसांप्रमाणें पैशासही लागून आहे; ह्मणून देशांत पैशाचा पुरवठा वाढल्यास इतर गोष्टी बदलल्या नाहींत तर पैशाचें मोल उतरेल ह्मणजे त्याचें अदलाबदलीचें सामर्थ्य कमी होईल, आणि किंमती चढतील. बिलांचा परिणाम किंमतीवर कसा घडतो हें आतां समजणें सोपें आहे. वर सांगितलें कीं, हुंडीची मुदत भरेपर्यंत हुंडी पैशाचें काम करते; ह्मणून हुंड्या उपयोगांत अधिक आल्या तर सोनेंरुपें वाढल्यानें किंमतीवर जसा परिणाम होतो, तसाच त्यांचा होतो. हल्लीं जितका व्यापार हुंड्यांच्या योगानें होतो तितका जर रोखीनें करावा लागला, तर दोहोंतून एक गोष्ट झाली पाहिजे; देशांतील चलनी पैक्यांत तितकी रकम घातली पाहिजे, किंवा साधारण किंमती उतरल्या पाहिजेत. ह्मणून हुंड्यांच्या उपयोगानें साधारण किंमती वाढल्या असाव्या किंवा त्या उतरावयाच्या राहिल्या असाव्या.

**ब्यांकनोटी.** हुंड्यांखेरीज पतीचे दुसरे प्रकार आहेत त्यांच्या योगानें किंमतीवर असेच परिणाम घडतात. सोनें आणि रुपें यांच्या वृद्धीनें किंमतीवर जो परिणाम होतो तोच ब्यांकनोटी काढण्यापासून होतो. ब्यांकनोट ही केवळ पैसा देण्याचें वचन होय, आणि ब्यांकनोट व हुंडी यांच्यांत मुख्य

भेद हाच कीं, ब्यांकनोट देऊन, मागतांक्षणीं, पाहिजे तेव्हां रोकड पैसा मिळतो व हुंडीवर जी मुदत नेमली असेल त्या वेळेसच तिचे पैसे मिळतात. पैशाऐवजीं ब्यांकनोटींचा कसा उपयोग होतो हें सर्वांस माहीत आहे. ब्यांकनोटींचा आकार लहान असून त्या नेण्यास सुलभ असतात, ह्मणून त्या पतीचीं विशेष सोईचीं साधनें होत. इंग्लंडच्या ब्यांकेची नोट ही कायदेशीर देण्यांत धरली जाऊन ती सोन्याच्या नाण्याप्रमाणें चालते. प्रांतोप्रांतींच्या नोटी व खासगी पेढ्यांच्या नोटी ह्या कायदेशीर देण्यांत येत नाहींत, परंतु त्या नोटी काढणारांच्या पतीवर जे लोक विश्वास ठेवतात ते त्या घेतात. इंग्लंडच्या ब्यांकेच्या नोटीचें क्रयाचें सामर्थ्य सोन्याइतकें असतें, कारण त्या ब्यांकेंत ती नोट कोणी घेऊन गेल्यास त्यास सोनें दिलेंच पाहिजे अशी कायद्याची सक्ती आहे; व त्या ब्यांकेस लोकांचें देणें फेडण्याचें सामर्थ्य आहे असा प्रत्येकाचा पूर्ण भरंवसा आहे. इतर पेढ्यांनीं आपल्या नोटी घेऊन सोनें किंवा इंग्लंडच्या ब्यांकेच्या नोटी दिल्या पाहिजेत असा सरकारचा कायदा आहे. परंतु या कायद्यामुळें मोठ्या दूरदर्शी पेढ्यांससुद्धां आपण काढलेल्या नोटींइतकी रकम तयार ठेवावी लागत नाहीं. अनुभवाअंतीं असें आढळलें आहे कीं, कोणत्याही पेढीनें आपण काढलेल्या नोटींच्या तृतीयांशाहून अधिक रोख पैसा जवळ बाळगण्याची गरज नाहीं. उदाहरणार्थ, ग्रेतब्रितनांत सुमारें ३०००००० पौंड किंमतीच्या नोटी चालू आहेत. निरनिराळ्या पेढ्यांतून १०००००० पौडांचें नाणें सांपडेल, व बाकी राहिलेल्या २०००००० पौंडांच्या नोटी चालू आहेत, त्यांच्याकरितां पैसा शिलक ठेवावा लागत नाहीं. तेव्हां देशाच्या चलनी पैक्यांत इतकी भर पडली असें ह्मणतां

येईल. देशांत कांहीं नवीन नोटी सुरू करून त्यांच्या किंमती-इतकेंच चालू नाणें काढून घेतलें तर किंमतीवर कांहीं परिणाम घडणार नाहीं; कारण असें करण्यानें चलनी पैका वाढत नाहीं व कमीही होत नाहीं. परंतु चालू पैसा काढून न घेतां ब्यांकनोटी सुरू केल्या तर साधारण किंमती वाढतील तरी एक, किंवा त्या उतरावयाच्या असल्या तर उतरणार नाहींत.

**चेक.** (दर्शनी चिठ्या) अमुक मनुष्यास अमुक रकम द्यावी ह्मणून पेढीवाल्यास जी लेखी आज्ञा केलेली असते तिला चेक ह्मणतात. ज्याला पैसा द्यावयाचा त्यानें सर्व चेकाचा रोख पैसा एकदम केला तर किंमतीवर कांहींच परिणाम घडणार नाहीं. परंतु लोक बहुधा ह्या चेकाची रोकड न करितां ते आपल्या पेढीवाल्याकडे पाठवितात. ह्या गोष्टीचा परिणाम जिनसांच्या किंमतीवर काय होतो तो पाहूं. **अ**ची ठेव लंडन ब्यांकेंत असते व तो **ब**स १०० पौंडांचा चेक देतो. **ब**ची ठेव इंपीरियल ब्यांकेंत असते. हा चेक केवळ लंडन ब्यांकेच्या व्यवस्थापकास **ब**स १०० पौंड देण्याकरितां लेखी आज्ञा होय. **ब** रोख पैसा घेण्याकरितां लंडन ब्यांकेकडे हा चेक न नेतां तो इंपीरियल ब्यांकेंत आपल्या खात्यावर पाठवितो. **क**ची ठेव इंपीरियल ब्यांकेंत असते, **क** त्याच दिवशीं १०० पौंडांचा चेक **ड**स देतो. आतां **ड**ची ठेव लंडन ब्यांकेंत आहे, तिकडे तो आपला चेक पाठवितो. दिवसाअंतीं लंडन ब्यांकेवर काढलेला १०० पौंडांचा चेक इंपीरियल ब्यांकेंत आहे व इंपीरियल ब्यांकेवर काढलेला १०० पौंडाचा चेक लंडन ब्यांकेंत आहे. यास्तव दोन्ही पेढ्या परस्परांच्या चेकांची अदलाबदल करतात. अशा रीतीनें एका ब्यांकेंतून दुसऱ्या ब्यांकेंत रोख पैसा मुळींच पाठवावा लागत नाहीं.

**वजावाट करण्याचें गृह.** निरनिराळ्या पेढ्यांवर काढलेले चेक व हुंड्या यांची अदलाबदल करण्याची एक जागा लंडन शहरीं आहे. त्यास क्लियरिंग हौस ह्मणजे वजावाट करण्याचें गृह असें ह्मणतात. पेढीवाले लोक दिवसांत आपल्याकडे आलेले चेक व हुंड्या ह्या ठिकाणीं पाठवितात, व दुसऱ्या पेढ्यांकडे आपल्या पेढ्यांवर काढलेले चेक व हुंड्या असतात त्यांची ते अदलाबदली करतात. अशा रीतीनें दरसाल ६ अब्ज पौंड चेकांची वजावाट होते, व ही अदलाबदल करण्यास नाणें मुळींच लागत नाहीं. रेलवे कंपन्यांचेंसुद्धां परस्परांच्या देण्याघेण्याची वजावाट करण्याचें एक स्वतंत्र गृह असतें.

**खातीं.** खात्याचा व्यवहार समजण्यास कांहींच कठीण नाहीं. **अ** लोखंडाचा व्यापार करतो, व **ब** दगडी कोळशाचा व्यापारी आहे. **अ**, **ब**पासून ५०० रुपये किंमतीचे कोळसे खरेदी करतो; आणि **ब**, **अ**पासून ५०० रुपये किंमतीचें लोखंडीसामान घेतो. दोघेही रोख रुपये किंवा हुंडी किंवा चेक कांहींच देत नाहींत, परंतु **अ** आपल्या वहींत **ब**च्या नांवें ५०० रुपये खर्चीं लिहितो व **ब**ही आपल्या वहींत **अ**च्या नांवें तसेंच करतो. परस्परांनीं परस्परांचे ५०० रुपये देणें आहे असें पाहून ते जमाखर्च मिळवून घेतात. अशा रीतीनें रोख पैशाचा उपयोग करावा न लागून व्यापार होतो.

**पतीचा परिणाम किंमतीवर होतो, तो पतीच्या अमक्या एका प्रकारावर अवलंबून आहे असें नाहीं.** वर पतीच्या ज्या निरनिराळ्या प्रकारांचें वर्णन केलें त्या संबंधानें असें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, पतीमुळेंच किंमतींत फेरफार. होतो, तो पतीच्या अमक्या एका प्रकारानेंच होतो असें नाहीं. ब्यांकनोट, चेक किंवा हुंडी ही पत नव्हे, तर, ती फक्त पतीचें

अस्तित्व दर्शविते. पतीच्या ज्या ज्या प्रकाराच्या योगानें रोख पैशाचा उपयोग करणें वांचतें त्या सर्व प्रकारांचा परिणाम किंमतीवर होतो.

**पतीमुळें माल विकत घेण्यास येणारें सामर्थ्य.** पतीच्या उपयोगाचा दुसरा एक प्रकार आहे त्याच्या योगानें किंमतीवर कांहीं काळ मोठा परिणाम घडतो. जो मनुष्य आपली पत खर्चून माल खरेदी करतो, त्याचें माल खरेदी करण्याचें सामर्थ्य वाढतें. सर्व जिनसांचा क्रयविक्रय जर पैसा देऊन घेऊन होईल तर व्यापाराचें मान फार कमी होईल. उदाहरणार्थ, कल्पना करा कीं एका कोष्टयास कांहीं कापूस घ्यावयाचा आहे, परंतु कापूस पाहिजे आहे तितका पैसा जवळ नसल्यामुळें तो कापसाची किंमत सहा महिन्यांनीं देईन अशी चिठी कापसाचे मालकास देतो, ही मुदत भरल्यावर त्यास जर पैसा देतां आला नाहीं तर त्याची पत चांगली असल्यास शेंकडा कांहीं व्याज कबूल करून पुन्हां नवी चिठी लिहून देतां येते. ज्यांच्याकडून किंमतीची फेड होण्याचा संभव नाहीं असे कित्येक व्यापारी पतीवर पुष्कळ माल खरेदी करतात असें आपण पाहतों, तथापि पतीशिवाय व्यापार चांगला चालणार नाहीं व खरेदी फार कमी होईल यांत संशय नाहीं. रोख पैसा द्यावा लागल्यामुळें जी खरेदी झाली नसती ती पतीनें होते; तेव्हां पतीनें मालाची अपेक्षा वाढते हें उघड होय. ज्या गोष्टीनें मालाची अपेक्षा वाढते त्या गोष्टीनेंच मालाची किंमत वाढूं लागते असें वारंवार सिद्ध केलें आहे. तात्पर्य पतीमुळें माल विकत घेण्याचें लोकांचें सामर्थ्य वाढलें ह्मणजे त्या मालाची किंमत वाढूं लागते.

**ज्या मालाचा पुरवठा कमी असतो त्याच्या किंम-**

**तीवर पतीचा परिणाम फार होतो.** ज्या जिनसांचा पुरवठा वाढवितां येतो त्यांची किंमत मूळखर्चा जवळ जवळ येते हें खरें; परंतु कांहीं कारणांमुळें ज्या मालाचा पुरवठा कमी पडेल असा संभव असतो, तेव्हां व्यापारी लोक असला माल पुष्कळ खरेदी करून ठेवितात. ज्या मालाचा पुरवठा अगदीं नियमित असतो त्याची किंमत ज्या रीतीनें ठरते त्याच रीतीनें वरील मालाची किंमत ठरते. सन १८५४ सालीं रूस देशाशीं लढाई होण्याचे वेळीं व्यापारी लोकांस ठाऊक होतें कीं, लढाई चालू असतां रूस देशांतून चरबी, अंबाडी वगैरे माल बाहेर जाणार नाहीं. ह्मणून हे जिन्नस पुढें महाग होतील अशा समजुतीनें ह्या जिनसांची फार खरेदी झाली. यामुळें रूस देशच्या मालाची किंमत वाढली. तसेंच १८६९ सालीं मे व जून महिन्यांत हवा फार थंड पडल्यामुळें धान्याचें पीक चांगलें येणार नाहीं असें समजून व्यापारी लोकांनीं पुष्कळ धान्य खरेदी करून ठेविलें. या योगानें धान्याची किंमत वाढली आणि व्यापाऱ्यांच्या अनुमानाप्रमाणें धान्याचें पीक कमी आलें असतें तर त्यांनीं मोठी कमाईही केली असती. परंतु खरा प्रकार काय झाला हें पाहूं. या व्यापाऱ्यांनीं धान्य खरेदी करून त्याबद्दल बिलें दिलीं होतीं. त्यांची उमेद अशी होती कीं, बिलांची मुदत भरण्यापूर्वीं आपण धान्य विकून पुष्कळ फायदा मिळवूं व कारण पडल्यास बिलांची मुदत वाढवूं. परंतु इंग्लंडांत जरी गव्हांचें पीक चांगलें आलें नाहीं; तरी, अमेरिकेंत तें नेहमींपेक्षां चांगलें आल्याकारणानें तेथें गहूं फार स्वस्त झाले. यामुळें अमेरिकेंतून इंग्लंडास पुष्कळ गहूं येऊं लागले. धान्याची किंमत उतरूं लागली. कित्येक व्या-

पाऱ्यांस आपल्या बिलांची रकम फेडतां आली नाहीं व पुष्कळ व्यापाऱ्यांचें दिवाळें निघालें.

पतीवर माल जर सुलभ रीतीनें मिळूं लागेल तर किंमतीवर पतीचा परिणाम किती मोठा होईल हें सांगणें कठीण आहे. पतीचा व्यापार फार वाढविल्यामुळें जेव्हां किंमती मूळ खर्चावर फ़ार चढतात, व्यापाराचें धोरण चुकतें, व पुष्कळ व्यापाऱ्यांस आपल्या बिलांची फेड करवत नाहीं, तेव्हां व्यापारांत आणीबाणीची वेळ येते, आणि कांहीं काळपर्यंत पतीचा व्यापार बंद पडतो. अशा प्रसंगीं पुष्कळ व्यापारी धुळीस मिळतात. कारण, पतीचा व्यापार बंद पडल्यामुळें त्यांना आपल्या बिलांची मुदत वाढवितां येत नाहीं. भीतीमुळें व्यापारी लोक हुंड्या घेत नाहींत, ब्यांकनोटी व नाणीं मात्र घेतात. सबब किंमती त्वरेनें उतरूं लागतात; त्या इतक्या कीं, मूळखर्चाहून पूर्वी त्या जितक्या अधिक होत्या तितक्या आतां कमीही होतात. यावरून दिसून येईल कीं, जेव्हां पतीचा गैरउपयोग करण्यांत येतो व किंमती योग्य दराहून मुद्दाम वाढविण्यांत येतात तेव्हां व्यापारांत आणीबाणीची वेळ येते, व प्रथम अविचारानें जसा पतीचा व्यापार वाढतो तसा तो मग अगदीं कमीही होतो.

**पतीचा परिणाम साधारण किंमतीवर हितकारक होतो.** पतीचा व्यापार बेताबातानें चालविल्यास तिचा परिणाम समाजास हितकारक असतो यांत संशय नाहीं. कारण, साधारण किंमतींत जे फेरफार होतात व ज्यांच्यामुळें व्यापारांत अनिश्चितपणा वाढून धनाच्या उत्पत्तीस नेहमी मोठा धक्का बसतो, ते फेरफार पतीच्या व्यापारानें बंद करतां येतात. साधारण किंमतीमध्यें होणारे फेरफार पतीच्या व्यापारानें कसे बंद करितां

येतात हें बिलांच्या देवघेवीवरून चांगलें समजेल. मागें कित्येक-वेळां सांगितलें आहे कीं, क्रयविक्रय वाढला ह्मणजे पैशाची गरजही वाढते; आणि अधिक पैका किंवा त्याच्या बदली कांहीं-तरी न मिळाल्यास किंमती उतरल्या पाहिजेत. क्रयविक्रय वाढत जातो तशी बिलांची संख्या वाढते. जर एखाद्या व्यापाऱ्याची देवघेव दुप्पट वाढली तर तो ज्यास्त बिलें देईल व घेईल यांत संशय नाहीं. ह्मणून पूर्वींपेक्षां व्यापार थोडा वाढला तरी स्वाभाविकपणें पतीचा अधिक उपयोग होतो. तसेंच व्यापारास मंदी असते तेव्हां देवघेव कमी होते, ह्मणून बिलांची संख्याही कमी होते. पतीचा व्यापार मुळींच नसता तर एखाद्या गोष्टींत व्यापार वाढल्यास साधारण किंमती उतरतील व व्यापारास मंदी असेल त्यावेळीं किंमती चढतील. हा पतीचा कमजास्तपणा फार हितावह आहे; कारण पतीमुळें एखाद्या जिनसाच्या किंमतींत जरी केव्हां केव्हां पुष्कळ फेरफार होतो, तरी साधारण किंमतींत फारसा चढउतार होत नाहीं.

**कागदाच्या चलनीपैक्यापासून साक्षात् फायदा.** पतीपासून आणखी एक फायदा आहे तो सांगितला नाहीं. मागें सांगितलें आहे कीं, कोणत्याही देशाच्या चलनीनोटी ह्या, त्या देशांत पैक्याचीं बहुतेक सर्व कामें करतात. ब्यांकनोटी, चेक, बिलें, हुंड्या यांचा उपयोग बंद झाल्यास सोनें व रुपें या धातूंची गरज जास्त लागेल. सबब पतीच्या साधनांचा उपयोग करण्यांत प्रत्यक्ष फायदा आहे, कारण सोनें व रुपें या मौल्यवान धातूंच्या जागीं ज्याला मुळींच मोल नाहीं असें ह्मणतां येईल, अशा पदार्थांची ह्मणजे कागदाची योजना करतां येते. एक हजार रुपयांच्या नोटीस जो कागद लागतो त्याची किंमत अर्ध्या पैशाइतकी होणार नाहीं. त्या कागदाची किं-

मत मुळींच मनांत आणण्यासारखी नसून पतीमुळें ज्या अर्थी त्यास जिन्नस विकत घेण्याचें सामर्थ्य येतें त्या अर्थी तो कागद बाळगणाऱ्या मनुष्यास १००० रुपये बाळगण्याइतका उपयोग होतो.

**२ ऱ्या भागावर प्रश्न.** पत आणि तिचें किंमतीवर वजन.

१. पत ह्मणजे काय ?

२. कोणत्याही मनुष्याची किंवा देशाची पत ओळखण्याची खूण काय ?

३. फेड करण्याचे सामर्थ्याखेरीज दुसऱ्या कोणत्या गोष्टीमुळें भिन्न देशांत व्याजाचे भिन्न दर होतात ?

४. पतीस भांडवल ह्मणणें हें मूर्खपणाचें कसें ?

५. धनाच्या उत्पत्तीस पतीपासून कोणता उपयोग होतो तो सांगा.

६. धन उत्पादक कामाकडे लागण्यास पेढ्यांचा कसा उपयोग होतो ?

७. धन उत्पादक कामाकडे लागण्यास जुटीनें व्यापार करणाऱ्या मंडळ्या कशा उपयोगीं पडतात ?

८. पेढ्या आणि जुटीनें व्यापार करणाऱ्या मंडळ्या यांचें अस्तित्व पतीवर अवलंबून असतें असें दाखवा.

९. हुंड्या ह्मणजे काय असतात ? व त्यांच्या साधनानें धनाची अदलाबदली सोपी कशी होते ?

१०. पैशाचें काम हुंडी कशी करते तें सांगा.

११. हुंड्यांच्या रूपांत पतीचा परिणाम किंमतीवर काय होतो ?

१२. हुंड्या किंवा पतीचीं अशाच प्रकारचीं दुसरीं साधनें उपयोगांतून गेलीं तर काय परिणाम होईल ?

१३. ब्यांकनोट ह्मणजे काय असतें ?

१४. हुंडी व ब्यांकनोट यांत भेद कोणता ?

१५. रुपये देऊन जसा कांहीं माल घेतां येतो तसाच कागदाच्या नोटी देऊनही येतो हें कसें ?

१६. किंमतीवर ब्यांकनोटींचा काय परिणाम होतो ?

१७. चेक ह्मणजे काय ? व पैशाऐवजीं ते कसे उपयोगी पडतात ?

१८. वजावाट करण्याचें गृह कशास ह्मणतात ?

१९. वरील गृहांत दरसाल किती किंमतीच्या चेकांची घडामोड होते ?

२०. खात्यांच्या योगानें नाण्यांची देवघेव कशी करितां येते ?

२१. पतीच्या योगानें कोणा मनुष्याचें जिन्नस खरेदी करण्याचें सामर्थ्य कसें वाढतें ?

२२. क्रय करण्याच्या ह्या वाढलेल्या सामर्थ्याचा परिणाम किंमतीवर काय घडतो ?

२३. कोणत्या जिनसांवर पतीचा परिणाम फार घडतो ?

२४. व्यापारांत आणीबाणीच्या वेळा येण्याचें कारण काय ?

२५. पतीवर त्यांचा काय परिणाम होतो ?

२६. पतीच्या योगानें साधारण किंमतींत होणारे फेरफार कसे बंद होतात ते सांगा.

२७. कागदांच्या नोटींचा उपयोग करण्यांत प्रत्यक्ष फायदा कसा आहे ?

---

१. कोणीं मनुष्यानें एक बनावट चलनी नोट केली तर तो मनुष्य देशाचें धन वाढवितो काय ?

२. १०००० रुपयांचा उपयोग न करितां जर मीं ते ब्यांकेंत ठेविले तर मी दुष्ट होईन काय ?

३. नोटी काढणारानें जर आपण काढलेल्या नोटींपैकीं १००० रुपयांची एक नोट जाळली तर त्याचें १००० रुपयांचें नुकसान होईल काय ?

४. कोणी पेढीवाला नोटी काढून आपणास श्रीमान् करून घेईल काय ?

५. चेक लिहून कोणामनुष्यास श्रीमान् होतां येईल काय ?

---

## भाग ३.

### कर.

**करांची आवश्यकता.** सरकारचें वास्तविक काम ह्मटलें ह्मणजे जीव आणि मालमत्ता यांचें संरक्षण करणें, आणि सर्वांचें सारखें स्वातंत्र्य राखणें हें होय, ही गोष्ट बहुधा सर्वांस मान्य आहे. पुष्कळ खर्च केल्याखेरीज हें काम होणें नाहीं. हा खर्च भागविण्याकरितां रयतेवर कर बसविणें अवश्य आहे. कर कसे बसवावे, व करांचें ओझें कोणकोणत्या वर्गांवर पडावें या प्रश्नांचा विचार करणें फार अगत्याचें आहे. अलीकडे लोकांत असा विचार मान्य झाला आहे कीं, कायमची फौज व पोलीसखातें अशा प्रकारच्या संस्थांपासून ज्यांना उपयोग होतो त्या सर्वांनीं त्या संस्था राखण्यास जो खर्च अवश्य लागेल तो दिला पाहिजे. युरोप खंडांत फ्यूडलसिस्टिम चालू असतां हा विचार मुळींच कोण करीत नसे. फ्रान्स देशांत राज्यक्रांति होण्यास जीं कारणें झालीं, त्यांपैकीं निःसंशय हें एक होतें कीं, फ्रान्स देशांतील बडेलोकांस व धर्माधिकाऱ्यांस करांची माफी असे. यामुळें करांचा सर्व बोजा गरीब लोकांवर पडे, व त्या लोकांस राष्ट्राच्या वसुलाची व्यवस्था करण्याचे कामांत बोलण्यास परवानगी नसे. हल्लींच्या काळीं कर बसविण्यांत न्यायाच्या त-

त्यांचें उल्लंघन फारसें होत नाहीं; कोणत्याही वर्गास कराची माफी नसून सर्व लोकांपासून कर सरसकट सारखे घेतले जातात. कर बसवून गोळा केलेला पैका ज्या कामास लावावयाचा तें काम मला पसंत नाहीं अशा सबबीवरून कोणासही कराची माफी होत नाहीं. उदाहरणार्थ इंग्लंड देशाच्या जमाबंदीचा कांहीं भाग गुप्त खात्याकडे व कांहीं मुळींच काम नाहीं अशा लोकांस पगार व पेनशनें देण्यांत खर्च होतो. लोकांच्या पैशाचा व्यय अशा रीतीनें होऊं नये असें जरी कित्येकांचें मत असलें तरी त्यांना ही गोष्ट पसंत असती तर जसा कर द्यावा लागता तसाच तो ती गोष्ट पसंत नसून द्यावा लागता. एकंदरींत हा अन्याय असें ह्मणतां येणार नाहीं, निदान ज्या लोकांस आपल्या तर्फे पार्लमेंटांत मुक्त्यार निवडण्याचा अधिकार आहे त्यांच्या संबंधानें तरी हा अन्याय नव्हे.

**अडामस्मिथनें घालून दिलेले कराविषयींचे चार नियम.** अडामस्मिथच्या "राष्ट्रांची संपत्ति" नांवाच्या ग्रंथांत करासंबंधानें चार नियम सांगितले आहेत; ते नियम बरोबर पाळले तर रयतेस दुःख कमी होऊन सरकारास पुष्कळ वसूल मिळेल. स्थल संकोचास्तव हे चार नियम येथें साद्यंत सांगणें होणार नाहीं, ह्मणून त्यांचा सारांश खालीं दिला आहे.

१ला. सरकारच्या आश्रयाखालीं राहणाऱ्या प्रत्येक मनुष्यानें आपल्या मिळकतीच्या प्रमाणानें सरकारास कर दिला पाहिजे.

२रा. कर ठरलेले असावेत व ते अनिश्चित असूं नयेत. ते देण्याची वेळ, ते देण्याची रीति, व त्यांची रकम किती असावी ह्या सर्व गोष्टी रयतेस व इतर कोणाही मनुष्यास स्पष्ट व उघड कळतील अशा असल्या पाहिजेत.

३रा. रयतेस ज्यावेळीं व ज्यारीतीनें कर देणें सोपें पडेल त्यावेळीं व त्यारीतीनें ते घ्यावे.

४. प्रत्येक कर अशा रीतीनें बसविला पाहिजे कीं, त्याची रक्कम सरकारच्या तिजोरींत येणार त्याहून जी अधिक गोळा होते, ती रयतेच्या खिशांतून होईल तितकी कमी बाहेर जावी.

**पहिल्या नियमाचें विवेचन.** प्रत्येक वेगवेगळ्या करासंबंधानें पहिला नियम पाळतां येणार नाहीं. कर देणाराच्या ऐपतीच्या प्रमाणानें किंवा त्याच्या सामर्थ्याच्या प्रमाणानें कर बसविणें अशक्य आहे. उदाहरणार्थ एक सहा माणसांचें कुटुंब आहे, व त्या कुटुंबाची मिळकत निर्वाहापुरतीच आहे. तीन माणसांच्या श्रीमान् कुटुंबास जितका चहा लागतो, तितकाच किंवा अधिक चहा या कुटुंबास लागतो. सबब प्राप्तीच्या मानानें श्रीमान् कुटुंबापेक्षां गरीब कुटुंबास अधिक कर पडतो. या प्रकारच्या अडचणी कोणत्याही सरकारास दूर करितां येणार नाहींत. सर्व अडचणी दूर करण्याचें मनांत आणिलें तर विशेष बाबतींत देखरेख व चौकशी करण्यासाठीं सरकारास हजारों कामगार ठेवावे लागतील, व कराचें उत्पन्न बहुधा त्या कामगारांचे पगारासच जाईल. ह्मणून सरकार जर अडामस्मिथचा पहिला नियम बरोबर अमलांत आणण्याचा यत्न करील तर त्यास चवथा नियम अगदींच मोडावा लागेल. सर्वांवर सारखे कर बसावे ही गोष्ट एकाच करावर लक्ष ठेवून होणारी नसून निरनिराळ्या वर्गांतील लोक जे सर्व कर देतात ते एकंदरींत त्यांच्या प्राप्तीच्या प्रमाणांत ठेविल्यानें सुसाध्य होणारी आहे. अशा रीतीनें वर सांगितलेल्या गरीब कुटुंबास श्रीमान् कुटुंबापेक्षां त्याच्या मिळकतीच्या मानानें जरी चहावर अधिक कर पडला तरी प्राप्तीवरील कर व मद्य वगैरे चैनीच्या पदार्थां-

वरील कर कमी पडतील. ठोकळमानानें हे कर सारखे आहेत असें ह्मणतां येईल.

**दुसऱ्या नियमाची व्याप्ति.** कर ठरींव असले पाहिजेत ते अनिश्चित असूं नयेत, हा अडामस्मिथचा दुसरा नियम फार महत्त्वाचा आहे. व्यापारी लोक ज्या जिनसांचा व्यापार करतात त्यांवर कर किती द्यावा लागेल हें जेव्हां त्यांस कळत नाहीं तेव्हां व्यापारांत कोणत्याच तऱ्हेचा अंदाज करितां येत नाहीं. लोक आपल्या शहाणपणावर व दूर दृष्टीवर अवलंबून न राहतां नशिबावर हवाला ठेवितात, आणि व्यापार ह्मणजे केवळ जुगाराचा खेळ बनून जातो. आयात मालावर ठरींव कर घेण्यापेक्षां त्या मालाच्या किंमतीवर कर बसविण्यानें दुसरा नियम मोडला जातो.

**तिसरा नियम.** रयतेचें दुःख होईल तितकें कमी करावयाचें ह्मटल्यास तिसरा नियम अवश्य आहे हें सांगावयास नको. रयतेस कर देण्याची फार गैर सोय असेल अशावेळीं जर ते घेतले, तर सरकारचें हित कांहींच न होतां रयतेस मात्र विनाकारण दुःख होतें. मालांवरील सर्व कर खरोखर माल घेणारास द्यावे लागतात, कारण ते मूळ खर्चाचा एक भाग होत. ह्मणून माल घेणारा आपली सोय असेल त्यावेळेस ह्मणजे माल खरेदी करण्याचे वेळेस कर देतो. त्याची कर देण्याची सोय नसल्यास तो माल खरेदी करणार नाहीं. मालावरील कर प्रथमतः माल विकणारास द्यावे लागतात. जर कोणी मनुष्य वाण्याचे दुकानांतून एक शेर मीठ घेईल तर ह्या मिठाचे किंमतीचा कांहीं अंश सरकारानें बसविलेला कर आहे. वाण्यानें मीठ घेतलें तेव्हांच हा कर दिला. जमीनीच्या साऱ्यावरील किंवा घरांच्या भाड्यांवरील कर, सारा किंवा भाडें

हीं बहुधा ज्यावेळीं देतात त्यावेळीं द्यावीं असें ठरविल्यास कर देणारास फार सोयीचें होईल, कारण; त्यावेळीं कर देण्यास त्याजपाशीं कांहीं तरी असण्याचा संभव आहे. बलगेरिया व बोसनिया हे प्रांत जोंपर्यंत तुर्कस्थानच्या अमलाखालीं होते, तोंपर्यंत तेथील लोकांवर करांचा जो जुलूम होता, तो मुख्यत्वेंकरून दुसऱ्या व तिसऱ्या नियमाचें उल्लंघन केल्यामुळें झाला होता. प्रवासी लोकांस त्या प्रांतांत पिकें वारंवार कुजत पडलेलीं दिसत; कारण, साऱ्यांच्या मक्तेदाराचा मनुष्य येऊन सारा ठरवीपर्यंत रयत लोकांना पिकें काढण्याची परवानगी नसे. अशाप्रकारानें बसविलेल्या साऱ्याची रक्कम ठरीव नसे, व सारा ठरविण्याची वेळ इतकी लांबत असे कीं त्यामुळें पीक नासून जाई.

**चवथा नियम.** चवथ्या नियमाचा तिसऱ्याशीं निकट संबंध आहे. रयतेची सोय नसेल त्यावेळीं कर घेतल्यास सरकारास फायदा होणार त्याहून रयतेचा तोटा ज्यास्त होईल यांत संशय नाहीं. एखादा कर देण्याची गैर सोय विशेष तजविजीनें दूर झाली ह्मणजे सरकारच्या खजिन्यांत येणारी व रयतेपासून वसूल झालेली रक्कम यामधील फरक कमी पडतो. उदाहरणार्थ जर कोणी व्यापारी कर बसविलेला माल परदेशाहून आणील, व तो तात्काळ विकण्याची त्याची इच्छा नसेल, तर त्यानें तो एका बॉंडिंग हौसमध्यें ह्मणजे बंदीकेलेल्या वखारींत ठेवावा. जोंपर्यंत तो माल बंदांत आहे तोंपर्यंत त्यावरचा कर द्यावयास नको. मालाची विक्री होईपर्यंत तो बंदांत ठेवतां येईल; यामुळें व्यापाऱ्यास कर देण्याची वेळ फार सोयीची पडते, ह्मणजे माल विकून किंमत घेतल्यावर त्यास कर देतां येतो. याच्या योगानें मालाच्या किंमतीवर काय परिणाम होतो तो पाहूं, कल्पना करा कीं कोणी एक दारूचा व्यापारी

१००० रुपयांची दारु परदेशाहून आणतो व त्या दारूवर ५०० रुपये कर आहे. तो ती दारू बंदांत ठेवितो व तेथें ती सहा महिनेपर्यंत राहून तिची विक्री होते. व्यापारी जर आपल्या भांडवलावर शेंकडा २० प्रमाणें दरसाल नफा मिळवीत असेल तर ह्या दारूस १६०० रुपये येतील. त्याचा तपशील खालीं लिहिल्याप्रमाणें:—

| | | |
|---|---|---|
| दारूची मूळची किंमत | रु० | १००० |
| व्यापाऱ्याच्या भांडवलाचा सहा महिन्यांचा नफा | रु० | १०० |
| शेंकडा १० प्रमाणें दारूवरील कर | रु० | ५०० |
| | रु० | १६०० |

आतां दारू बंदरांत आल्या बरोबर व्यापाऱ्यांस जर कर भरावा लागता तर सहा महिन्यांनंतर तिची किंमत १६०० रुपयांच्या ठिकाणीं १६५० रुपये झाली असती, कारण व्यापाऱ्यास ५०० अधिक भांडवल घालावें लागल्यामुळें त्यावर शेंकडा २० प्रमाणें तो व्याज आकारील. ह्मणून दारूच्या किंमतीचा तपशील खालीं लिहिल्याप्रमाणें होईल:—

| | | |
|---|---|---|
| दारूची किंमत जकात धरून | रु० | १५०० |
| व्यापाऱ्याच्या भांडवलावर शेंकडा दहाप्रमाणें सहा महिन्यांचा नफा. | रु० | १५० |
| | रु० | १६५० |

यामुळें दारू विकत घेणारास जकाती बाबत सरकारास मिळणार त्याहून ५० रुपये अधिक द्यावे लागतील[1].

---

1 या लेखावर असा आक्षेप घेतात कीं, वर सांगितल्याप्रमाणें केलें तर माल घेणाराचा जो फायदा होतो तितकाच सरकारचा तोटा होतो; माल परदेशाहून येतो तेव्हांच जकात घेतली तर सरकारास पैसा सहा महिने अगोदर मिळून त्याचें व्याज सरकारच्या पदरीं पडेल.

**कच्च्या मालावरील कर.** अडाम स्मिथच्या चवथ्या नियमान्वयें मालावर कर बसविणें तो कच्च्या मालावर न बसवितां तयार झालेल्या मालावर बसविला पाहिजे. उदाहरणार्थ कापसावर कर बसविणें झाल्यास तो कच्च्या कापसावर न बसवितां कापसापासून तयार केलेल्या मालावर बसवावा. कापसाचा माल तयार होण्यापूर्वी कापूस पुष्कळ व्यापाऱ्यांच्या हातून जातो, कच्च्यामालावर कर बसविला तर प्रत्येक व्यापाऱ्यास कर द्यावा लागून मालविकत घेणारास व्यापाऱ्याच्या भांडवलावरचें व्याज द्यावें लागेल. अ हा कापसाचा व्यापारी आहे. कापसावर अस जर १००० रुपये जकात द्यावी लागली तर बस कापूस विकते वेळीं ह्या १००० रुपयांवर तो आपला नेहमीचा नफा घेईल. हा नफा आपण शेंकडा १० धरूं. बस जकातीमुळें ११०० रुपये द्यावे लागतात. ब आपला माल कस विकते वेळीं ही ह्या १००० रुपयांवर शेंकडा १० प्रमाणें नफा मिळवूं पाहील. ह्मणून कस १२१० रुपये द्यावे लागतील. माल एका हातून दुसऱ्या हातीं गेला ह्मणजे प्रत्येक वेळीं जकातीबद्दल जी रकम द्यावी लागते ती चक्रवाढ व्याजानें वाढते; व शेवटीं मालावर खरोखर ज्यास जकात द्यावी लागते, ह्मणजे जो मनुष्य मालाचा उपयोग करणारा त्यास मालाची किंमत द्यावी लागून कराबद्दल जी रकम द्यावी लागेल ती कदाचित् सरकारच्या तिजोरींत जाणार त्याहून दूप्पटही होईल. ह्मणून अडाम स्मिथचा चवथा नियम

---

परंतु वरील आक्षेपांत असें ग्रहीत घेतलेलें दिसतें कीं, व्यापारी आपल्या भांडवलावर जितकें व्याज मिळवील तितकेंच व्याज सरकारही मिळवील. आपण व्यापाऱ्याचा दर सालचा फायदा शेंकडा २० धरला आहे. सरकारास शेंकडा ३ किंवा ४ पेक्षां अधिक व्याज मिळणार नाहीं.

पाळणें असल्यास कच्च्या मालावर जकात न बसवितां ती तयार झालेल्या मालावर बसवावी. ह्मणजे माल घेणारास निरनिराळ्या व्यापाऱ्यांच्या जकातीमुळें वाढलेल्या रकमेवर व्याज द्यावें लागणार नाहीं.

**मालावर प्रत्यक्षकर बसविणें असाध्य आहे.** कांहीं लोकांस वाटतें कीं, दुकानांत जिन्नस विकतात तेथेंच कर वसूल केले तर गिऱ्हाइकांचें हित होईल. उदाहरणार्थ कोणी मनुष्य दुकानांत एक शेर तंबाकू विकत घेण्यास गेला तर दुकानदारानें ह्मणावें कीं, एक शेर तंबाकूची किंमत दोन आणे, व सरकारी कर अर्धा आणा आहे. हल्लींच्या स्थितींत अडामस्मिथच्या चवथ्या नियमाचें उल्लंघन जितकें होतें त्याहून अधिक या रीतीनें होणार आहे. दुकानदारांच्या वह्या तपासण्याकरितां, व त्यांनीं योग्य कर सरकारास भरला किंवा नाहीं हें पाहण्याकरितां, सरकारी कामदारांच्या टोळ्यांच्या टोळ्या नेमाव्या लागतील, व त्यांच्या पगारास सर्व कर पुरणार नाहीं. इतका खर्च करून सुद्धां कांहीं लबाड दुकानदार कर देण्याचें चुकवितील. घाउक व्यापाऱ्याच्या वखारींत माल एकेठिकाणीं सांठविलेला असतो तेव्हां कर घेतला ह्मणजे थोड्या खर्चानें कराची रकम जमा होते. परंतु तोच माल फुटकळ व्यापाऱ्यांच्या दुकानीं पसरला ह्मणजे त्यावरील कर गोळा करण्यास फार खर्च येतो, व कर देण्याचें चुकविण्यासही संधि सांपडते. कर गोळा करण्याचा खर्च होईल तितका कमी व्हावा.

**कर बसविण्याची रीति:—प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष कर.** प्राप्तीवरील कर व जमीनीवरील कर, अशा विशेष प्रकारच्या करांचें विवेचन करण्यापूर्वी कर घेण्याची रीति ह्मणजे काय, व प्रत्यक्ष आणि अप्रत्यक्ष करांमधील भेद काय आहे, हें सांगणें

योग्य होईल. ज्या मनुष्यांनीं कर द्यावा अशी सरकारची इच्छा असते किंवा इरादा असतो त्यांच्यापाशींच तो मागितला ह्मणजे त्यास प्रत्यक्ष कर ह्मणावें. जे कर एका मनुष्यापासून घेतले जाऊन त्यानें आपण दिलेल्या कराची भरपाई दुसऱ्यापासून करून घ्यावी अशी समजूत असते ते अप्रत्यक्ष कर होत. यांचीं उदाहरणें अबकारी व कस्टमचे कर होत. खरोखर ज्याच्या खिशांतून कराचा भरणा होतो त्याजवर कराचें ओझें पडतें. उदाहरणार्थ मालावरील कराचें ओझें माल घेणारावर पडतें; कारण पहिल्यानें जरी माल तयार करणारानें किंवा व्यापाऱ्यानें कर भरला, तरी मालाची किंमत वाढून शेवटीं ती माल घेणारासच द्यावी लागते. गाड्यांवरील कर, व प्राप्तीवरील कर, हे पहिल्यानें ज्यांवर बसविले असतात त्यांनाच द्यावे लागतात. कर बसवावयाचा एकावर व तो द्यावयाचा दुसऱ्यानें असें असलें ह्मणजे तो अप्रत्यक्ष कर ह्मणावा. कर ज्यावर बसविला असतो त्यालाच तो द्यावा लागतो ह्मणजे तो प्रत्यक्ष कर होय. ह्मणून मालावरील कर अप्रत्यक्ष व प्राप्तीवरील कर प्रत्यक्ष समजावा.

**प्राप्तीवरील कर.** दरसालची ज्यांची मिळकत ५०० रुपयांवर आहे, त्यांनीं दरशेंकड्यास अमुक द्यावें असा जो कर असतो त्यास प्राप्तीवरील कर ह्मणतात. इंग्लंडांत हा कर जेव्हां पहिल्यानें बसविला तेव्हां लोकांची समजूत अशी होती कीं, तो कायमचा नसून कांहीं दिवसांनीं उठेल. व ह्या कराचें उत्पन्न नेहमीं जरी एकसारखें येत नाहीं तरी हा कायमचा होऊन राहिला आहे. तो उठविण्यासाठीं पार्लमेंटाच्या एका मोठ्या सभासदानें जेव्हां सूचना केली, तेव्हां असें दिसून आलें कीं, हा कर उठविण्याविषयीं देशांतील

लोकांची इच्छा नाहीं. प्राप्तीवर कर घेणें योग्य आहे किंवा नाहीं हें ठरविण्यास हा कर कायमचा किंवा थोड्या वेळापुरता आहे, हें समजणें फार महत्त्वाचें आहे. प्राप्तीवरील कराची रक्कम कायमच्या प्राप्तीवर, व कायमची नाहीं अशा प्राप्तीवर, सारखीच असावी कीं काय याविषयीं वाद आहे. या प्रश्नाचें उत्तर समर्पक देण्यास प्राप्तीवरील कर कायमचा किंवा थोडे दिवसांपुरता आहे हें समजलें पाहिजे. हा कर जर कायमचा असेल तर प्राप्ती कायमच्या असोत किंवा नसोत सर्वांवर कर सारखाच बसवावा. परंतु हा कर जर थोडे दिवसांपुरता असून लवकर उठवावयाचा असेल, तर कायमच्या नाहींत अशा प्राप्तीवर कायमच्या प्राप्तीपेक्षां कमी कर असावा. पहिल्या गोष्टीचें ह्मणजे जेथें प्राप्तीवरील कर कायमचा असून त्याची रक्कम ठरलेली आहे तिचें एक उदाहरण घेऊं. अची प्राप्ति १००० रुपयांची आहे, व ती जमिनीच्या उत्पन्नांतून मिळते; व बची प्राप्ति १००० रुपयांचीच असून ती त्यास वैद्यकीचा धंदा करून मिळते. कोणी ह्मणतात कीं, बच्या थोडे दिवस टिकणाऱ्या मिळकतीवर अच्या कायमच्या मिळकतीवरच्या इतकाच कर घेणें हें बस जुलमाचें होईल. ते ह्मणतात कीं, बची सर्व मिळकत त्याच्या श्रमाची आहे, व ती त्याच्या मरणानंतर बंद होईल. परंतु दोन्ही मिळकतींवर सारख्याच प्रमाणाचा कर कां असावा, याचें कारण हेंच होय. प्राप्तीवरील कर कायमचा व ठरीव असें मानल्यास अस जमिनीपासून जी प्राप्ति आहे, तीवर कर सतत द्यावा लागेल, व बची प्राप्ति त्याच्या हायाती पुरतीच असल्यामुळें ती बंद झाली ह्मणजे तिच्यावरील करही बंद होईल. आणखी एक उदाहरण घेऊन या गोष्टीची फोड करूं. समजा कीं, तीन गृहस्थांस दर एकास २०००० असे रुपये मिळाले.

अ आपले २०००० रुपये जमिनींत घालतो, व त्यास रदसाला ५०० रुपयांचें उत्पन्न येतें. ब आपण जिवंत आहें तोंपर्यंत दरसाल १५०० रुपये मिळावे असा करार करून एक अन्युइटी विकत घेतो; व क दहा वर्षांपुरताच करार करून दरसाल २५०० रुपये मिळतील अशी अन्युइटी विकत घेतो. आतां या सर्व मिळकती सारख्याच भांडवलापासून झालेल्या आहेत. पहिली मिळकत कायमची आहे, दुसरी मालकाच्या हयातीपर्यंत चालणारी आहे, व तिसरी कांहीं वर्षेंपर्यंतच चालेल. प्राप्तीवरील कर कायमचा व ठरीव मानल्यास अच्या प्राप्तीवर बच्या किंवा कच्या प्राप्तीपेक्षां अधिक कर बसविण्यास कांहीं कारण नाहीं. प्राप्तीवरील कर शेंकडा २ रुपये धरला तर अस सतत दरसाल १० रुपये द्यावे लागतील, बस प्रतिवर्षी त्याच्या हयातीपर्यंत ३० रुपये द्यावे लागतील, व कस दरसाल ५० रुपये असे दहावर्षेंपर्यंत द्यावे लागतील. या रकमांची गोळाबेरीज केली तर सारखीच येईल. व अ, ब, आणि क, यांनीं आपणास प्राप्तीवरील कर वारंवार द्यावा लागूं नये ह्मणून एकदाच कांहीं रकम देऊं केल्यास, ती सर्वांस सारखीच द्यावी लागेल. परंतु प्राप्तीवरील कर हा जर थोडा काळपर्यंत ठेवण्याचा असेल, तर कायमच्या प्राप्तीवर व कायमच्या नाहींत अशा प्राप्तीवर सारखाच कर बसविणें अन्यायाचें होईल. कल्पना करा कीं शेंकडा २ रुपयेप्रमाणें १० वर्षेंपर्यंत प्राप्तीवर कर बसविल्यास, कर कायमचा असेल तर कस १० वर्षेंपर्यंत अच्या इतकाच कर द्यावा लागेल. प्राप्तीवरील कराची रकम जेव्हां कमज्यास्त होते तेव्हांही अशीच असमता उत्पन्न होते.

प्राप्तीवरील कर कायमचा असून त्याची रकम ठरीव असल्यास कायमच्या व कायमच्या नाहींत अशा

**मिळकतींवर सारख्याच प्रमाणानें कर बसवावा.** असा एक सर्व साधारण नियम घालतां येईल कीं, प्राप्तीवरील कर कायमचा असून त्याची रकम ठरींव असल्यास कायमच्या किंवा इतर मिळकतीवर एकसारख्याच प्रमाणानें कर बसवावा. परंतु प्राप्तीवरील कर थोड्या दिवसांपुरताच असून त्याची रकम अनिश्चित असेल तर, कायम नाहींत अशा मिळकतींपेक्षां कायमच्या मिळकतीवर चढत्या प्रमाणानें कर बसवावा. प्राप्तीवरील कर थोड्या कालापुरता असून पूर्ण सारखेपणा राखणें असल्यास प्रत्येक मिळकतीची एकंदर रकम काय होते तें पाहून, त्या एकंदर रकमेंतून दरसाल दरशेंकडा अमुक अंश प्राप्तीवरील कर ह्मणून घेतला पाहिजे. परंतु या रीतीनें कर घेण्यांत फार अडचणी आहेत. कारण, कायमच्या नाहींत अशा मिळकतीची एक रकम ठरविण्यास फार त्रास व खर्च पडेल. ज्यांच्या मिळकती थोडाकाळ टिकणाऱ्या आहेत, त्यांचें वय व त्यांच्या प्रकृतीचें मान पाहून सरकारी कामगारांना प्राप्तीवरील कराची रकम ठरवावी लागेल. ह्मणून प्रत्येक मिळकतीची एक रकम ठरवून प्राप्तीवरील कर बसविण्याचा यत्न केल्यास कराची बहुतेक रकम तो वसूल करण्याच्या खर्चासच जाईल. मागें सांगितलें आहे कीं, कायदे करणारांनीं एकंदर करांत सारखेपणा ठेवण्याचा यत्न करावा परंतु प्रत्येक कर तो देणाराचें सामर्थ्य पाहून ठरवूं नये, याचें, वरील एक उदाहरण होय.

**प्राप्तीवरील कराचें ओझें, ज्यांच्या मिळकती मोठ्या आहेत त्यांच्यापेक्षां ज्यांच्या मिळकती लहान आहेत त्यांवर अधिक पडतें.** मोठ्या मिळकतीच्या लोकांपेक्षां लहान मिळकतीच्या लोकांवर प्राप्तीवरील कराचें ओझें फार पडतें, अशी एक शंका आहे. ह्मणजे प्राप्तीवरील कर शेंकडा १ रु-

पया असल्यास ज्याची प्राप्ति ५०० रुपये आहे त्यास दरवर्षीं ५ रुपये द्यावे लागतील, व ज्याची प्राप्ति १००००० रुपये आहे त्यास दरसाल १०००. रुपये द्यावे लागतील. आतां असें ह्मणतां येईल कीं, वर्षास ५०० रुपये हे केवळ निर्वाहापुरते आहेत, व इतकी प्राप्ति असून ज्याला साधारण कुटुंब पोसावयाचें आहे, त्याचा बरोबर निर्वाहसुद्धां होणें कठीण आहे. लाखरुपये प्राप्तीच्या मनुष्यापासून १००० रुपये घेण्यापेक्षां ५०० रुपये प्राप्तीच्या मनुष्यापासून ५ रुपये घेण्यांत पांच रुपये देणारास कठीण जाईल. कारण श्रीमंत मनुष्याची एखादी चैनीची गोष्ट कमी होईल, परंतु गरीबाचें, फार अवश्य अशी एखादी वस्तू घेण्याचें सामर्थ्य नाहींसें होईल. हा अन्याय दूर करण्याकरितां बेंथामनें अशी योजना सुचविली कीं, निर्वाहास अवश्य इतक्या मिळकतीच्या अमुक एक रकमेवर कर नसावा; आणि सर्व प्राप्तींतून ही रकम वजा करून राहिलेल्या प्राप्तीवर कर बसवावा. उदाहरणार्थ निर्वाहास अवश्य प्राप्ति १०० रुपयांची ठरविली तर १०० रुपयांच्या व त्याच्या आंतील कोणत्याही प्राप्तीवर मुळींच कर पडणार नाहीं; प्राप्ति १२० रुपयांची असल्यास २० रुपयांवरच कर आकारला जाईल, आणि प्राप्ति १००० रुपयांची असल्यास ९०० रुपयांवर मात्र कर बसेल; या रीतीनें प्रत्येकास त्याच्या चैनीच्या वस्तूंपैकीं कांहीं नियमित अंश द्यावा लागेल.

प्राप्तीवरील कर हा प्रत्यक्ष कर आहे, परंतु केव्हां केव्हां तो अप्रत्यक्षही असतो. साधारणपणें पाहतां प्राप्तीवरील कर हा नेहमीं प्रत्यक्ष कर असला पाहिजे असें दिसतें; परंतु केव्हां केव्हां तो अप्रत्यक्षही असतो, असें दाखवितां येईल. कर देणारानें संचय केला असून, तो संचय नवीन उ-

त्पादनाकडे लावण्याचा त्याचा विचार नसेल तर, त्यावरचा कर प्रत्यक्ष होय, कारण जो मनुष्य कर भरतो त्यावरच तो पडतो. परंतु प्राप्तीवरील कर जेव्हां भांडवलांतून दिला जातो, तेव्हां तो अप्रत्यक्ष कर समजावा. कारण, हा कर ज्या भांडवलांतून द्यावयाचा त्यांतून ज्या मजुरांचें वेतन मिळावयाचें त्यांच्यावर तो कांहीं अंशीं पडतो. उदाहरणार्थ कल्पना करा कीं, एका कारखानदारास दरसाल प्राप्तीवरील कर १००० रुपये द्यावा लागतो, व जर हा कर त्यावर बसला नसता, तर ही रकम त्यानें आपल्या कारखान्यांत अधिक मजूर ठेवण्याकडे खर्चिली असती. अशा ठिकाणीं हा कर अंशत: मजुरांवर पडून त्यांचें वेतन कमी होईल हें उघड आहे. परंतु कारखानदार जर १०० रुपये कर भांडवलांतून न देतां, आपल्या ऐषआरामाच्या खर्चांतून देईल तर हा कर प्रत्यक्ष होय व तो देणारावरच पडतो. प्राप्तीवरील कर भांडवलांतून द्यावा लागल्यास तो देशाच्या उद्योगास धक्का आणील. इंग्लंडासारखे जे धनाढ्य देश आहेत, ह्मणजे जेथें मोठमोठे व्यापार चालविण्यास विपुल भांडवल आहे, व यासाठींच प्राप्तीवर कर बसविण्यानें जेथें नवीन धनोत्पत्तीस कांहींच अडथळा येत नाहीं, असे देश खेरीज करून इतर कोणत्याही देशांत प्राप्तीवरील कर बसवूं नये.

कोणी असें ह्मणतात कीं, प्राप्तीवर कर बसविल्यानें कांहीं लबाड लोक आपली खरी मिळकत सरकारापासून चोरतात, व त्यामुळें त्यांना लबाडी करण्याची संधि सांपडते. परंतु लोक जात्या अप्रामाणिक असल्याखेरीज ते आपली मिळकत सरकारापासून चोरणार नाहींत, व कर बसविण्यानें लोक अप्रामाणिक होतात असें ह्मणतां येत नाहीं.

**जिनसांवरील कर निर्वाहाच्या पदार्थांवर न बसवि-**

**तां चैनीच्या पदार्थांवर बसवावे.** केवळ निर्वाहास पुरत एवढ्या मिळकती असतील त्यांवर कर बसवूं नये असें वर सांगितलें, व सर्व साधारण नियम असा सांगितला कीं, प्रत्येकानें निर्वाहास पुरून उरलेल्या रकमेपैकीं कांहीं अंश सरकारास द्यावा. यावरून असें दिसतें कीं, वरील नियम पाळणें असेल तर जिनसांवर कर बसवावयाचे ते, अवश्य लागणाऱ्या वस्तूंवर न बसवितां, चैनीच्या वस्तूंवर बसवावे. ज्यांची मिळकत निर्वाहास पुरे इतकीच आहे, त्यांच्यावर कर बसवूं नये, हें कबूल केल्यास निर्वाहास लागणाऱ्या अवश्य वस्तूंवर कर बसवून त्यांची किंमत वाढवूं नये हें उघड होतें. यावरून असें अनुमान निघतें कीं, दारू, तंबाकू वगैरे ज्या चैनीच्या पदार्थांचा गरीब लोक उपयोग करतात, त्यांवर कर घेणें अन्यायाचें होणार नाहीं. जर कोणा मनुष्याची मिळकत इतकी आहे कीं, त्यास चैनीचे पदार्थ घेतां येतात, तर तो मनुष्य गरीब आहे या कारणावरून त्याला कराची अगदीं माफी करूं नये; त्यास अवश्य पदार्थ घेण्यास पुरून उरलेल्यापैकीं त्यानें कांहीं अंश सरकारास दिलाच पाहिजे.

**जमिनीवरचा कर हा खरोखर सारा होय.** हिंदुस्थानाच्या बहुतेक भागांत जमिनीचा मालक सरकार आहे. ह्मणून जमिनीवरचा कर हा सारा होय. रयतलोक हा सारा थेट सरकारापाशीं भरतात. अर्थशास्त्रदृष्ट्या ही पद्धत फार उत्तम होय. पूर्वीं सांगितलें आहे कीं, जसजशी लोकसंख्या वाढत जाते तसतसें जमिनीचें मोल वाढतें, व तें जमिनीच्या मालकाच्या किंवा लागवड करणाराच्या उद्योगाचें फळ नसून, जमिनीच्या उत्पन्नाशीं किंमत आपोआप वाढल्याचें फळ होय. जमिनीची मालकी जेथें खासगी लोकांकडे असते, तेथें लोकवृद्धीमुळें जमिनीच्या वाढलेल्या मोलाचें सर्व फळ त्या खासगी

लोकांस मिळतें. परंतु ज्या ठिकाणीं रयतवारी पद्धत सुरू आहे, तेथें हें सर्व फळ सरकारास जाऊन सर्व राष्ट्राच्या उपयोगीं पडतें. यास्तव दुसरे कर फार वाढवावे लागत नाहींत. हिंदुस्थान देशाचा जमिनीच्या कराचा वार्षिक वसूल २२ कोट रुपये आहे. हा वसूल सरकारानें घेतला नसता तर जे कोणी जमिनीचे मालक असते त्यांस पोंचता. आतां अर्थशास्त्राच्या दृष्टीनें ज्यास जमिनीचा सारा ह्मणतां येईल त्याहून जमिनीवरच्या कराची रकम अधिक असूं नये, हें उघड आहे. हा सांपत्तिक सारा विशिष्ट जमिनीच्या आणि लागवडींत असलेल्या अति निकस जमिनीच्या उत्पन्नांतील फरक होय असें मागें सांगितलें आहे. जमिनीचा कर सांपत्तिक साऱ्याहून अधिक झाल्यास, ज्या अतिनिकृष्ट जमिनीस सारा पडत नसून जींत लागवड होत होती, ती लागवडींतून जाईल. धान्याचा पुरवठा कमी होऊन धारण महाग होईल. ह्मणून जमिनीवरचा कर सांपत्तिक साऱ्याहून अधिक झाल्यास जमिनी लागवडींतून कमी होऊन त्यामुळें कराची रकम ही कमी होते.

### ३ ऱ्या भागावर प्रश्न. कर.

१. करांची अवश्यकता कां असते ?

२. सरकारापासून ज्या लोकांचें संरक्षण होतें त्यांपैकीं कांहीं लोकांना करांची माफी असावी काय ?

३. अडाम स्मिथनें घालून दिलेले करांचे चार नियम सांगा.

४. पहिला नियम फक्त कोणत्या रीतीनें पाळतां येईल ?

५. दुसरा नियम पाळला नाहीं तर व्यापारास धक्का कसा बसतो ?

६. तिसऱ्या नियमाचें महत्व स्पष्ट करून सांगा.

७. तिसऱ्या आणि चवथ्या नियमांचा संबंध दाखवा.

८. माल बंदांत ठेवण्याचा उपयोग काय ?

९. माल बंदिगृहांत ठेवण्यापासून मालाच्या किमतीवर काय परिणाम होतो ?

१०. चवथ्या नियमान्वयें कर बसविणें ते कच्च्या मालावर बसवावे किंवा तयार झालेल्या मालावर बसवावे ?

११. कच्च्या मालावर कर बसवून सरकारांत जो पैसा येतो त्याच्या रकमेहून तयार झालेल्या जिनसांची किंमत फार वाढते असें कां होतें ?

१२. दुकानांत ठेविलेल्या जिनसांवर प्रत्यक्ष कर बसविणें कठिण कां आहे ?

१३. चवथा नियम अमलांत आणण्याचा उघड मार्ग कोणता ?

१४. प्रत्यक्ष आणि अप्रत्यक्ष कर यांतील भेद कोणता ?

१५. प्राप्तीवरील कर ह्मणजे काय ?

१६. थोडाकाळ होणारी प्राप्ति व चिरकाळ होणारी प्राप्ति या दोहोंवर सारखाच कर असावा काय ?

१७. प्राप्तीवरील कर कायमचा असून त्याची रकम ठरींव असल्यास अल्पकाळच्या व चिरकाळच्या अशा दोन्ही प्राप्तींवर सारख्याच प्रमाणानें कर घ्यावा, हें, उदाहरणें घेऊन सिद्ध करा.

१८. प्रत्येक प्राप्तीची गोळाबेरीज करून त्यावरून प्राप्तीवरील कर बसविणें असाध्य कां होईल ?

१९. मोठ्या प्राप्तीच्या मनुष्यापेक्षां लहान प्राप्तीच्या मनुष्यास प्राप्तीवरील कर भारी कसा होतो ?

२०. ही असमता मोडण्यास कोणता उपाय सुचविला आहे ?

२१. प्राप्तीवरील कर नेहमीं प्रत्यक्ष असतो काय ?

२२. प्राप्तीवरील कर भांडवलांतून दिला तर त्याचें ओझें मुख्यत्वेंकरून कोणावर पडतें ?

२३. प्राप्तीवर कर बसविण्यानें कांहीं लबाड लोक आपली खरोखर प्राप्ति सरकारापासून चोरतात, ह्मणून हा कर बसविणें अयोग्य आहे काय ?

२४. प्रत्येकानें आपल्या चैनीच्या वस्तूंपैकीं कांहीं अंश सरकारच्या तिजोरींत भरावा असा नियम सांगितला आहे. या नियमावरून अमुक जिनसावर कर बसवावा किंवा नाहीं हें कसें ठरवितां येईल ?

२५. जमिनीवरच्या सर्व करांचें ओझें कोणावर पडतें ?

२६. जमिनीवरचा कर हें काय आहे ?

२७. हिंदुस्थानांत जमिनीचा सारा मुख्यत्वेंकरून कोणास मिळतो ?

२८. जमिनीवर कर बसविण्यांत कोणतें एक मोठें तत्व संभाळिलें जातें ?

२९. सर्व जमिनीचे सारे सरकारानें घ्यावे ही पद्धत अर्थशास्त्रदृष्ट्या उत्तम कशी ?

३०. सांपत्तिक साऱ्याहून जमिनीवरचा कर अधिक असेल तर काय परिणाम होईल ?

---

मिस्टर जार्ज साहेबांचें ह्मणणें असें आहे कीं, जमीन ही मानवजातीस नैसर्गिक देणगी आहे, ह्मणून ती कोणत्याही मनुष्याची खासगी मिळकत होऊं शकणार नाहीं; परंतु मनुष्याच्या श्रमाच्या फळावर मात्र त्यांची मालकी असावी हें न्यायास अनुसरून आहे. हें तत्व पुढील गोष्टींस लावून दाखवा.—

(१) जमीन मूळची अगदीं नापीक असून जी पुष्कळ भांडवल खर्च करून सुपीक केलेली असते ती.

(२) अरण्यांतील कंदमुळें व फळें.

(३) विटा तयार करण्याची जागा.

(४) एक गाडीभर विटांची माती.

(५) त्या मातीच्या विटा केल्यावर त्या विटा.

(६) विशेष श्रम केल्याखेरीज केव्हां केव्हां जमिनींत सोनें किंवा रुपें सांपडतें तें ?

(७) स्वित्झरलंड देशांत पुरुषांनीं व बायकांनीं टोपल्यांतून माती नेऊन ती डोंगरावर पसरून शेतें केलेलीं असतात तीं.

